# नंदनवनांत!

[ स्वतंत्र सामाजिक कादंबरी ]

लेखक

इन्दु-कान्त, ”

ऊर्फ

जनार्दन श्रीधर नाईक,

बी. ए., एल्‌एल्‌. बी., ॲड्व्होकेट.

आवृत्ति पहिली

१९३४

किंमत दीड रुपया

आणि त्यांच्या मुखाजवळ आपलें मुख नेऊन ती प्रेमव्याकुळ स्वरांत त्यांना म्हणाली, —

" आज अगदीं असं काय ते? उठायचं नाहीं कां! दिवस किती वर आलाय् पाह्यचं तरी. "

" त्रास देऊं नको गडे. " —

कुमाराच्या शब्दांनी तिचें हळुवार अंतःकरण अगदीं दुखावल्यासारखें झालें! आणि नाजूक फुलपाकळ्यावर दंवबिंदु दिसावे, त्याप्रमाणें तिच्या सुंदर डोळ्यात अश्रु उभे राहिलेले दिसले! त्यातले थोडे कुमारांच्या मुखावर पडले. तापल्यां जमिनीवर पावसाचे पहिले एक दोन थेंब पडतांच ती एक प्रकारची तप्त वाफ बाहेर टाकते, किंवा निराशेमुळें अतृप्त महत्त्वाकाक्षा असमाधानाचे सुस्कारे सोडते, तसा एक तापला सुस्कारा सोडून ते म्हणाले —

" काय ग? रडतेस का काय? काय झालं तुला? "

" काही नाही; उगीचच. "

हे तिच्या तोंडचे शब्द हुंदक्याच्या वावटळीत आणि अश्रूंच्या पावसांत अधिकाधिक अस्पष्ट झाले; आणि कुमाराच्या अंतःकरणावर – अकारण मनाला हुरहूर लागावी त्याप्रमाणें – अस्पष्ट उदासीनतेचा आघात झाला!

ते लागलीच उठले; तिला जवळ घेऊन त्यानीं तिचें अत्यंत प्रेमभरानें चुंबन घेतलें; परंतु त्या चुंबनस्पर्शांत तिच्या कोमल मनाला थोडासा परकीपणाचा चटका बसल्याचा भास झाला! सौंदर्य मनाला आनंद देईल; पण, चंद्राला डाग असावा त्याप्रमाणें त्याला कृत्रिमतेचा, थोडासा कां होईना, डाग लागला तर रसिक मनाला त्यात पूर्ण आनंद उपभोगितां येत नाही! बिचाऱ्या इन्दूच्या मनाची यावेळीं पतीच्या चुंबनानें अगदीं अशीच स्थिति झाली. या दोन वर्षांत कुमारानीं तिचें कितिकिति वेळां चुंबन घेतलें असेल, पण या स्पर्शसुखात काही तरी फरक पडल्याची तिच्या प्रीतिरसिक मनाला जाणीव झाली! कुशल सारंगीवाल्याला अत्यंत सुंदर वादनामध्येंसुद्धां साधारण माणसाला न कळणारा बदसूरपणा तात्काळ कळून येतोच; तद्वत् त्याच्या त्या प्रेमाच्या प्रदर्शनांत तिला त्यांच्या मनाच्या समाधानी तन्मयतेपेक्षा प्रेमाच्या दिखाऊपणाचाच अधिक भास

झाला! परंतु त्यावेळीं ती कांहीं बोलली नाहीं.

"आपण तोंड धुवून यायचं गडे! कीं इथंच आणूं पाणी!" –

थोडया वेळानें तिनें त्याना प्रश्न केला; परंतु प्रश्नाचें उत्तर ऐकून घ्यावयाला ती तेथें कोठें होती! खालीं जाऊन तोंड धुण्यासाठीं साधारण ऊन पाणी व एक स्वच्छ टावेल घेऊन ती वर आली व तिनें त्यांना हात धरून उठविलें.

प्रियपतीचा मुखमार्जनविधी आटोपेपर्यंत इन्दूनें इकडे स्टोव्ह पेटविला, व त्याच्यावर चहाला पाणी ठेवणार इतक्यात तिला कसली तरी आठवण झाली, आणि ती कुमाराकडे धांवत जाऊन म्हणाली, —

"म्हटलं, आज चहा करूं कीं कॉफी करूं?"

हा प्रश्न ऐकताच कुमारांच्या मनाला आश्चर्य वाटले. आज खरोखरच त्यांना चहा नको होता, चहाऐवजीं कॉफीनेंच मनाला अधिक हुषारी येईल, अंतःकरणाला उत्साह वाटेल असे त्याना वाटत होते; परंतु पत्नीला तसें सागण्याचें ते विसरून गेले: आता तिनेंच त्यांना तसे विचारलें, तेव्हां आपली इच्छा आपल्या पत्नीला आपण न सागता समजून यावी, याचें त्यांना आश्चर्य वाटले; परंतु खरे कारण म्हटलें तर त्यात आश्चर्य वाटण्यासारखे काहीं नव्हते; कारण नंदकुमार आणि त्याची पत्नी इन्दु यांचीं हृदयें प्रेमाने इतकी एकजीव झालीं होतीं कीं, परस्परापासून त्याना ज्याप्रमाणें काहीही लपवून ठेवण्याची इच्छा होत नसे, त्याप्रमाणें परस्परांच्या इच्छा, आवडी आपल्या स्वतःवरूनच त्याना समजून येत असत. पतीच्या नेहमी प्रसन्न असलेल्या मनाला आज उत्साह वाटत नाहीं, त्यांच्या अंतःकरणांत – वेळूच्या बेटात वायु उत्पन्न करतो त्या प्रकारची – कसली तरी खळबळ चालली आहे, हें त्याच्या उशीरा उठण्यानें ज्यावेळीं तिनें जाणलें, त्यावेळीच तिला जरा संशय आला, व त्याच्या त्रासलेल्या मनाला चहापेक्षा कॉफीनेंच अधिक हुपारी येईल असें तिला वाटलें; आणि त्यामुळें नेहमींप्रमाणें एकदम चहा करण्याच्या भानगडींत न पडतां पतीला विचारूनच काय तें करावें, अशा हेतूनें ती वर सांगितल्याप्रमाणें त्यांच्याकडे गेली.

कुमारांना 'चहा करूं कीं कॉफी करूं? या वर दिलेल्या पत्नीच्या

प्रश्नानें मनापासून आनंद झाला, व त्यांनीं हंसत हंसत ति... ...रलें—

" कायग ! मला आज कॉफीच हवी होती, च... ...ता हें तुला ग कसं कळलं ! "

" कळायचं काय त्यात ! आपलं मन ... ...गावर नाहीं, जागरणामुळें आपल्याला त्रास झालाय, तेव्हां ... ...पेक्षा कॉफीनेंच मनाला जरा जास्त हुशारी येईल, नाहीं क... ...इतक्या दिवसांच्या सहवासानं आपल्या मनात काय काय ... ...असतं, तें सारं सारं अगदीं मला स्पष्ट कळलं तर त्यांत नव... ...बाई ? "

कुमार पत्नीच्या ... ...स्थिर दृष्टीनें पहात होते. त्यांच्या मनाला तिच्या वरच्या ... ...सा एक संशय आला की, आपल्या मनाला त्रास देण ... ...चार नी म्हणते त्याप्रमाणें तिला कळून आले असा... ...ा कळून आले असले तर, आपण होऊनच आपली ... ...ा मनातील नाजूक खळबळ हिच्याजवळ उघड करावी ... ! आपलें अंतःकरण तिच्या हृदयाजवळ उघडें करणें ...च्या वाऱ्यानें लतेवरच्या फुलाजवळ कानगोष्टी करण्यासारखें ... नाजूक मनाला त्यामुळें फार वेदना होतील !

...ा दिवसापासून त्या उभयताना उभ्या आयुष्यांत अशा ...ग कधीं आला नव्हता कीं, जो त्याना तिच्याजवळ सांगायला ...वी; आणि दुर्दैवानें तसा एखादा प्रसंग त्याच्यावर येता तर तो ...वळ, आपल्या लाडक्या पत्नीजवळ, उघड केल्याशिवाय ते राहिले ...; आणि यामुळें तर त्याच्या मनाला विशेषच त्रास होऊं लागला.

थोड्या वेळात कॉफी तयार झाली. इकडे कुमारांचें तोंड धुणेंही संपलें होतें. इन्दूनें दोन पेल्यात कॉफी ओतली, आणि एक पेला पतीपुढें करून ती म्हणाली—" घ्यायची. "

" तूं घेना. " कुमार म्हणाले.

" मी घेत्यें कीं, आपण घ्यायची आधीं; कालच्या जागरणाच्या त्रासामुळं आज लवकर उठायलाही नाहीं जमलं; जागरणाचा फार त्रास झाला कां ? गाणं कसं काय होतं ? "

पत्नीच्या या प्रश्नाला उत्तर द्यावयाला त्यांना बराच वेळ लागला;

म्हणून ... म्हणाली, "आपल्याला आवडलं नाहीं कां तें गाणं? ते गवई फार ... गाहेत म्हणे. खरं ना! माझं कपाळ दुखत होतं, म्हणून मी बरोबर ... आले; एरवीं आपल्याला सोडून मी कधीं तरी एकटी राहिले आहे ... ना? आपण गेलात् अन् मला बरीक इकडे अगदी करमेनासं ... कडे माझी आठवण तरी होत होती का?"

हा प्रश्न ऐकून कुमार ... रात्रीचा प्रसंग—पडदा वर होतांच नाटकातील पात्रे डोळ्यांसमोर ... त्याप्रमाणें उभा राहिला, व त्यांचें मन भाबावल्यासारखें ... तरी ... ही बाहेर न दर्शविता ते आपल्या पत्नीला म्हणाले—

"लाडके! तुझी आठवण येत होती तर! ... आठवण येत नाहीं असा एक क्षणही जात नाहीं. तुझी सुंदर मूर्ती, त्या ... देहात विराजमान होणारं तुझं नाजूक, हळुवार अंतःकरण, आणि ... ताण करणारी तुझी प्रेमळ वागणूक, आणि सद्‌गुणी स्वभाव, ... डोळ्यासमोर उभी राहून माझ्या अंतःकरणात मुग्ध, ... उत्पन्न करूं लागलीं की, माझं भावनात्मक मन आत्यंतिक ... नीय अशा सुखसंवेदनांच्या तरंगलहरींनी— श्रवणमधुर नाद ... तश मन गुंग होऊन जावें त्याप्रमाणें —गुंग होऊन नाचूं डोलूं ... वेळीं माझ्या भाग्यशाली नशिबाचा माझा मलाच हेवा उत्पन्न काय अशी माझ्या मनाला एकसारखी भीति वाटूं लागते?"

"अगदीं खरं का हे? अगदीं—अगदीं मनापासनं बोलायच ना?"

—इन्दु अत्यंत प्रेमळ नजरेने आपल्या पतिदेवाकडे पहात हा ... करीत होती.

"'खरं का?' म्हणून का बरं विचारतेस, इन्दु? तुझ्यासारखं रमणीरत्न पत्नीच्या नात्यानं लाभणं, म्हणजे भाग्याचं लक्षण नव्हे का?"

"मला काय बाई माहीत? आपल्यासारख्याचा जन्माचा सहवास मला लाभला, यात मला मात्र माझं भाग्य कळसास पोचलं असं वाटूं लागलंय! पण याचा जास्त जास्त विचार करायला लागलं, म्हणजे मनाला—खरंच गडे! —एक प्रकारची नसती हुरहूर लागून राहते; आपलं अंतःकरण अत्यंत भावनाप्रधान आहे; सौंदर्याची आवड आपल्या हृदयाला

अत्यंत–वाजवीपेक्षां फाजील–क्षमा करायची हं गडे!–खरोखरच वाजवीपेक्षा फाजील–आहे! या भावनाप्रधान, काव्यमय अंतःकरणाच्या तळमळीचे बोल आपण मला नेहमीं ऐकवीत असायचं; अन् माझ्या दर्शनानं, माझ्या स्पर्शानं आपलं निर्व्याज प्रेमासाठीं तळमळणारं हृदय शांत होत असतं, असंही आपण मला सांगायचं! पण असल्या उत्कट भावनाप्रधान मनाला पत्नी आपल्या प्रेमाच्या जोरावर कायमचं कह्यांत ठेवूं शकेल कीं नाहीं, अशी रुखरुख माझ्या मनाला अलीकडे अलीकडे फारच वाटूं लागली आहे! माझ्या सान्निध्यात, अन् माझ्या प्रेमळ स्पर्शसुखामुळं, आपलं निर्व्याज अन् निर्मल प्रेमासाठीं तळमळणारं हृदय आत्यंतिक आनंदाचे, मनोगत इच्छापूर्तीचे समाधानी निःश्वास सोडीत असल्याचें मी, बहुतेक का – नेहमींच पहात असतें! पण मन हें सागराप्रमाणें अगाध अन् अतर्क्य आहे! त्यात सागराचा खारटपणा आहे! सागराच्या तळाशी दडलेल्या तेजस्वी रत्नाप्रमाणं त्यात अत्यंत चमकदार अशीं रत्नंही आहेत! भयंकर असे झाकलेले खडकही आहेत! पण माझ्या सुदैवानें आपल्या अंतःकरण–सागरांतील खारटपणा, किंवा खडकाचा कपाळमोक्ष करणारा क्रूरपणा मला अजून म्हटल्या अजून–लग्न झाल्या दिवसापासून इतक्या दिवसांत एकदाही – अनुभवास आला नाही! उघडया डोळ्याना न दिसणारी तळाकाठीं दडलेलीं दैदिप्यमान अशीं अगणित रत्नमाणके–आपल्या हृदयसागरात बुडी मारून तळ गाठण्याचें भाग्य मला आपल्या सहवासानं लाभलं म्हणून–आढळून आलीं तीं मीं माझ्या पंचप्राणाच्या कोंदणात अगदीं जतन करून ठेविलीं आहेत! त्या रत्नाचे तेज माझ्या डोळ्यातनं बाहेर सांडून आपल्या मना–डोळ्याना सुखवीत असतं! त्याच रत्नाचा तजेला–चंद्रिकेचा प्रकाश आकाशात पसरावा त्याप्रमाणं–माझ्या शरीरावर पसरलेला पाहून आपलं हृदय माझ्या सौंदर्यानें–खरं म्हटलं तर आपल्या अंतःकरणातील दिव्य सद्गुणाच्या सौंदर्यानें!–दिपून जातं! होय ना गडे? खरं बघायला गेलं तर, माझ्यात आपल्या हृदयाला दिपविण्यासारखं काय आहे बरं? एक शरीर! अन् त्या शरीरात गुरफटलेली आत्मज्योत!!– आपल्या अंतःकरणाला दिपवून टाकण्याइतकं त्यात मुळात तेजच नाहीं! आपल्या

अंतरंगांतल्या नानाविध गुणरत्नांचें दिव्य तेज त्याना रोजचं लाभत असल्यामुळं, त्या तेजाळ प्रकाशात आपल्या डोळ्यांना व हृदयाला माझ्यांत तेजस्विता भासमान् झाल्यासारखी वाटते ! परंतु माझ्या दुर्दैवानें आपल्या अंतःकरणांत एखादा चिखलानं भरलेला असा खडक उत्पन्न होऊन त्या तेजाच्या आड येईल, तर माझं खरं स्वरूप आपल्या नेत्रांना क्षणभरहा रिझवूं शकणार नाही ! पण तसल्या चिखलानं भरलेल्या खडकाच्या आपण आपल्या दिव्य अशा आत्मिक सामर्थ्याच्या सुरुंगानी ठिकऱ्या ठिकऱ्या उडवून, त्याला सप्तपाताळात गाडून टाकाल, याबद्दल माझ्या मनाला मुळीं म्हटल्या मुळींसुद्धां संशय नाहीं बरं !"

कुमारांना आपल्या पत्नीची योग्यता माहीत होती; म्हणून तर वरच्या तिच्या भाषणाचें त्यांना आश्चर्य वाटलें नाहीं. लग्न झाल्यापासून आतापर्यंत त्याना अशा प्रकारचें शब्दामृत बहुतेक सतत ती प्राशन करावयाला लावीत असे; व तें ते आधाराप्रमाणें प्राशन करीत असत; परंतु आज ती जें काय बोलली तें त्यांना साधुवाणीप्रमाणें सत्य असल्याचें आढळून आलें. कालपासून त्यांच्या हृदयसागरात एक नवीनच खडक उत्पन्न होऊन वर डोकावूं लागला होता; त्याच्यावर आदळणाऱ्या तुफानी लाटा जो ध्वनि उत्पन्न करून जलतुषारांनीं भोंवताल भिजवून टाकीत होत्या, तो ध्वनि त्यांना पळभरही ऐकणें कठीण वाटूं लागलें होतें ! त्यामुळें आपल्या पत्नीची ती सत्यवाणी ऐकून त्यांना आपला अत्यंत तिरस्कार आला ! या देवतेच्या पायाजवळसुद्धां बसण्याची आपली योग्यता नाही, अशी दुःखदायक जाणीव त्याच्या अंःतकरणात उत्पन्न होऊन ते बराच वेळ शून्यदृष्टीनें पत्नीकडे पहात राहिले !

आपल्या भाषणावर काहीं एक न बोलतां ते एकसारखे आपल्याकडे रोखून पहात आहेत, हें पाहून तिला त्या स्थितींतही लाज वाटली, आणि तिची लाजरी दृष्टि अधोमुख झाली ! थोडा वेळ कोणीही कांहीं बोलेना ! शेवटीं कुमारांनीच त्या स्तब्धतेचा भंग केला, आणि ते हंसले; हंसत हंसत जवळ जाऊन त्यांनीं तिला प्रेमातिशयानें हृदयाजवळ धरिली. त्या दृढालिंगनाचा आवेग तिला सहन झाला नाहीं ! तिनें तात्काळ आपलें मुख

त्यांच्या वक्षःस्थळांत लपविलें; तेव्हा तिला प्रेमानें कुरवाळीत ते म्हणाले—

" लाडके ! माझ्या प्रेमाचा तुला संशय येतो का ? तुझ्यापासून माझं हृदय लपवून ठेवण्याचा प्रयत्न मीं आजच काय तो केला बरं ! तसं करण्याचा मला पूर्वी कधींच प्रसंग आला नाहीं, हें मला कबूल केलंच पाहिजे, आणि यदाकदाचित् तसा प्रसंग आलाच असता, तरीही मी माझं हृदय तुझ्याजवळ उघडं केल्यावांचून कधींही राहिलें नसतों; पण माझ्या दुर्दैवानें आज असा प्रसंग माझ्या आयुष्यात घडला आहे कीं तो आताच तुला उघड करून मला सागतां येत नाहीं, याबद्दल मी तुझी क्षमा मागतों; पण आज तुला एवढं अगदीं स्पष्टपणें सागतों कीं, साक्षात् प्रीतिदेवता सौंदर्यानं नटूनथटून माझ्या जीवाला भूल पाडण्याचा प्रयत्न करूं लागली, तरी मी तुझ्याविषयींच्या माझ्या प्रेमात रतिभरही कमीपणा आणूं देणार नाही ! भावनावश होऊन कदाचित् मी तिला स्पर्श करण्याचा प्रयत्न करीन ! परंतु तो स्पर्श तुला दुःखदायक होणार नाहीं, किंवा माझ्या अंतःकरणात वसत असलेल्या तुझ्या प्रेमाबद्दल परकेपणाचा निर्दयपणा उत्पन्न करणार नाहीं, याबद्दल माझ्या पंचप्राणस्वरूप परमेश्वराच्या पायांची शपथ मी माझ्या प्रीतिदेवतेच्या पायासमोर घेण्यास एका पायावर तयार आहें.

कोणतीही घटना जगांत घडो ! आकाश भूदेवीला आलिंगन देण्यासाठीं कोसळून खाली पडो ! विशाल सागर जोत्स्नासुंदरीला भेटायला उडून वर जावो ! साक्षात् रविचंद्र लतेवरच्या कलिकांचें चुंबन घेण्यासाठीं खालीं धावत येवोत ! अगर अचल गिरिडोंगर, एका ठायीं स्थिर राहून कंटाळल्यामुळें सृष्टीच्या राजरस्त्यातून पाय मोकळे करण्याकरिता फेरफटका करायला निघोत,—वाटेल ती अघटित घटना जगात घडो !— माझ्या तुझ्याविषयींच्या नाजूक भावना कधींही कमी होणार नाहींत, किंवा बदलणारही नाहींत, याला आपल्या उभयतांच्या अंतःकरणांत अधिष्ठित असलेलें आत्मचैतन्य साक्ष आहे ! ! ! "

असें म्हणून कुमारांनीं आपल्या लाडक्या इन्दूला पुन्हां हृदयाजवळ धरून तिच्या सुकुमार गालांचें प्रेमभरानें चुंबन घेतलें !

*

## कुंज २ रा

आज उमाकाकू फार धादलींत होत्या. आपल्या एकुलत्या एक मुलाच्या वाढदिवसानिमित्त त्यांनीं कुमारांना मुद्दाम जेवावयाला बोलाविलें होतें. वसंत हा त्याचा अत्यंत लाडका मुलगा; एकुलता एक म्हणूनच केवळ नव्हे तर, इतरही त्याच्या सद्‌गुणांनीं उमाकाकू आपल्या लाडक्या वसंतावर जीवापलीकडे प्रेम करीत असत. तो बी. ए. झाला असून पुण्यांतच एका खाजगी शाळेंत शिक्षक होता. कुमार आणि वसंत हे लहानपणापासूनचे मित्र; एल्‌एल्. बी. झाल्यानंतर कुमार पुण्याला 'प्रॅक्टिस' करूं लागले, तरी या व्यवसायभिन्नतेमुळें त्याच्या मैत्रीत कोणत्याही प्रकारचा अडथळा आला नाहीं; उलट, त्याच्या स्वभावसादृश्या-मुळें त्यांची मैत्री वृद्धिंगतच होत गेली. जरा जीवाला करमेनासें झालें, म्हणजे कुमार आपल्या मित्राकडे तासचेतास जाऊन वसत; इतकेंच नव्हे तर, एखादे वेळीं उशीरच झाला तर, त्याच्या घरीं जेवावयालाही राहात असत.

उमाकाकूंचा वसंताप्रमाणें कुमारांवरही जीव होता; वसंत व कुमार या दोघांमध्यें त्या कधीही भेदभाव मानीत नसत; वसंताला पाहून जितका त्यांच्या अंतःकरणाला आनंद होई, तितकाच कुमाराना पाहूनही होत असे.

त्या दिवशीं 'किर्लोस्कर' थिएटरमध्यें वसंतही त्याच्याबरोबर होता. गाण्याहून परत आल्यावर आपल्या मित्राचें मन ठिकाणावर नाही, हें त्यानें ओळखलें; परंतु त्यावेळी तो कांहीं बोलला नाहीं, किंवा त्याची कारणेंही त्यानें त्याना विचारिली नाहींत; याचें कारण, कुमार आपल्याला सांगितल्याशिवाय कोणतीही गोष्ट करीत नाहींत, किंवा आपल्या मनात एखादी नवी कल्पना आली तर तीही ते आपल्या जवळून लपवून ठेवीत नाहीत, हें त्याला पूर्णपणें माहीत होतें; परंतु त्या-नंतर दोन दिवस होऊन गेले तरी, कुमारांनीं आपल्याला त्याबद्दल थाग लागूं दिला नाहीं, हें जेव्हां त्यानें पाहिलें, तेव्हां मात्र त्याच्या मनाला

जरा वाईट वाटलें; व आपल्या मित्राच्या मनःस्थितींत आपण समजतों त्यापलीकडे विशेष कांहीं तरी चलबिचल झाली आहे, याबद्दल त्याची पूर्ण खात्री झाली; तरी कुमार आपणहोऊन आपल्या या मनःस्थितीबद्दल आपल्याजवळ बोलतील, ही त्याची आशा अजूनही कमी झाली नव्हती; त्यामुळें आज ज्यावेळीं कुमार त्याच्याकडे आले त्यावेळीं त्या दिवसाबद्दल व त्या दिवसानें केलेल्या आपल्या मनःस्थितीबद्दल ते सविस्तर माहिती आपल्याला सागतील अशी त्याची मनोदेवता त्याला सागत होती; आणि यामुळें तें सर्व ऐकण्यासाठी त्याचें मन विशेष उत्सुकतेनें वाट पहात होते; परंतु त्याना येऊन बराच वेळ झाला तरी, त्यानीं त्या बाबतीत एक अवाक्षरही तोंडाबाहेर काढलें नाहीं, हें पाहून त्याला आश्चर्य वाटलें आणि वाईटही वाटले. आतां मात्र त्यानें मनात ठाम निश्चय करून टाकिला की, कुमार आपणहोऊन त्या बाबतींत कांही बोलल्याशिवाय आपण त्याना त्याबद्दल काही विचारूंच नये म्हणजे झालें.

जेवायला बसायला जरा उशीर असल्यामुळें त्याच्या इकडच्या तिकडच्या विषयांवर गप्पा चालल्या. कुमाराच्या मनातून वसंतानेंही आपल्यासारखे वकील होऊन पुण्यासारख्या शहरीं नांव मिळवावे असें फार होते; परंतु वसंताचा ओढा वकिलीपेक्षा मास्तरकीकडेच जास्त असल्यामुळें, व घरची कुमारांप्रमाणें गर्भजात श्रीमंती नसल्यामुळें तो बी. ए. झाल्याबरोबर वर सांगितल्याप्रमाणें एका खासगी शाळेंत मास्तर राहिला. कुमार अजूनही त्याला एल्‌एल्. बी. चा अभ्यास कर म्हणून आग्रह करीत होते; पण वसंतानें त्या बाबतींत आपला विचार कायम केला असल्यामुळें कुमाराच्या आग्रहाचा काही उपयोग होण्यासारखा नव्हता.

जेवायला अजूनही वेळ आहे, असें उमाकाकूंकडून सागण्यात आल्यामुळें, या विषयावर वसंताचें मन पुन्हां एकदा शक्य असेल तर वळवावें, या हेतूनें त्यांनीं वसंताला प्रश्न केला:

" काय रे वसंत ! मास्तरकी करण्याचा तुझा बेत अजूनही पूर्वीसारखाच कायम आहे का ! "

" होय, अजूनही कायम आहे, कुमार ! कोणताही धंदा केला म्हणून काय झालें ! माणसाला नांव मिळायचेंच त्याच्या नशीबांत असेल, तर तें

त्याला कुठल्याही धंद्यांत आणि कसल्याही परिस्थितींत मिळेल. यावरून तूं असें मात्र म्हणूं नकोस कीं, मी दैववादी आहें. मनुष्य मोठेपणास चढायला जितकें दैव कारणीभूत होतें, तितका प्रयत्नही होतो हें मला कबूल आहे. रानातही लतावेली वाढतात, आणि फळाफुलांनीं बहरून जातात; तथापि त्या लतावेलींची पाणी वगैरे घालून योग्य जोपासना आणि मशागत केली तर, त्यांची शोभा निःसंशय जास्त चित्ताकर्षक होईल. नुसत्या सूर्यप्रकाशावर कांहीं रानवेली वाढत असतील; पण सूर्यप्रकाशाच्या जोडीला त्याना पुरेंसें पाणी आणि योग्य मशागत याचा लाभ झाला तर त्या फळा-फुलानीं नुसत्या ओथंबून जातील. भरपूर सूर्यप्रकाश आणि योग्य मशागत ही जशीं फुलझाडाना अत्यंत आवश्यक आहेत, त्याप्रमाणेंच दैवाची मदत आणि प्रयत्नांची शिकस्त ही जोडगोळी माणसाच्या भाग्योदयाला अत्यंत जरुरीची आहे, हें मला निर्विवाद कबूल केलें पाहिजे; परंतु माणसाचा मोठेपणा, तुला वाटतो त्याप्रमाणें, परिस्थितीवर अगर अमुक एका पेशावर केव्हाही अवलंबून असत नाहीं, असें माझें तरी प्रामाणिक मत आहे. एखादा मास्तर काय, किंवा एखादा वकील काय, केवळ एक वकील म्हणून मोठेपणाला जास्त पात्र, व दुसरा मास्तर म्हणून कमी, असें समजणें शुद्ध वेडेपणा होईल. दैव आणि प्रयत्न ही दोन्हीं माणसाला लाभतील तर कोणत्याही परिस्थितींत, आणि कसल्याही पेशात, त्याचा भाग्यशकट वेगानें पुढें पुढे जाईल; पण दोहोपैकीं एक नसेल– विशेषतः दैव नसेल तर तो पुढे तर जाणार नाहींच, पण तिथल्या तिथेंच उलथून पडेल ! ''

" कबूल "– कुमार हंसत हंसत म्हणाले– " म्हणजे तुझ्या म्हण-ण्याचा मतितार्थ एवढाच कीं, विशिष्ट परिस्थितीचा अगर पेशाचा माण-साच्या आयुष्यावर कांहींच परिणाम नाहीं, असंच ना ! पण हा तुझा निष्कर्ष चुकीचा आहे. समज, भरपूर सूर्यप्रकाश आणि जरूर ती मशागत आहे, पण ज्या जमिनींत त्याचा उपयोग व्हायचा, ती निरुपयोगी आहे तर, दोन्हीं भरपूर असूनही अगदीं निरुपयोगी ठरतील. नुसता प्रयत्न किंवा दैव असून तरी कुठें भागतें आहे ? त्याला परिस्थितीची मदत

पाहिजेच. दोन चाकें असूनही रथ योग्य रीतीनें चालायला उत्तम सारथीही पाहिजे, नाहीं तर तो रथ नुसता चित्रांतलें खेळणें होईल, उपयोगाच्या नांवानें शून्य, त्याप्रमाणें माणूस पुढें यायला परिस्थितीही चांगली पाहिजे, आणि अंगीकारलेला पेशाही योग्य असा पाहिजे; जितका पेशा आणि परिस्थिति उत्तम, तितका माणसाला त्याचा उपयोग अधिक. तेव्हां भाग्योदयाचा रथ उत्तम रीतीनें पुढें पुढें चालत राहायला दैव आणि प्रयत्न हीं त्याचीं दोन्हीं चाकें व्यवस्थित तर पाहिजेतच, पण शिवाय अंगीकारलेल्या पेशाचा सारथीही चागला वाकबगार असा पाहिजे तरच तो रथ व्यवस्थेशीर आणि वेगांत चालेल; नाहीं तर योग्य सारथ्याविना तो पुढें तर जाणार नाहींच, पण नुसत्या ओझ्यासारखा अडचण वाटायला लागेल, दिसायला सुबक, पण अंगात नाहीं चमक, अशी त्याची स्थिति होईल !"

"बरें, परिस्थिति चांगली पाहिजे, पेशा योग्य पाहिजे, या दोन्ही गोष्टी तुझ्या म्हणण्याप्रमाणें कबूल करतों मी; पण मला साग, मास्तरकी आणि वकिली या दोन पेशात नांव मिळवावयाच्या दृष्टीनें काय कमी-अधिकपणा आहे रे ? पैशाच्या दृष्टीनें वकिली कदाचित् – कदाचित् का, पुष्कळ अंशीं – जास्त फायदेशीर असेल; पण नांव मिळवायच्या दृष्टीनें दोघांत असा काय फरक आहे बुवा ? उत्कृष्ट शिक्षक, किंवा उत्कृष्ट वकील या दोन्ही स्थिती जगांत माणसाला शक्य नाहींत का ? शिक्षक व वकील या दोन पेशांत फरक आहे, नाहीं असें नाहीं म्हणत मी; पण तो चंद्रसूर्य यांच्यामधल्या फरकासारखा आहे, कोणाला सूर्याचा तेजस्वीपणा आनंद देईल, तर कोणाला चंद्राच्या स्निग्ध शीतलतेनें आनंद होईल ! तसें पाहिलें तर, मी म्हणतों दोघात तसा फरक कुठें आहे ? ज्याप्रमाणें अंतःकरणाला आनंद देणें हें दोघांचेंही कार्य, त्याप्रमाणें माणसाला जगांत नांव मिळवून देणें, ही गोष्ट शिक्षकाला काय, किंवा वकिलाला काय, दोघांनाही शक्य आहे !"

"चंद्रसूर्य यांच्या प्रभावशक्तीमध्यें फरक नाहीं असें कसें म्हणतोस तूं वसंत ? सूर्य स्वयंप्रकाशी आहे, तर चंद्र परप्रकाशित आहे; अगदीं हुबेहूब हा फरक वकील आणि शिक्षक याच्यामध्यें आहे ! शिक्षकाला नांव मिळ-

चायला, शाळेंत दिली जाणारी शिक्षणपद्धतीच कारणीभूत होत असल्यामुळें, हल्लीं शाळांतून सरसहा प्रचलित असलेल्या शिक्षणपद्धतीनें शिक्षक कितीही विद्वान्, लोकप्रिय असा असला, तरी त्याला आपल्या बौद्धिक करामतीवर नाव मिळवायला मुळींच वाव नसतो. आपल्या अंतःकरणाला योग्य वाटणारी शिक्षणपद्धति अमलांत आणणें, हल्लींच्या शिक्षणपद्धतीच्या सावळ्या-गोंधळात शक्य तरी आहे का ? ''

" मग वकील होऊन तरी काय अशी मनासारखी जगाची सुधारणा करितां येण्यासारखी आहे बरें ? ''वसंतानें प्रश्न केला.

थोडा वेळ थाबून कुमार बोलूं लागले—

" तुझा प्रश्न बरोबर आहे; माझें त्याला उत्तर असें आहे कीं, वकील कुणाचा चाकर नाहीं; तो अगदीं स्वतंत्र असतो; निव्वळ पैसे मिळविणें हें ध्येय बाजूला सारून अशील वर्गाची उन्नति साधून नाव मिळविणें त्याला परावलंबी शिक्षकापेक्षा केव्हाही अधिक शक्य आहे.

नाडलेल्या अशिलांना—म्हणजे खरोखरच जे निरुपद्रवी, आणि केवळ दुसऱ्याच्या दुष्ट कारस्थानाना बळी पडले आहेत, अशा असहाय आणि गरीब दुबळ्या लोकाना योग्य ती मदत करून सुस्थितीवर आणणें, निदान तसा प्रयत्न तरी करणें हें खरोखर वकिलालाच शक्य आहे. आतां मात्र तर सागितल्याप्रमाणें, केवळ पैशाकडेच नजर असेल तर, वकीलाचें नांव होण्याऐवजीं त्याच्या नांवाचा बभ्रा मात्र होईल.

एखाद्या गरीब अशिलाला ' फी ' न घेता, इतकेंच नव्हे तर, जरूर पडल्यास, आपल्या पदरचा पैसा खर्च करून, योग्य तो—नैतिक दृष्ट्या योग्य तो—न्याय मिळवून देणें, हें वकिलालाच शक्य आहे. आपलें बुद्धि-सामर्थ्य व वकीली ज्ञान, अजाण, अडाणी अशा कुळाना योग्य तो सल्ला देऊन, आणि त्याची बाजू खोटी असेल, तर तसें त्यांना स्पष्ट सांगून, त्यापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न करण्यात खर्च केलें तर, अशा वकिलाचें चारचौघात जे नाव होईल, तें नुसते पैसे मिळविणाऱ्या वकीलापेक्षां सहस्रपट श्रेयस्कर आहे.

एखाद्या गरीबाला नाडून, दुसऱ्या एका श्रीमंताला ऐषआरामी थाटाचा उपभोग घ्यावयाला मदत करण्यात वकीलाचा मोठेपणा तो काय आहे? भिकाऱ्याच्या तोंडचा घास काढून, सावकाराच्या तोंडाचा श्रीमंती शृंगारसाज साधण्यांत, वकीलाचा मोठेपणा नाहीं! श्रीमंत आणि लबाड अशा कुळाला पायानें लाथाडून, नडलेल्या गरीब सज्जनांना पायाजवळ करणें, योग्य तो सल्ला देऊन, यश मिळणे शक्य आहे कीं नाहीं तें त्याना स्पष्ट सांगणें आणि, मिळणें शक्य असेल तर, तें मिळवून देण्यासाठीं शारीरिक आणि मानसिक श्रमाची शिकस्त करणें, हें श्रेष्ठ वकीलाचें कर्तव्य आहे, आणि तें कर्तव्य योग्य रीतीनें बजावून जें समाजाचें हित वकीलवर्गाला करितां येईल, तें इतराना करिता येणें मुळींच शक्य नाही!

खोट्याचें खरें करण्यापेक्षा, खऱ्याचा खरेपणा शाबीद करण्यात आपल्या बुद्धीचा, ज्ञानाचा आणि कायदेबाजीच्या कौशल्याचा सदुपयोग करणें हीच खरी वकीली! आणि अशा तऱ्हेनें समाजाचें एक अंग जें हल्लीं कायद्याच्या कारस्थानी कचाटींत सांपडलें आहे, त्याला योग्य तो मार्ग दाखवून सुस्थितीच्या मार्गावर आणणें आणि कायद्याचें कोर्ट, म्हणजे पद्धतशीर रीतीनें खोट्याला खऱ्याचें स्वरूप देण्याचा किंवा खऱ्याचा खरेपणा, कायद्याच्या करामतीवर नाशाबीद करण्याचा एक अजब कारखाना, अशी जी खोटी समजूत समाजामध्यें रूढ आहे, ती नाहीशी करण्याचा, थोडाफार कां होईना, प्रयत्न करणें, अशा प्रकारच्या कितीतरी चांगल्या गोष्टी वकीलालाच करितां येण्यासारख्या आहेत. अशा प्रकारची लोकोपयोगी कामें करून जगाची सुधारणा करणें, शिक्षकापेक्षां विद्वान् वकीलालाच अधिक शक्य आहे.

शिवाय हल्लींच्या कायद्यानें केलेली ‘हिंदु स्त्रियाची कायदेशीर दुर्दशा’ वरवर पाहाणारालाही जी दिसून येते, ती म्हणजे कायद्याची कारस्थानी करामतच होय! म्हणजे पर्यायानें वकीलानें आपल्या वकिली ज्ञानाच्या जोरावर घडवून आणिलेलें कायदेशीर कारस्थानच होय, ही जाणीव समाजाला आणून देऊन, त्या कारस्थानाचीं पाळेंमुळें खणून काढणारी, आज शेंकडों वर्षें कायद्याच्या कचाटींत सांपडलेल्या हिंदु स्त्रियांच्या दृष्टीनें हितकारक अशी दुरुस्ती, हल्लीं अस्तित्वांत असलेल्या कायद्यांत करण्याचा

प्रयत्न करणें, आणि त्यासाठीं आपल्या मानसिक श्रमांची पराकाष्ठा करणें, हें वकीलाचें पहिलें कर्तव्य नाही काय ? आणि तें कर्तव्य योग्य रीतीनें बजावून अखिल स्त्रीजातीचें कल्याण करणें वकीलाशिवाय इतर कोणाला शक्य आहे कां ? "—.

कुमार अगदीं आवेशात येऊन बोलत होते; या भाषणावर वसंत बोलण्याचा प्रयत्न करणार, इतक्यात उमाकाकू घाईघाईने तेथें येऊन म्हणाल्या—

"काय रे, वसंत ! काय एवढं चाललंय तुमचं ? रोज वाद अन् विवाद कसले एवढे करित बसता आ ? जेवण अगदी तयार आहे, चला बघूं; वसंत, कुमाराना पाय धुवायला पाणी दे रे. "—

या उमाकाकूंच्या शब्दांनीं कुमार ध्यानावर आले; मग तेथें मुळींच न थांबतां ते बाहेर हातपाय धुण्यासाठीं गेले. हातपाय धुवून झाल्यावर कुमार आणि वसंत जेवायला बसले.

आज उमाकाकूंनीं दोघांच्या आवडीचे जिन्नस मुद्दाम तयार केले होते; जेवण चालू असताना उमाकाकू म्हणाल्या—

"काय रे, कुमार ! इन्दूला का नाहीं रे घेऊन आलास ? जोडप्यानं यायचं नाहीं असा निश्चय तर नाही ना केलात ? एरवीं नेहमीं अगदी रामसीतेसारखीं बरोबर बरोबर असतां, अन् आजच काय रे हें असं, कुमार ? काय, तिची प्रकृतिबिकृति बरी आहे ना ? काय रे ! "

"होय, अगदीं बरी आहे बरं, काकू ! मी तिला बोलावीत होतों माझ्याबरोबरच चल म्हणून, पण तीच म्हणाली कीं मी मग संध्याकाळीच जाऊन येईन काकूकडनं."

"असं का ?" म्हातारीला आनंद झाला; इन्दूचा तिला अत्यंत अभिमान वाटत असे; इन्दु दिसायला जशी नक्षत्रासारखी, तशी स्वभावानेंही अत्यंत सुंदर मुलगी आहे, ही जाणीव तिच्या मनाला अतिशय आनंद देत असे; तिच्यासारखी गुणी पोर मिळणें या जगांत कठीण आहे, असें ती नेहमीं म्हणे; कांहीं तसेंच कारण असल्याशिवाय, ती आपल्याकडे येण्याचें टाळणार नाहीं, हें तिला पक्कें माहीत होते; म्हणूनच ती पुढें कांहीं बोलली नाहीं.

जेवण होऊन, थोडा वेळ वामकुक्षी वगैरे केल्यावर, उमाकाकू कुमारांना परत जातांना म्हणाल्या—

" इन्दूला संध्याकाळीं इकडे पाठवायला विसरूं नकोस बरं. "

" नाहीं विसरायचा बरं का, काकू ! "—एवढे शब्द बोलून कुमार वसंताचा निरोप घेऊन आपल्या घरीं परत आले. वाटेंत ते सकाळीं वसंताबरोबर झालेल्या भाषणाचा विचार करूं लागले; विचार करितां करितां त्यांची खात्री झाली कीं, आपली सकाळची विचारपद्धति अगदीं बरोबर नसली, तरी चुकीची तरी खास नव्हती.

घरीं येऊन पहातात, तों इन्दु कांहीं वाचीत बसली आहे, असें त्याना आढळून आलें. कुमारांनीं हळूच तिच्यामागें जाऊन तिच्या हातांतलें पुस्तक काढून घेतलें; तिला राग आला ! पण आपणांला राग आणणारें माणूस, आपलं ' आवडतं ' माणूस आहे, हें पाहून तिचा राग पार कोठच्या कोठें पळाला !

" काकू काय म्हणत होत्या ? "— तिनें विचारलें.

" कांहीं विशेष नाहीं; तूं कां आली नाहींस म्हणून सारखी माझ्या मागं लागली होती; मीं सांगितलं संध्याकाळीं येऊन जाईल ती; तर जरा वेळानें तूं तिच्याकडे जाऊन ये बरं का "—

इतकें बोलून कुमारांनीं ती वाचत असलेल्या पुस्तकावरून सहज नजर फिरविली. तें कुमारांनीं लिहिलेलें, ' रत्नकंकण ' या नांवानें प्रसिद्ध असलेलें, नाटक होतें. याच नाटकामुळें कुमारांचें नांव जिकडे तिकडे झालें होतें. " रंगभूमीवर या नाटकाला जितका रंग चढत असे, तितका दुसऱ्या कोणत्याही नाटकाला यापूर्वी चढला नाहीं, किंवा पुढेंही चढणें शक्य नाहीं ! आणि वाङ्मयदृष्ट्याही त्याच्या तोडीचें नाटक मराठी भाषेंतच काय, पण जगांतल्या दुसऱ्या कोणत्याही भाषेंत क्वचितच् आढळून येईल ! इतकेंच नव्हे, तर अशा प्रकारचें उच्च कल्पनाविचारांनीं भरलेलें आणि दिव्य प्रतिभेनें चमकणारें नाटक, कुमारांना तरी पुन्हां लिहिता येईलच, असें खात्रीनें सांगतां येणार नाहीं. या नाटकानें जगाच्या वाङ्मयाला विलक्षण शोभा येणार आहे ! "— वगैरे वगैरे—अशा प्रकारचे कितीतरी अभिप्राय

मराठी वृत्तपत्रांतून, साप्ताहिकांतून आणि मोठमोठ्या सभांतून एकसारखे बाहेर पडत होते.

इन्दूला कुमारांची योग्यता माहीत होतीच; तरी ती या पुस्तकाच्या प्रसिद्धीनें जास्त दुणावली, यांत संशय नाहीं. कुमार म्हणजे आपल्या भाग्यानें लाभलेला एक अष्टपैलु हिरा आपल्याला सांपडला आहे, या गोड जाणीवेनें तिचें हृदय उचंबळून येत असे! अशा प्रकारची मोठी योग्यता असूनही त्याची साधी रहाणी, मोकळी वृत्ति, कोणांतही मिसळण्याची त्यांच्या मनाला असलेली आवड हे सर्व गुण पाहून, एखादी वस्तु पृथ्वीकडे ज्याप्रमाणें ओढली जाते, त्याप्रमाणें तिचें गुणज्ञ मन, त्यांच्याकडे जास्त जास्त ओढलें जात होतें!

थोडा वेळ एकमेकांच्या प्रेमळ सहवासात घालवून, साधारण तीन, साडेतीन वाजतां, इन्दु उमाकाकूंकडे जावयास निघाली.

## कुंज ३ रा.

इन्दु उमाकाकूंकडे आली, त्यावेळीं त्या ठिकाणीं वसंत नव्हता. एक पोक्त वयाची बाई व तिच्या बरोबर अठरा, एकोणीस वर्षांची एक सुंदर बालिका उमाकाकूंबरोबर बोलत बसली होती; त्यांना पाहून इन्दूच्या मनाला थोडेंसें आश्चर्य वाटलें. विशेषतः त्या बालिकेच्या भालप्रदेशावर कुंकुमतिलक तिला न दिसल्यामुळें, सुंदर वेलीवरची गुलाबकळी कुसकरून टाकल्यामुळें ती जशी दिसावी तशी ती तिला दिसली! वेलीवर पुन्हां केव्हा तरी दुसरी एखादी कळी उगवेल! पण या सुंदर कपाळावर कुंकवाची टिकली पुन्हा कधींतरी दिसणें शक्य आहे का?– नाहीं कशावरून? योगायोग असला तर तसेंही होईल, असें तिच्या मनाला वाटलें आणि त्यामुळें तिला त्या स्थितींतही आनंद झाला.

थोड्याच वेळांत उमाकाकूंनीं ती मुलगी सुशिक्षित असून, पुण्याच्या 'फर्ग्युसन' कॉलेजमध्यें ज्युनिअर बी. ए. च्या वर्गांत शिकत असल्याची माहिती इन्दूला सांगितली. त्या मुलीचे आईबाप जिवंत नव्हते; एकदोन वर्षांपूर्वी पोरकी पोर मागें टाकून, तिचे वडील हें जग सोडून गेले होते, तिची आई तिच्या लहानपणींच वारली होती. तिच्याबरोबर जी पोक्त बाई उमाकाकूंबरोबर बोलत बसली होती, ती तिची मावशी. घरची श्रीमंती असल्यामुळें कामाकाजाला उपयोगी पडेल म्हणून, तिनें त्या पोरक्या मुलीला जवळ केली होती; त्यांत प्रेमाचा संबंध कमीच होता; ही बाई फार लहरी होती; एखादे वेळीं, त्या विधवा मुलीशीं ती प्रेमानें वागे, तर दुसऱ्या एखाद्या वेळीं, एखाद्या कजाग सावत्र आईसारखी तिला ती छळीत असे; पण घरांतलें सर्व काम संभाळून, ती आपला कॉलेजांतला अभ्यास करावयाला मात्र कधीं चुकली नाहीं. बिचारीचा नवरा मरून सात आठ वर्षें झालीं होतीं; नवरा मेल्यावर, तिच्या वडिलांनीं तिला मास्तर ठेवून शिकविलें; आणि आतां ती ज्युनिअर बी. ए. च्या वर्गांत होती.

ती आणि तिची मावशी सुमारें एक महिन्यापूर्वी पुण्याला आलीं, त्यापूर्वीं तीं मुंबईला राहात असत; परंतु मुंबईची हवा त्या मुलीला आणि तिला स्वतःलाही मुळींच मानवेना, म्हणून पुण्याला कायम राहाण्याच्या इराद्यानें तीं आलीं होतीं.

उमाकाकू राहात होत्या, त्या ठिकाणापासून त्याचे बिऱ्हाड जवळच होतें. उमाकाकूंना सगळ्याचीच ओळख हवी होती, म्हणून त्यांनी या मंडळींशीं ओळख करून घेतली होती; त्यानाही उमाकाकूंनी वसंतरावांच्या वाढदिवसानिमित्त आमंत्रण केलें होतें; पण सकाळचें आपल्याला जमायचें नाही, संध्याकाळच्या वेळीं आपण येऊन जाऊं, असे तिनें त्याना कळविलें होतें.

संध्याकाळीं इन्दूही येणार असल्यामुळे, जरा बोलायसवरायला मिळेल, या आनंदात उमाकाकू होत्या.

इन्दूला इतकी माहिती मिळाली, आणि थोड्याच वेळात ती या नवीन मंडळीशीं आपलेपणानें वागूं लागली. तिचा स्वभावच असा होता की, कोणत्याही मनोवृत्तीच्या माणसाशी तिला मिळून मिसळून वागता येत असे; हवा कशी, जेथें जेथें पोकळी असेल, त्या ठिकाणी मिसळून जाते त्याप्रमाणें ! आणि यामुळें त्या विधवा मुलीशीं तिला आपलेपणानें वागायला मुळींच संकोच वाटला नाहीं, इतकेंच नव्हे, तर थोड्या वेळात, तिला त्या विधवा मुलीबद्दल सहानुभूतिपूर्ण आपुलकीही वाटूं लागली.

उमाकाकूंनीं इन्दूची त्याच्याशीं ओळख करून दिली. नंदकुमारांचें नांव साऱ्या महाराष्ट्रात ज्याच्या त्याच्या तोंडी होतेंच; त्याची ही पत्नी हें समजल्यावर विमलला—त्या विधवा मुलीला— आनंद झालाच; पण तिच्याबरोबर आलेल्या रमावहिनींनाही झाला.

थोड्या वेळांत उमाकाकू चहाफराळाचें घेऊन आल्या. रमावहिनी त्यांच्याकडे पहात पहात म्हणाल्या,—

" तुमचे वसंतराव कुठं आहेत ? "

" तो गेलाय् शाळेंत, येईल थोड्या वेळानं " उमाकाकूंनीं उत्तर दिलें.

वसंतरावांचें नांव काढतांच, विमलेचे डोळे तेजानें चमकूं लागले, आणि वृत्ति उत्सुक झाली. तिला पुण्यांत येऊन एकच महिना झाला

होता; परंतु शाळेंत जातांना त्यांच्याच घरावरून नेहमीं जात असल्या-मुळें, विमलच्या दृष्टीस बहुतेक तो नेहमींच पडत असे. वसंताचेंही हृदय तिच्याकडे ओढलें जात होतें. प्रेमाचें फूल विकसित होण्यास अमुक असा ठराविक वेळ लागतो असें नाहीं; तसेंच, नुसत्या शारीरिक सौंदर्याचीच प्रेमाला जरूरी असते असेंही नाहीं ! तसें असतें तर सुंदर अशा प्रत्येक स्त्रीवर पुरुषाचें प्रेम जडलें असतें; पण वस्तुस्थिति तशी नाहीं ! चंद्रिकेला पाहून सागर उंचबळतो; चंद्रिकेपेक्षा जास्त तेजस्वी आणि सुंदर अशा वस्तु या सृष्टींत नाहींतच का ? सुंदर तारकाही गगनांत तेजानें चमकत असतात; पण त्याच्या सौंदर्यानें सागर वेडावून जात नाहीं ! आणि तसें पाहिलें तर सृष्टिसुंदरीचा सहवास सागराला अधिक आणि जवळचा ! पण तिच्या सौंदर्यानें सागराचें अंतःकरण भाळत नाहीं, याचें कारण काय ? तर— ‘ व्यतिपजति पदार्थानान्तरः कोऽपि हेतुर्नखलु बहिरुपाधीन्प्रीतयः संश्रयन्ते ’ हेंच खरें !

या न्यायानुसार, एका महिन्याच्या अवधींत, वसंत व विमल एक-मेकांवर आकृष्ट होऊन गेलीं, इतकेंच नव्हे तर, त्याचें पर्यवसान हळुहळू प्रेमांत होऊं लागलें होतें, याची जाणीव त्यांची त्यांना तरी होती कीं नाहीं, कोण जाणें ! असो.

रमावहिनींनाही वसंत मनापासून आवडूं लागला होता; आपल्या नशि-बांत मुलगी नाहीं; तरी विमल कुमारी असती, तर आपण तिचें वसंताशीं लग्न जमविण्याची खटपट केली असती, असा एक विचार त्यांच्या मनांत सहजच येत असे !

वसंतानें रमावहिनींचीहि या थोड्या दिवसात ओळख करून घेतली होती; इतकेंच नव्हे तर, त्यांचें एखादें बाहेरचें कामही तो त्यांनीं सांगि-तल्यास करीत असे; याचें कारण दुसऱ्याला मदत करण्याची त्याची मनःप्रवृत्ति हें होय, कीं त्या निमित्तानें विमलचें दर्शन होत असे हें होय, हें सांगणें कठीण आहे; कदाचित् दोन्हींही असूं शकतील.

रमावहिनी लगेच इन्दूकडे वळून म्हणाल्या,-—

“ तुम्ही काळजांत का फाळजांत जातां कां ? आमची विमल बाईच्या वर्गांत आहे, पुरुषांच्या नाहीं बरं का !”

रमावहिनींचें हें भाषण ऐकून तिच्यासकट सर्वजणी एकसारख्या हंसूं लागल्या; तेव्हां त्या विमलकडे वळून म्हणाल्या,—

" काय ग ! मी म्हणत्यें तें खोटं का ?–काय ग बाई तरी ! काळजांत जाऊन, या पोरी काय करणार आहेत देव जाणे ! अन् हिच्यासारख्या कपाळफुटक्या पोरीला हो, मी म्हणत्यें, कशाला काळीज अन् फाळीज ? काय कुठं व्याख्यानं द्यायचींत्, का कुठं नोकऱ्याचाकऱ्या धरायच्याहेत यांना ? एक एक ऐकावं तें नवलच बाई ! आम्ही काय बायका नव्हतों का ? आम्ही नाहीं कुठं त्या शिकलों ?–मला–खोटं नाहीं सांगत बरं मी– मराठीचाही गंध नाहीं; पण केलाना आम्हीं संसार ? आतां माझ्या नशिबानं नाहीं झालीं मुलंबाळं मला, ही गोष्ट निराळी. संसार थाटाय मांडायला, काय काळजांत जावं लागतं का काय ? या उमाकाकू नाहीं कुठं काळजांत गेल्या त्या ?"

हें रमावहिनींचें भाषण इन्दूला आवडलें नाहीं, त्यामुळें ती ताबडतोब म्हणाली,—

" वहिनी ! असं कसं बरं म्हणतां तुम्ही ? तुमच्या वेळचा काळ अन् हल्लींचा काळ, यांत जमीनअस्मानाचा फरक आहे, हें तुमच्या कसं लक्षांत येत नाहीं बरं ? तुमच्या त्या काळांत, पुरुषही विशेष शिकत नव्हते; मग बायका हो कुठल्या शिकणार ? अन् शिकण्यासवरण्यावर का कुठं संसार अवलंबून असतो ? शिक्षण कांहीं संसाराचा गाडा सुरळित चालण्यासाठींच केवळ घ्यायचं नसतं. जगाच्या दृष्टीनं शिक्षणाची किंमत ठरविणं, म्हणजे उपयोगाच्या दृष्टीनं सौंदर्याची किंमत ठरविण्यासारखंच नाहीं का वहिनी ? शिक्षण, जगाच्या दृष्टीनं फार फार तर एखादी चांगली नोकरी मिळवून देईल; तीही हल्लीं कुठं मिळत नाहीं ! म्हणून शिक्षणाची किंमत कमी झाली का ? मुलगा मिळवता नसला, म्हणून तो आपल्या मातेला नकोसा होतो का ?

शिक्षणामुळं उच्च संस्कार मनावर घडतात; वृत्ति अंतर्मुख होऊन, जगाच्या बाजारांत आपली किंमत अजमावतां येते. आपले दोष, आपला कमीपणा–शारीरिक म्हणा, मानसिक म्हणा– मनाला दाखवून देणारा, मानसिक उन्नतीचें बीज अंतःकरणांत उत्पन्न करणारा, आणि ज्या दिव्य

भावना सृष्टीनं आपल्या अंतःकरणांत सांठवून ठेविल्या आहेत, त्यांचें चिकित्सक पद्धतीनें शोधन करून, त्या अडाणी अशिक्षित मनालाही आकलन करतां येतील, अशा तऱ्हेनें त्यांचें शब्दचित्र काढणारा, शिक्षण हा एक अत्यंत कुशल कारागीर आहे !

वहिनी ! मी बोलतें तें आपल्याला आवडत नसेल; कदाचित् माझी ही बडबड ऐकून तुम्हांला कंटाळाही येईल; परंतु शिक्षणाचा बायकांना काय उपयोग, असा तुम्हीं प्रश्न केलात, म्हणून मला इतकें बोलावें लागलें. शिक्षणाचा उपयोग कुणाला नाहीं, वहिनी ? प्रत्येकाला आहे; गरीब असो श्रीमंत असो, स्त्री असो पुरुष असो, विमलसारखी एखादी विधवा असो, कुमारी असो नाहीं तर एखादी सवाशीण असो, सूर्यप्रकाश अन् हवा हीं जशीं प्रत्येक प्राणीमात्राला आवश्यक आहेत, त्याप्रमाणें शिक्षण हें प्रत्येकाला पाहिजेच आहे ! सूर्यप्रकाश अन् हवा यांना किंमत पडत नाहीं, म्हणून त्याची माणसाला किंमत नाहीं ! शिक्षणाला किंमत पडते; पण मी म्हणतें, ज्याप्रमाणें प्रकाश व हवा हीं प्रत्येकाला सहजगत्या विनामूल्य मिळूं शकतात, त्याप्रमाणेंच शिक्षण हें प्रत्येकाला सहजासहजीं अन् पैशाशिवाय ज्या दिवशीं मिळेल, तो दिवस भाग्याचा !

हल्लीं शाळाकॉलेजांतून मिळणारें शिक्षण तें मी म्हणतें, खरें शिक्षणच नव्हे ! खरें शिक्षण तें कीं, ज्यामुळें मन विकसित होऊन, आयुष्यांत घडणाऱ्या प्रत्येक बऱ्यावाईट गोष्टीशीं मनाला जें समरस करूं शकतें; आहे त्यापेक्षां अधिक वरवर जाण्यासाठीं रात्रंदिवस मनांत धडपड उत्पन्न करीत असतें; आणि जें, आपल्यापेक्षां बुद्धीनें अगर इतर दृष्टींनी कनिष्ठ, अशा लोकांबद्दल सहानुभूति, दया अन् प्रेम, आणि आपल्यापेक्षां अंतःकरणानें, बुद्धीनें अन् ज्ञानानें श्रेष्ठ अशा माणसाविषयीं, अंतःकरणांत अभिमान, आनंद अन् आदर उत्पन्न करितें, तेंच खरें शिक्षण ! आणि असल्या प्रकारचें शिक्षण कुणाला नकोय् बरं वहिनी ? प्रत्येकाला पाहिजे आहे. विमलसारख्या विधवा, अनाथ मुलींना तर तें अवश्यच पाहिजे ! कारण त्यांच्या दुर्दैवी मनाला, त्यांच्या चिरदुःखाचा विरगुंळा पाहून ज्याची त्यांना अत्यंत जरूरी आहे, असें समाधान अन् शांति यांचा लाभ करून देण्याचें असल्या शिक्षणांत सामर्थ्य आहे !

विधवा म्हणजे माणूसच ना ! एक नवरा मेला, म्हणजे विधवेचें मन मेलें असें तर होत नाहीं ना ? एकाच्या शारीरिक मरणानें दुसऱ्याचें मन कसें बरें मरावें ! आपल्या धर्माची तशी शिकवण आहे खरी; पण ती समंजसपणाची आहे का ? विधवेचें अंतःकरण आणि दुसऱ्या एखाद्या विधवा नसलेल्या स्त्रीचें अंतःकरण, यांत काय बरें भेद आहे ? भेद आहे का, तुम्हीच सांगा वहिनी !"

हें इन्दूचें व्याख्यान ऐकून, रमावहिनी तर अगदीं गार झाल्या; हिच्यापुढें आपला कांहीं निभाव लागावयाचा नाहीं, हें त्या समजून चुकल्या.

इन्दूच्या मनांतून इतकें बोलावयाचें नव्हतें; पण एकदां अशा प्रकारचा औषधाचा डोस दिल्याशिवाय असल्या अर्धवट विचारांच्या म्हाताऱ्या माणसांचें पुराणप्रियतेचें दुखणें नाहींसें होणें शक्य नाहीं, हें ती समजून होती; म्हणूनच मुद्दाम ती वरच्यासारखें सडेतोड भाषण बोलून गेली.

उमाकाकूंनाही तिच्या बोलण्याचें नवल वाटलें; नवल वाटलें तसें कौतुकही वाटलें; विमलला तर तिचा अतिशय अभिमान वाटला.

शेवटीं रमावहिनी बोलल्या,—

" तुम्ही काळजातल्या पोरी; आमच्यासारख्या अडाणी रानवट माणसांना काय सांगाल अन् काय नाहीं; आम्हांला काय, चार लोक करीत आले तें करायचं, हें आमचं ब्रीद; तेव्हा म्हणतें इन्दुताई ! आमचं म्हाताऱ्या माणसांचं बोलणं नका घेऊं तुम्ही मनावर—नकाच घेऊं अगदीं."

" तसें नव्हे हो; तुमच्यासारख्या अनुभवी माणसांनीं आमच्यासारख्या अननुभवी मुलींना उपदेश करणें, आम्ही चुकत असलों तर, आम्हांला सुधारून घेणें हें योग्यच आहे; अन् तुम्ही तसंच करत जा, वहिनी ! अन् खरं सांगूं का वहिनी ! अशा उपदेशांत आम्हांला आनंदही वाटतो। बरं; किराईत कडू असलं, तरी त्याच्या काढ्यानं पोटदुखी कमी होते ना !

आपलं बोलणं लागण्यासारखं असलं तरी, तें जर सत्य असेल तर, आम्हांला तें आनंदानं ऐकून घेतलं पाहिजे; पण निरर्थक बडबड ही भर पावसाळ्यांत बागाइत जमिनीवर मुठींनीं पाणी शिंपडण्यासारखी हास्यास्पद असल्यामुळं मी तरी ती मुळींच ऐकून घ्यायची नाहीं; मी बोलतें त्याचा

राग नका मानूं वहिनी ! माझं म्हणणं चुकीचं असेल तर, तुम्ही मला बेलाशक् चार शब्द बोला.''—इन्दु रमावहिनींकडे भेदक दृष्टीनें पहात पहात बोलत होती.

इतकें बोलून होत आहे तों वसंत शाळेंतून आला; त्याच्या आगमनानें विमलच्या अंतःकरणांतील नाजूक भावना उचंबळल्यासारख्या झाल्या; आणि तिचे डोळे प्रेमाच्या तेजानें प्रकाशल्यासारखे दिसले ! पण हें प्रेमाचें तेज फक्त वसंतालाच ओळखूं आलें; कदाचित् इन्दूनेंही ओळखलें असेल.

तेथें राहावें असें मनांत वाटत असूनही विमल रमावहिनींना म्हणाली,

"वहिनी ! चला गडे ! घरीं सैंपाक वगैरे करायचाय् ना ? बराच उशीर झालाय् आतां.''

"होय ग बाई ! बोलण्यांत वेळ कसा निघून गेला कळलंच नाहीं मेलं मला; पुढें हो—मी ही आल्येंच बरं का.''

आपलेच हात आपल्याच घशांत अडकले, म्हणजे माणसाला फार वाईट वाटतें. आपण सहज म्हणून बोलावयाला गेलों,—नव्हे, मनांत तसें नसतांना बोलावयाला गेलों—आणि त्या बोलण्यांतच अडकलों, हें पाहून विमलला वाईट वाटलें; तरी न जाणें वाईट दिसेल म्हणून ती जाण्यासाठीं उठली; मनातून नसलें तरी जनाला दाखविण्यासाठीं तिला उठणें भाग होतें.

विमल उठून जाऊं लागली, तसा वसंताचा जीव कासावीस होऊं लागला; तेव्हां कांहीं तरी सबब सांगून कसाबसा घाईघाईत चहा घेऊन तो बाहेर पडला.

विमलला त्यानें थोड्याच अंतरावर गांठली; वसंताला जवळ पाहून तिला कसेंसेंच झालें !

"आज कॉलेजांतनं केव्हाशा आलांत् ?'' वसंतानें प्रश्न केला.

"आज मला दोन वाजल्यानंतर 'पिरियड'च नव्हता, त्यामुळं घरीं मी लौकरच आलें; पण, आपण बाहेरून इतक्यांतच आला, अन् ताबडतोब पुन्हां बाहेर आपल्याला कसं बाई निघवलं ! शाळेंतल्या कामानं

आपल्याला कांहींच का त्रास झाला नाहीं ! माणसाला जरा तरी विश्राति पाहिजे, नको का ?"

" पण शरीराला शीण देण्यांत मनाला विश्रांति दिल्यासारखी होत असली तर ?"—

हा प्रश्न करून वसंत कौतुकानें विमलकडे पाहूं लागला; विमलला या प्रश्नाचा अर्थ कळला होता, त्यामुळें तिची फार धादल उडाली; तरी आपल्याला त्यात कांहीं समजलेंच नाहीं असा आविर्भाव करीत ती म्हणाली—

" याचा बाई अर्थ मला कांहीं कळला नाहीं."—तिचा खोटें बोलण्याचा प्रयत्न निष्फळ झाला; वसंतानें ते ओळखलें म्हणून तो म्हणाला,

" झोंपलेल्याला जागं करता येईल; पण झोपेचं सोंग घेतलेल्याला कोण कसा जागा करणार ?"

" म्हणजे काय बाई ?" विमलनें हंसत हंसत प्रश्न केला.

म्हणजे काय, ते स्पष्ट करावें असें वसंताच्या मनांत आलें; पण त्यानें आपलें मन आवरलें. आपली हिची फार फार तर दीड दोन महिन्याची ओळख; त्यांतून ती हिंदु जातींतील एक अभागी विधवा मुलगी ! तेव्हां आपला मनोदय त्यानें तिच्याजवळ उघड केला नाही; तरी प्रेमाच्या बाबतींत मुक्यानें जें काम होतें, तें तोंडाच्या बडबडीनें होत नाहीं; आणि यावेळींही तसेंच घडलें.

विमल समजून चुकली कीं, वसंताचें आपल्यावर प्रेम जडूं पहात आहे; पण यांत तिला मुळींच वाईट न वाटतां आनंदच झाला. त्यांच्या प्रेमाला आडकाठी म्हणजे तिचें वैधव्य होय ! पण जगात विधवेला प्रेम करतां येत नाहीं का, किंवा करावेंसें वाटत नाहीं का ? आणि प्रेम केल्यास त्याची पूर्तता होऊं शकत नाहीं का ?

तो विषय तसाच लोंबकळत ठेवून वसंत विमलला म्हणाला,—

" बाजारांतनं कांहीं आणायचं आहे का ?"—

बाजारांतनं ' कांहीं का ?' बरेंच आणावयाचें होतें; पण तसें त्याला सांगणें तिच्या जिवावर आलें, म्हणून ती स्तब्ध राहिली.

" कां बोलत कां नाहींस ?" वसंतानें तिला विचारलें.

विमल म्हणाली,–" आणायचं आहे की बरंच; पण आपण नका आणूं; शिवाय आपल्याला आणायला सांगायला मला अधिकारही नाहीं; वहिनींना कळेल हें, तर मला उभ्या जाळून खातील ! आपण कांहीं आणूं नये, अन् बाहेरही जाऊं नये; वहिनी येसतोंपर्यंत इथंच बसाना !"

" शाबास ! म्हणजे बाहेर जाऊन येतों, म्हणून काकूंना सांगून आलों तें, ' हेंच का बाहेर जाणं ?' म्हणून वहिनींनींच मला विचारलं, तर मी काय उत्तर देऊं त्यांना ? तसं पाहिजे तर बसतों थोडा वेळ."

असें म्हणून विमल काम करीत असतांना वसंत तिच्याजवळ बसून राहिला; तितक्या वेळांत तिनें त्याला चहाही करून दिला; इतक्यात रमावहिनींच्या पाऊलाची चाहूल लाबून ऐकूं आली; पण त्यावेळीं वसंत तेथें कोठें होता ? तो बाहेर रस्त्यावर भटकत होता !



# कुंज ४ था.

आकाशाच्या लताकुंजात, ढगांच्या झुडपांआड लपतछपत, प्रीतीचे नाजूक लपंडाव खेळणाऱ्या तारकासुंदरींचें स्वर्गीय सौंदर्य मनोवेधक तर खरेंच! पण त्यांतल्यात्यांत, अखिल विश्वाला आपल्या अद्वितीय आणि दिव्य अशा लावण्यमोहनीनें वेड लावणाऱ्या शुक्राच्या चादणीचा थाटमाट काय अगदीं वेगळाच!! तिच्या डोळ्यांची तेजस्वी चमक, मुखावरचें मंजूळ हास्य, तिचें सहजमनोहर पदलालित्य आणि तिच्या प्रीतिरम्य हृदयाचे मुग्ध मधुर हावभाव, यामुळें ती जशी इतर नक्षत्रसमूहांत उठून दिसते, त्याप्रमाणें सुंदर कुसुम 'लेडीज् रेसिडेन्सीं'तल्या इतर विद्यार्थीनींच्या घोळक्यात चमकत असे!!!

स्वर्गीय सुगंधाने हवा दरवळून जावी तद्वत् तिच्या दिव्य सौंदर्यानें भोंवतालचें वातावरण भारून जात असे! संथ अशा जलाशयाच्या मुखावर तरंगलहरी उठाव्या, तशा तिच्या गंभीर मुखावर कधींकधी हास्यलहरी उमटत असत; त्यावेळीं तिच्या सुंदर मुखाची शोभा रम्य चांदण्यांत वाऱ्यानें जिच्या अर्धस्फुट कोमल पांकळ्या कंपित होत आहेत अशा गुलाबकलिकेच्या शोभेप्रमाणें भासत असे!!!

ज्युनिअर बी. ए. चें वर्ष असल्यामुळें, अभ्यासाच्या पुस्तकाकडे तिनें पाठ फिरविली होती; तिच्या खोलींत एकदम नजरेंत भरण्यासारखी अशी वस्तु म्हणजे मराठी, संस्कृत व इंग्रजी वाङ्मयांतील अत्युत्कृष्ट अशा पुस्तकानीं भरलेलें कांचेचें एक लहानसें सुंदर कपाट. त्या कपाटावर "माझा आवडता वाङ्मयसंग्रह" अशी सुंदर अक्षरांनीं लिहिलेली खूणचिठ्ठी (label) त्या कपाटाच्या सौंदर्यांत भर घालीत होती.

कुसुमला वाचनाचा अतिशय नाद होता; उच्च प्रकारच्या वाङ्मयवाचनांत, ती तासचे तास घालवीत असे. सुंदर खेळण्यांचा लहान मुलांना मोह पडावा, तसा सुंदर पुस्तकांचा तिला पडत असे.

आता सुद्धां महाराष्ट्रांत बोलबाला होत असलेलें नंदकुमारांचें 'रत्न-

कंकण ' नाटक ती वाचीत बसली होती. वाचनांत ती इतकी तल्लीन झाली होती कीं, तिच्या खोलींत धांवत धावत येत असलेल्या तिच्या मैत्रिणीची तिला चाहूलही लागली नाहीं.

वाचनांत गढून गेलेल्या कुसुमकडे कौतुकानें पहात रोशन म्हणाली,—

" काय ग ! पुन्हा पुन्हां किती वेळ ते पुस्तक वाचत राहाणार राहेस ? "—

" आयुष्यभर वाचीत राहिलं, तरी त्याची गोडी कमी व्हायची नाहीं, रोशन ! या खिडकींतून दिसणारं हें अफाट आकाश, अनंत कालपर्यंत विश्वाच्या संसाराचं नाटक वाचीत बसलं आहे, तरी त्याच्या अंतःकरणाची तृप्ति झालीय् का ! "—

आपल्या आवडत्या माणसानें लिहिलेल्या पुस्तकाचा अभिमान मनाला वाटावा, तशा प्रकारच्या अभिमानानें कुसुमनें उत्तर दिलें.

" तें पुस्तक आतां ठेव बाजूला, अन् मी काय दाखवितें तें पहा. "

असें म्हणून रोशननें ' बलवंत ' मासिकातून आलेली कुसुमची "चित्त-चोर " ही कविता तिला दाखविली, आणि लागलीच ती तिला म्हणाली,—

" हा चित्तचोर कोण ग ? त्या दिवशीं प्रोफेसर दासच्या जलशाला आपण गेलों होतों, नाहीं का ? त्यावेळीं तुझ्या मनाला ज्यानें भुरळ पाडली, तो सुंदर तरुणच का ग हा चित्तचोर ? त्या ' चित्तचोरा '—नं खरोखरीच की ग तुझं अंतःकरण चोरलंय् ! नाहींतर तुझा एवढा आनंदी स्वभाव, अलीकडे इतका एकलकोंडा कां ग बनावा, कुसुम ? साध्यासुध्या गोष्टीनं, असा एकदम तुझा स्वभाव बदलणं शक्यच नाहीं; तसं म्हटलं, तर त्या तरुणाच्या वागणुकींत, चर्येत अशी कांहीं एक प्रकारची चित्ताकर्षता होती कीं, तुझ्यासारखी भावनाप्रधान मुलगीच काय, पण एखादा भावनाशून्य रानवटही त्यानं मोहून जावा ! जगांत सुंदर तरुण कांहीं थोडे नाहींत; पण त्या तरुणाच्या मुखावर खेळणारी, हृदयाला व्याकुळ करणारी प्रसन्नता इतरत्र क्वचितच् आढळून येते ! पण असं

भलत्या गोष्टीचं वेड लावून घेऊन मन असंतुष्ट करून घेणं, कुसुम ! तुला शोभतं का ग ! ”

“ मला शोभतं का नाहीं, तुला काय करायचं ग ! ”—

कुसुम जन्मांत कधीं असें दुसऱ्याला लागून बोलली नव्हती; पण त्या दिवशीं ‘ किर्लोस्कर ’ थिएटरमध्यें, प्रोफेसर दासांच्या गायनाच्या वेळीं, तिच्या समोरच बसलेल्या नंदकुमाराना पाहून, ती वेडी होऊन गेली ! त्या दोन तीन तासांत, तिचें गाण्याकडे मुळींसुद्धां लक्ष नव्हतें ! अंतःकरणांत कुमारांची मनमोहन मूर्ति, जें प्रीतीचें संगीत गात होती, तें ती जीवाचे कान करून ऐकत होती ! त्या दिव्य संगीतानें, ती डोलूं लागली, आणि त्यांतच तिच्या अंतःकरणाची प्रेमसमाधि लागली ! रोशननें त्यावेळीं हळूच तिला चिमटा घेऊन, ‘ कसं काय गाणं आहे ग ! ’ असें विचारावें, व तिनें ‘ वा ! छान आहे ग ! ’ असें म्हणावें, असें चाललें होतें; याची आता रोशनला आठवण झाली.

प्रेमाचा प्रभाव अजब आहे, हें तिला कळत होतें; पण तो इतका अजब असेल, अशी तिची कल्पना झाली नाहीं ! प्रेम जडावयाला थोडासा तरी सहवास पाहिजे; तसें कांहीं एक नसतां, केवळ तासा दोन तासांच्या अवधींत, उभ्या जन्माची ओळख असावी त्याप्रमाणें, कुसुमचें हृदय त्या तरुणाकडे आकर्षिलें जावें, याचें खरोखरच तिला आश्चर्य वाटलें ! तथापि तिला कुसुमच्या नाजूक भावनांची जाणीव झाली; त्यामुळें वर दिलेल्या तिच्या त्रासिक उत्तरानें तिला वाईट वाटलें नाहीं; उलट ती हंसत हंसत, कुसुमला म्हणाली,—

“ मी बाहेर जाऊं का ग, कुसुम ! ”

आई रागावल्यावर लहान मूल जशी मुद्रा करील, तशी मुद्रा करून कुसुम म्हणाली,—

“ नको गडे ! रोशन ! अलीकडे माझं चित्तच कसं तें मुळीं ठिकाणावर नाहीं ! त्याला मी काय करूं ग ! माझ्यावर रागावूं नको गडे ! नाहीं ना रागावलीस ! मला हा भार आतां मुळींच सहन होत नाहीं ग ! ”

असें म्हणून कुसुम खरोखरच लहान मुलाप्रमाणें रडूं लागली ! रोश-

नर्ने आईसारखी तिला जवळ घेऊन तिचें सांत्वन करण्याचा प्रयत्न केला; पण तो पूर्णपणें सिद्धीस गेला नाहीं. थोडा वेळ कोणी कोणाशीं बोललें नाहीं ! खोलींत जिकडे तिकडे शांत होतें ! घड्याळाची 'किट् किट्' तेवढी त्यांच्या हालचालींकडे लक्ष न देतां, या शांततेचा भंग करीत होती !

कुसुमच्या हृदयाची धड् धड् रोशनच्या अंतःकरणाला आपल्या अंतर्यामींची तळमळ निवेदन करण्याचा प्रयत्न करीत होती; त्या निवेदनाचा अर्थबोध झाला म्हणून कीं काय, रोशन कुसुमला म्हणाली,—

"पुढं काय करायचं ठरवलंयस् ग तूं, कुसुम?"

"ठरवायचं काय? दैवानंच अगोदर ठरवल्या गोष्टींत, मी काय आणखीन् ठरवणार? रोशन! तूं मला हांस, नाहींतर चंचल म्हण, पण मी तुला अगदीं स्पष्टच सांगतें कीं, त्यांना त्यावेळीं मी जे पंचप्राण अर्पण केले, ते अगदीं कायमचेच केले! एकदां दिलेलं दान सत्यप्रतिज्ञ माणूस, मरण आलं तरी परत माघारीं घेत नाहीं, त्याप्रमाणेंच एकदां केलेलं पंचप्राणांचं दान, परत मागं घेणं माझ्या हातांत नाहीं! माझ्या मनावरच जिथं माझी मालकी राहिली नाहीं, तिथं मी काय करूं बरं, रोशन?

पुढं होणाऱ्या गोष्टींची नुसती जाणीवही न देतां, दैव जीवाला जन्माला घालतं! ही जाणीव जर जीवाला असती, तर पुढं होणाऱ्या बऱ्यावाईट गोष्टीबद्दल, त्यानं आपल्या मनाची तयारी तरी करून ठेवली असती! पण दैवाची तशी इच्छा नसते. वर्षाकालीं आभाळांतनं भळभळ खालीं पडणाऱ्या पावसाच्या थेंबाला, आपण थोड्या वेळानं शिंपल्यापोटीं जन्म घेऊन रत्नाप्रमाणं चमकूं, किंवा गटारांत पडून, गटारगंगेतलं पाणी म्हणवून घेऊं, याची मुळींसुद्धां जाणीव नसते! आणि पुढं होणाऱ्या बऱ्यावाईटाची ही जाणीव दैवानं न दिल्यामुळंच, आयुष्य हें सहारा वाळवंटासारखं न वाटतां, नंदनवनासारखं भासूं लागतं!

वस्तुतः आयुष्य हें निर्भेळ पाण्याप्रमाणं स्वच्छ आणि निर्विकार आहे! पण पूर्वकर्मानुसार घडणाऱ्या बऱ्यावाईट घटनांचा रंग त्यांत मिसळत असल्यामुळं, आयुष्याचा रंग बरावाईट दिसूं लागतो! रोशन! मी तुला विचारतें,—एका हृदयानं दुसऱ्या हृदयावर प्रेम करणं, म्हणजे पाप आहे का ग? प्रेम करणं हें पाप असेल तर, मी म्हणतें, जन्मास येणं हेंच मुळीं

पाप आहे! लता वृक्षावर प्रेम करतात; मेघ बिजलीच्या सौंदर्यानें वेडे होतात; सागराच्या लाटा किनाऱ्याचं चुंबन घेण्यासाठीं, धांवत पळत सुटतात; विशाल गिरिडोंगर आकाशसुंदरीच्या मोहनीनं भाळून जाऊन, तिच्या मुखाकडे टक लावीत आज हजारों वर्षं एकाच ठिकाणीं स्थिर राहून, तिच्या प्राप्तीसाठीं तपश्चर्या करीत आहेत! वायु लतावेलींचं चुंबन घेण्यासाठीं एकसारखी धांवपळ करीत आहेत!— हें सारं कशासाठीं?— तर यच्चयावत् चराचर वस्तुमात्राच्या अंतःकरणांत ही जी दिव्य प्रेम-भावना सृष्टिकर्त्यानं निर्माण केली आहे, ती प्रेमभावना तृप्त करण्या-साठींच ना?"—

प्याला कांठोकाठ भरला, म्हणजे साध्या हालचालींनेंही त्यांतील पाणी बाहेर सांडूं लागतें! तद्वत् प्रेमाच्या भावनामृतानें हृदयाचा प्याला कांठोकांठ भरून राहिल्यामुळें, रोशनच्या साध्या भाषणानेंही, कुसुम अंत-रींचें प्रेमामृत बाहेर ओतूं लागली! कुसुम ही अत्यंत भावनाप्रधान, काव्यमय अंतःकरणाची बालिका आहे, हें रोशनला पूर्णपणें माहीत होतें, परंतु तिच्या अंतःकरणातील त्या भावना व तिच्या हृदयाची काव्यमयता इतक्या उत्कटतेला पोंहोचली असेल, हें तिच्या स्वप्नींही नव्हतें! यामुळें प्रत्यक्ष परमेश्वर जवळ उभा राहिलेला पाहून भाविक भक्त त्याच्याकडे जसा पाहील, त्याप्रमाणें ती कुसुमच्या तोंडाकडे, 'आ!' करून पाहूं लागली!

आश्चर्याचा ओघ ओसरल्यावर रोशन तिला म्हणाली,—

"प्रेम ही भावना अत्यंत उच्च आहे, हें मी काय, कुणीही कबूल करील. आमचंही मन प्रेमामुळं उचंबळून येतं, नाही असं नाहीं; पण नुसत्या क्षणमात्राच्या दर्शनानं, एखाद्या तरुणाला आपलं हृदयसर्वस्व अर्पण केल्याचं, तुझ्याशिवाय दुसरं उदाहरण मला कुठं आढळलं नाहीं!"

"रोशन! काय ग बोलतेस तूं हे! अंतःकरणात जी भावना उत्पन्न होते, ती उत्पन्न व्हायला क्षणापेक्षां जास्त अवधि कधींच लागत नाहीं! माणसाला राग येतो, तो एका क्षणांतच! रावाचा रंक, रंकाचा राव, पाप्याचा परमेश्वर, कुलांगनेची कुलटा!– हीं जीं स्थित्यंतरं होतात, त्याला एका क्षणापेक्षां अधिक वेळ लागतो का?— मग प्रेमोद्भव एका क्षणांत

झाला तर, त्यांतच मात्र आश्चर्य करण्यासारखं काय आहे !

आकाशांत सौंदर्याच्या तोऱ्यांत चमकणाऱ्या तारकेच्या आयुष्याची माती होते, ती एका क्षणांतच ! आकाश बिजलीच्या मादक सौंदर्यानं वेडं होऊन, अखेर प्रेमनिराशेनं अश्रु ढाळतं, तें एका क्षणामुळंच नाहीं का !—आयुष्य हा एक ठराविक काळ नसून, सागर जसा थेंबाथेंबाचा साठा आहे तसा, तो एक क्षणाक्षणाचा जमाव आहे ! अन् अशा या आयुष्यांत जी घटना घडते, तिला एका क्षणाची कालमर्यादा अगदीं पुरे आहे ! ”

“ तुझं म्हणणं मी कबूल करतें, कुसुम; पण एका क्षणामुळं प्रेम उद्भवणं शक्य मानलं तरी, सुज्ञ माणसानं त्या क्षुल्लक क्षणाच्या मोहासाठीं, बाकी इतर गोष्टींचा विचारच करायचा नाहीं का !—स्थळकाळाची, योग्यायोग्यतेची, समाजनियमांची, धर्मबंधनांची माणसानं मुळीं पर्वाच करायची नाहीं, असं तुझं म्हणणं का ! केवळ एका प्रेमासाठीं या सर्वांना त्यानं पायाखाली तुडवणं योग्य होईल का ! ”—

“ शरीराच्या अंधारकोठडींत डांबून ठेवल्यामुळं, जीवात्म्याला भविष्यत्-कालांत घडणाऱ्या प्रसंगांची कल्पनाही नसते; तशी कल्पना करून घेण्याची त्याला इच्छाही होत नाहीं, अन् झाली तर, ती त्याची इच्छा पुरी होणं शक्यही नाहीं ! त्याप्रमाणंच प्रेमपाशात गुरफटलेल्या अंतःकरणाला, प्रीतिविषय, अन् त्या प्रीतिविषयाविषयींचं प्रेम, या दोन विषयाशिवाय अलीकडे पलीकडे विचार करण्याची अंगांत ताकद नसते ! तसा विचार करण्याची त्याला इच्छाही होत नाहीं, अन् यदाकदाचित् झालीच तर, ती कधीं पुरी होत नाहीं !

चसचसला प्रकाश देणं, एवढंच सूर्याला ठाऊक, त्याप्रमाणें प्रीतिविषयावर प्रेम करणं, हेंच एक प्रेमी जीवाला माहीत असतं !

पुढ्यांत दिसेल त्याला त्याचं रूप दाखविणं, हा जसा आरशाचा स्वभावधर्म, त्याप्रमाणं आपल्या प्रिय माणसावर प्रेम करणं, हा प्रेमिकाचा धर्म आहे !

तुफान दर्या खळबळून गर्जना करो, किंवा पांचावर धारण बसविणारे धरणीकंप लाखों देश बेचिराख करोत; निशामाता सृष्टिसोनुल्याला ‘चंदेरी’

जलाचं मंगलस्नान घालो, किंवा काळोखाच्या कड्यावर कपाळमोक्ष होऊन तारकाबाळें खालीं जगाच्या दरींत कोसळून पडोत; सृष्टीच्या संसारांत दिवसाचा मंगल वाढदिवस असो, नाहींतर रात्रीचा अशुभ अंत्यविधीचा प्रसंग असो!—काळाला त्याची काडीचीही पर्वा नाहीं!— आपला मार्ग आक्रमणं हाच त्याचा ठराविक क्रम!—त्याप्रमाणं, प्रेमाला प्रेमाच्या मार्गानं जाणं, याशिवाय दुसऱ्या कोणत्याही गोष्टीची पर्वा नाहीं!"

कुसुमच्या डोळ्यांत चमकणारें दिव्य तेज पाहून, रोशननें खालीं मान घातली!

थोडया वेळानें रोशन बोलूं लागली,—

"अशा भयंकर कल्पनांनीं, तुझ्या आयुष्याला कडवटपणा कसा ग येत नाहीं? काय तुझे हे विचार, अन् काय ह्या कल्पना! अशा काव्य-कल्पनांनीं तुझ्या मनाला समाधान तरी मिळतं का ग?"

"रोशन! माझ्या बाबतींत ईश्वरानं हृदयाची अशी ठेवण केली आहे कीं, त्यांत उत्पन्न होणाऱ्या सगळ्याच भावना अत्यंत तीव्र अशा आहेत! माझं अंतःकरण जितकं काव्यमय आहे, तितकंच तें कठोरही आहे! माझ्या मनावर प्रेमाचा जसा पूर्ण ताबा आहे, तसा त्या प्रेमाच्या वाटेंत येणाऱ्या अडीअडचणींना न जुमानणारा कठोर करारीपणाही आहे, याचा अनुभव तुला लवकरच येईल बरं का, रोशन!

वीज अंधारांत प्रकाश द्यायला कारणीभूत होते, तर वाटेल त्या वस्तूची राखरांगोळी करण्याचेंही तिच्यांत सामर्थ्य आहे, समजलीस ना?"

कुसुम निश्चयी स्वरांत बोलत होती.

"मग तुझं म्हणणं असं दिसतं कीं, ज्या माणसाचं नांव गांव माहीत नाहीं; ज्याला दोन, तीन तासांपेक्षां अधिक वेळपर्यंत पाहिलं नाहीं, ज्याच्याशीं बोलण्याचा प्रसंग एकदांसुद्धां आला नाहीं, अशा एका अनोळखी, अपरिचित माणसाला, त्याच्यावर प्रेम करून, अन् त्याला आपल्यावर प्रेम करायला लावून, प्रेमानं आपल्या मालकीचा करायचा, असंच ना तुझं म्हणणं? पण हें तुला शक्य वाटतं का ग, कुसुम?"

"पाह्यचं शक्य आहे कीं नाहीं तें!"—हें बोलतांना कुसुम गंभीर दिसत होती.

" पण काय ग ! त्या तरुणाला तुझ्या अस्तित्वाचीच मुळीं जाणीव नसली तर ! "

" तर !–तर !–तर काय, हा एक प्रश्नच आहे; पण हा प्रश्न मला भेडसावीत नाहीं ! मरणाची भीति मर्त्यलोकींच्या माणसाला ! ती अनादि, अनंत अशा आदितत्त्वाला नाहीं ! ! त्याप्रमाणं या प्रश्नाची मला मुळींच भीति वाटत नाहीं, रोशन ! "—

कुसुमच्या बोलण्यांत आतां तात्त्विकपणा येत चालला होता.

" बरं, त्या तरुणाचं अगोदरच लग्न झालं असलं तर–तर कुसुम काय ग करणार तूं ? " –रोशननें हा प्रश्न मुद्दाम केला.

"त्याचीही मला पर्वा नाहीं ! त्यांचें माझ्यावर, माझ्या कलासौंदर्यामुळं अंतःकरणापासून प्रेम बसल्याची माझी खात्री झाली तर, तर या मर्त्य जगांतल्या समाजानं, रूढीनं अगर कायद्यानं घातलेल्या कोणत्याही बंधनाला न जुमानतां मी त्यांची होईन, अन् त्यांना माझे करीन ! तसं मला न करतां आलं, तर या माझ्या निरुपयोगी जीविताचा, निरुपायानं, शेवट करायलाही मी मागं पुढं पाहणार नाहीं, याची तुला खात्री असूं दे बरं का, रोशन !—"

हें सर्व बोलत असतां कुसुमच्या डोळ्यांतून एकसारखे अश्रुबिंदु खालीं सांडत होते ! त्यामुळें, पानाआडून कळ्या गळून पडत असतांना जाईची वेल जशी दिसावी, तशी ती दिसत होती !

थोडा वेळ तिला एकटी सोडल्याशिवाय तिचें अंतःकरण शांत होणार नाहीं, या विचारानें रोशन तात्काळ दुसरीकडे निघून गेली. —



## कुंज ५ वा.

खोलीला लागून असलेल्या गच्चीवर चांदण्यांत जाऊन घटकाघटका बसणें, हा नंदकुमार व इन्दु यांचा बहुतेक ठरलेला कार्यक्रम होता; आजही त्याप्रमाणें तीं चादण्यांत पलंग टाकून बसलीं होतीं.

आकाश अगदीं निरभ्र होतें; त्यामुळें जणूं काय एखादा सुंदर आरसाच आपलें रूप पाहण्यासाठीं सृष्टिसुंदरीनें वर टांगून ठेविला आहे, असा भास होत होता! समोरील उद्यानांतील सुंदर फुलांचें वरच्या आरशांत तारकांच्या रूपांत प्रतिबिंब पडलें होतें! स्वतः सृष्टिसुंदरीच्या सुंदर मुखचंद्राचें प्रतिबिंब त्यांत चंद्ररूपानें शोभत होतें तें पाहून, आपल्या अलौकिक मुखसौंदर्याचा तिला अत्यंत अभिमान वाटला, आणि तिचें अंतःकरण आनंदसागरांत पोहूं लागलें! त्या दिव्य आनंदाचे फवारे, शीतल वाऱ्याच्या रूपानें दशदिशा दरवळून टाकीत होते!

त्या दिव्य सृष्टिसौंदर्याचें नंदकुमार व इंदु अगदीं अनिमिष नेत्रांनी दर्शन घेत होतीं; त्या दर्शनानें अंतरंगींच्या नाजुक वृत्ति उचंबळून आल्यामुळें कुमारांनीं इन्दूला आपल्या अंतःकरणाजवळ धरिलें, आणि तिचें प्रेमभरानें चुंबन घेतलें! तिच्याही मनोवृत्ति उचंबळल्या होत्या, तरी स्त्रीसुलभ लज्जेनें ती त्यांना म्हणाली,—

"नकोना! कुणी पाहील गडे!"

"इथं कोण ग कशाला पाह्यला येतोय्?" कुमार हंसत हंसत म्हणाले. "प्रत्येकाला आपला उद्योग आहे कीं नाहीं?"

यावर इन्दु म्हणाली,— "कुणींच नाहीं का? वर पाह्यचं, त्या तारका आपल्या ह्या प्रेमलीला पाहून आपसांत कशा डोळे मिचकावताहेत त्या! त्यांची तरी थोडी लाज असायची!"

"छान! त्याना आपल्या प्रेमलीला पाहण्याशिवाय दुसरा उद्योगच नाहीं का? त्या डोळे मिचकावताहेत, त्या आपल्याकडे पाहूनच कशावरून ग? चंद्राच्या सौंदर्यानं भाळून गेल्यामुळं त्यांच्या मनांत उद्भूत झालेल्या प्रेमाचं तेज, असं त्यांच्या डोळ्यांतनं बाहेर सांडत असेल! किंवा निशासुंदरी आणि

चंद्र, यांचा प्रेमविलास पाहूनही कदाचित् त्या डोळे मिचकावीत असतील ! असल्या दिव्यलोकींच्या रहिवाशांचं आपल्यासारख्या मर्त्यलोकींच्या माणसां-कडे कशाला लक्ष जाणार आहे ! ”

“ म्हणूनच का या दिव्य अप्सरा मर्त्यलोकींचे मुशाफर जे दगड त्यांच्या नादानं या जगाच्या जंगलांत वनवास पत्करत असतात ? देवाघरचा तेजस्वी दंवबिंदु या जमिनीवरच्या फुलवंतीच्या सौंदर्यानं वेडा होऊन, तिच्या हृदयावर प्रेमानं मान टेकण्यासाठीं, स्वर्गीय नंदनवनाचा त्याग करून या मर्त्यलोकीं धडपडत येतो, तो कशाला बरं ? ”

“ हें सारं दिव्य प्रेमासाठीं ! दिव्याच्या नंदनवनांत रमण्याबागडण्यासाठीं ! दुसऱ्यांच्या प्रणयलीला पहाण्यासाठीं नव्हे बरं का ! ”—

—कुमार इन्दूला चिडविण्यासाठीं बोलले.

“ प्रेमासाठीं किती स्वार्थत्याग बरं हा ? ”—इन्दु कुमाराच्या मुखा-कडे पहात पहात म्हणाली.

“ लाडके ! तूं नाहीं का माझ्या प्रेमासाठीं आपल्या आईवडिलांना, घरादाराला सोडून माझी झालीस ? हा इतका स्वार्थत्याग तूं केलास, तो माझ्या प्रेमासाठींच ना ? ”

“ माझा कसला स्वार्थत्याग ? स्वार्थत्यागाचं स्वरूप इतकं साधं अन् सहजसाध्य असेल तर, जगांतील प्रत्येक गोष्ट स्वार्थत्यागाच्या सदरांत मोडेल ! अन् स्वार्थत्यागाची किंमत, जगाच्या बाजारात, कवडी इतकी ठरेल ! नाहीं का ? आपलं काय म्हणणं आहे ? ”

“ मग काय तर ? माझ्या प्रेमासाठीं, याही पलीकडे स्वार्थत्याग करायला तूं तयार आहेस का ?–बोल ”

आपल्या मनांत इतके दिवस घोळत असलेली गोष्ट इन्दूला सांगायला ही संधि बरी आहे असें कुमारांना वाटलें !

“ माझं आपल्यावर निःसीम प्रेम असेल तर, आपण सांगाल तें करा-यला, मी आनंदानं तयार झालं पाहिजे; सांगायचं मी काय करूं तें; आपण सांगाल तें करण्याची माझी तयारी आहे,— खरंच सांगायचं गडे मी काय करूं तें–सांगायचं ना ! ”

कुमारांना आपल्या पत्नीचें कौतुक तर वाटलेंच; पण त्यांत आनंदी अभिमानाची छटा अधिक होती !

" इन्दु ! या लतावेली पाहिल्यास का ? त्या वृक्षांना प्रेमानं आलिंगन देतात; पण त्यांचं हृदय वातस्पर्शानं कंपित होत नाहीं का ? प्रेमळ सागर सरितेला हृदयांत स्थान देतो; तरी पण धवल चंद्रिकेच्या उज्वल सौंदर्यानें वेडा होऊन, तिला हृदयाजवळ कवटाळण्यासाठीं, त्याचे हात लाटांच्या रूपानं धडपडत असतात ना ? नाजूक कलिका भ्रमराला आपलं तनमन-धन अर्पण करितात;—तरी रविकराच्या प्रेमस्पर्शानं त्यांचं प्रेमळ हृदय मुग्ध होतेंच ना ? मानवी अंतःकरणही असं विविधतेनं नटलं आहे ! इंद्रधनुष्यांत ज्याप्रमाणं निरनिराळे रंग दृष्टीस पडतात, किंवा त्यातला एकच रंग निरनिराळ्या छटा धारण केल्याप्रमाणें दिसतो, त्याप्रमाणें मानवी मनांत निरनिराळ्या भावना निवास करून असतात, आणि कधीं कधीं एकच एक भावना निरनिराळ्या रूपानं व्यक्त होण्याचा प्रयत्न करीत असलेली दिसून येते ! मनाचें इंद्रधनुष्य निर्माण व्हावयाला काव्यमयतेच्या उन्हात स्निग्ध सौंदर्याच्या पाऊसधारांचें प्रतिबिंबच काय तें पडलें पाहिजे, नाहीं का ! "

" असं कुणाच्या सौंदर्याचं प्रतिबिंब आपल्या काव्यमय अंतःकरणांत पडलं आहे कीं काय ! असंच वाटतं मला; हे चारपाच दिवस मला असाच संशय येऊं लागलाय् ! खरं सांगायचं गडे ! आपलं कुणावर प्रेम-बीम तर जडलं नाहीं ना ! माझी खात्री आहे कीं, दिव्याच्या नंदन-वनांत फुलपांखरांसारखं वागडण्याची आकांक्षा धरणारं आपलं अंतःकरण नुसत्या शारीरिक सौंदर्याच्या फुंकरानं हालायचं नाहीं! शरीरसौंदर्याच्या पलीकडचं, दिव्यत्त्वांत नांदणारं असं जें मनोमय सौंदर्य त्या सौंदर्याच्या झुळझुळत्या वातसंगीतानंच हालली तर आपल्या हृदयाची फुलवेल हालेल, याची मला पुरेपूर खात्री आहे ! अन् अशा तऱ्हेचं मर्त्य जगांत क्वचित्च आढळून येणारं भावनाज्ञेय स्वर्गीय सौंदर्य आपल्या दृष्टिपथांत आलं असेल, तर तें अखिल स्थिरचर भरून राहिलेल्या चैतन्यकारंजांतून झुळझूळ वाहणाऱ्या जलाचा मर्त्यजगीं दुर्मिळ असा एक लहानसा तुषार, या

दृष्टीनं पवित्र अन् दुर्मिळ म्हणून, मी माझ्या मस्तकावर शिंपडून घ्यायला उतावीळ झालेय् ! ''

कुमारांचें-आपल्या परमप्रिय कुमारांचें—दुसऱ्या एका सुंदर स्त्रीवर, तिच्या दिव्यतम अशा सौंदर्याकर्षणानें, प्रेम बसूं पहात आहे, या नुसत्या कल्पनेनेंच तिला या मर्त्यजगाचा व स्वतःचा विसर पडला ! किती झालें तरी ती एक स्त्रीच होती ! सूर्यप्रभेला चंद्रिकेचें दर्शन जसें सहन होत नाहीं, तद्वत स्त्रीहृदयाला, प्रेमाच्या बाबतींत, दुसऱ्या स्त्रीहृदयाच्या रूपांत प्रतिस्पर्धी असलेला मुळींच सहन होत नसतो, हें अगदीं खरें आहे; तथापि इन्दु ही इतर स्त्रियांसारखी सर्वसाधारण अशी मानवकोटींतली स्त्री नव्हती; ती स्वर्गीची एक शापभ्रष्ट देवताच होती असें म्हटलें तर ती अतिशयोक्ति मुळींच होणार नाहीं ! त्यामुळें तिच्या देवतातुल्य मनाला मत्सराचा स्पर्शही झाला नाहीं !

कुमारांचें मन ज्या सौंदर्याला आकर्षून घेतां येतें, तें खरोखरच दिव्य कोटींतलें, अतएव असामान्य असलें पाहिजे, ही तिच्या मनाची पूर्ण खात्री झाली ! आणि अशा असामान्य सौंदर्याचा पगडा मनावर बसला असतांही कुमारांचें आपल्यावर पूर्वीइतकेंच प्रेम आहे, हें जेव्हां तिच्या नजरेस आलें, तेव्हां तर तिला त्यांच्या उदात्त मनोभूमिकेचें अभिमानपूर्वक कौतुक वाटलें; आणि त्या कौतुकाच्या भरांत, ती वर लिहिल्याप्रमाणें सामान्य स्त्रीहृदयाला अशक्य असलेले, अत्यंत उदात्त असे विचार, अंतःकरणांतून बाहेर ओतूं लागली !

कुमारांनाही तिच्या विचारसरणीचें अत्यंत कौतुक वाटलें; आणि ते म्हणाले,—'' लाडके माझा तुला राग तर नाहीं ना ग आला ? खरं सांग, मला तूं क्षमा करशील ना ? ''

'' त्यांत कसली बरं क्षमा करायची ? जिथं अपराधच नाहीं, तिथं क्षमा ती काय करायची ? अन् शिवाय आपल्या अपराधाची क्षमा करायला मी कोणत्या झाडाचा पाला बरं ? असं कांहींतरी बोलून, जिवाला वाईट वाटून घेऊं नये, अन् मलाही वाईट वाटायला लावूं नये गडे ! नाहीं ना, सांगायचं गडे !—नाहीं ना असं आपण परत बोलणार ? ''

इन्दूबद्दल कुमारांच्या अंतःकरणांत जी कल्पना होती, ती या भाषणानें दृढ झाली; आणि म्हणून ते बोलले,—

"इन्दू! चूक झाली आहे ही गोष्ट नाकबूल करण्यांत काय बरं अर्थ आहे? तुझी योग्यताच निराळी, म्हणून तर या बाबतींत तूं मला क्षमा करूं शकलीस; इतकंच नव्हे तर, तुझ्या मनाची त्यामुळें चलबिचलही झाली नाहीं! नाहीतर तुझ्याऐवजी दुसरी एखादी सामान्य स्त्री असती, तर आज भलताच प्रसंग ओढवला असता!"

"असं कसं म्हणायचं गडे? आपली योग्यता मला माहीत आहे, म्हणून तर आपल्या या वागणुकीचं मला कांहीं म्हटल्या कांहीं वाटलं नाहीं; अन् तसं मला कांहीं वाटूं नये, यात योग्यता आपली कीं माझी, आपणच सांगायचं बरं!"

असें म्हणून त्या प्रेमळ देवतेनें त्यांना दृढालिंगन दिलें! कुमाराचेंही अंतःकरण उचंबळून आलें, आणि त्या प्रेमावेगांत त्यांनीं आपलें प्रेमातुर मुख तिच्या सुंदर मुखकमलाजवळ नेलें! परंतु तिच्या मुखाला प्रीतिस्पर्श करण्याच्या ऐवजीं ते तिच्या मुखाकडेच पहात राहिले! आपल्या पति-देवाची इच्छा ओळखूनच कीं काय, तिनें आपण होऊन आपलें ओंठ त्यांच्या ओंठाला भिडविले! कुमारांच्या अंतःकरणाला या चुंबनानें, चांद-ण्याची शीतलता, जाईजुईचा नाजुकपणा, प्रेमाची पवित्रता, संगीताचें माधुर्य या सर्वांचा अनुभव एकदमच आला!

थोड्या वेळानें आपलें मुख जरा बाजूला करून, ती त्यांना म्हणाली,—

"त्या देवतेची अन् आपली ओळख आहे का? तिच्याशीं आपलं क्षणभर तरी संभाषण झालंय् का? तिचं नांव गांव कांहीं आपल्याला माहीत आहे का? नाहीं तर आपल्या हृदयांतील प्रेमलतेला वाढायला अवसरच नाहीं सांपडायचा! आपलं प्रेम, म्हणजे खडकावर टाकलेलं बीं! अगर वाऱ्याच्या हालचालीनं पाण्यावर उठलेली लहरच ठरायची! त्या खडकाचा अन् त्यावर टाकलेल्या बीजाचा, अगर वाऱ्याचा अन् त्यानं उत्पन्न केलेल्या लहरीचा, एकमेकांना थांगपत्ता नसायचा, असं तर नाहीं ना?"

" लाडके ! मी काय सांगूं बरं ? माझ्या अंतःकरणांतील भावनांच्या हालचाली तुला मीं सांगितल्या; दुसऱ्याबद्दल मी काय सांगूं बरं ? "—

कुमार जरा गंभीर होऊन बोलत होते.

" मग आपल्या प्रेमाचा शेवट काय तर ? " – इन्दूनें आतुरतेनें विचारिलें.

" प्रेमाला कधीं शेवट असतो का ? सृष्टीच्या संसाराला, किंवा काळाच्या प्रवाहाला जसा कधींच शेवट नाहीं, त्याप्रमाणेंच प्रेमालाही शेवट नाहीं ! एकदा सुरू झालीं कीं, ज्याप्रमाणें हीं एकसारखी अखंड पुढें चालू राहाणार, त्याप्रमाणें, प्रेमाचा प्रवाह सारखा अखंडित चालू असतो; प्रेम करणं एवढंच प्रेमाला माहीत ? त्याच्या परिणामाकडे त्याचें लक्षसुद्धां नसतें ! –फुलाला उमलायचें इतकें माहीत ! – कशासाठीं ? – कुणासाठीं ?–याची त्याला चवकशी नको असते ! क्षणांत सोसाट्याच्या वाऱ्यानें तें कुसकरून कोमेजून जाईल ! – किंवा पुजाऱ्याच्या हातांत पडलें तर, तें देवाच्या मस्तकावर चढून बसेल ! त्याप्रमाणें, प्रेम दुर्दैवाच्या तडाक्यानें निष्फळ ठरेल; नाहीं तर दैवानें हात दिल्यास, तें आपल्या हृदयदेवतेच्या अंतःकरणावर स्थानापन्न होईल ! – या सगळ्या नेमानेमाच्या गोष्टी ! त्यांत मानवी बुद्धीचें शहाणपण चालत नाहीं ! – म्हणून मी या बाबतींत विचारच केला नाहीं. "

" बरं आपल्याला मी एक विचारतें–आपण रागावणार नाहीं ना ? – मी विचारतें आपण जिच्यावर प्रेम करतां, तिचें दुसऱ्याबरोबर लग्न झालं असलं तर ? "

" नदी ज्याप्रमाणें मार्गांत आलेले अडथळे न जुमानतां सागराला जाऊन मिळते, त्याप्रमाणें प्रेम आपल्या मार्गांतल्या अडथळ्यांना जुमानीत नाहीं ! प्रेम ही एक भावना आहे ! ती उत्पन्न व्हायला हृदयाची तेवढी जरूरी आहे ! ज्या मनोदर्पणांत आपल्या हृदयाचें प्रतिबिंब पडेल अशी मनाला आशा वाटते, तें मन सांपडलें म्हणजे हृदयांत प्रेम उत्पन्न होऊं लागतें ! नुसत्या कांचेंत वस्तूचें प्रतिबिंब पडत नाहीं; त्याला पाऱ्याची जरूरी असते; त्याप्रमाणें आकर्षणाचा पारा असल्याशिवाय, नुसत्या कांचेसारख्या हृदयांत हृदयाचें प्रतिबिंब पडणार नाहीं ! अर्थात् प्रेमाचा प्रादु-

भांव होणार नाहीं ! ज्या अर्थी माझं हृदय त्या बालिकेच्या हृदयाकडे ओढलें गेलें आहे, आणि तें अशा स्थितींत कीं, तुझ्यासारखी सौंदर्यदेवता आपलं हृदयसर्वस्व प्रेमानं अर्पण करायला तयार असतां – नव्हे अर्पण करत असतांना सुद्धां ! – त्या अर्थी त्या बालिकेच्या हृदयांत विशेष कांहीं तरी असलेंच पाहिजे ! 'तें काहीं तरी विशेष' आपल्या मालकीचें करण्याची माझ्या मनाला अनिवार हाव उत्पन्न झाली आहे ! हृदयाला आकर्षण करणारें हृदय, आपल्या मालकीचें करण्याची मनाला जी तळमळ लागते, त्यालाच आपण प्रेम म्हणतों ! तुझ्यावर माझें प्रेम आहे म्हणजे काय ! – तर, माझें हृदय आकर्षण करणाऱ्या तुझ्या अंतःकरणाचें स्वामित्व आपल्याला लाभावें अशी माझ्या मनाला लागलेली तळमळच नाहीं का ? हेंच मला वाटत असलेलें तुझ्याविषयींचें प्रेम ! ”

“ एकंदरींत काय, त्या बालिकेच्या हृदयाची मालकी आपल्या हृदयाला हवीहवीशी वाटूं लागलीय्, असंच ना ? ”

“ काय सांगूं ग इन्दू तुला ? ” – कुमारांना पत्नीच्या प्रश्नाला स्पष्ट उत्तर देतां येईना !

“ तसं असलं तर आपल्याला तिच्याशीं लग्न करावं लागेल. ” – इन्दू म्हणाली.

“ तिच्या मनाची मालकी लग्नानं मिळेल असं मला वाटलं तर तिच्याशीं लग्न करण्याचाही प्रयत्न मी करीन; लग्नानें तिच्या मनाची मालकी मिळणें शक्य नसलें, तर तिच्याशीं लग्न करण्यापासून काय फायदा व्हायचाय् ? नुसत्या लग्नाच्या विधीनें मनाची मालकी काबीज करतां आली असती, तर घरोघर सुखाचे संसार दृष्टोत्पत्तीस पडले असते ! पण दुर्दैवानें तशी वस्तुस्थिति नाहीं ! ! ”

इतकें बोलून कुमार थोडा वेळ स्वस्थ बसले; इतक्यात घड्याळांत बाराचे ठोके पडले; बोलण्यात आणि एकमेकाच्या सहवासांत वेळ कसा निघून गेला हें त्यांना मुळींच समजलें नाहीं; उद्या सकाळी वसंतानें आपल्याला घरीं बोलाविलें आहे, याची त्यांना आतां आठवण झाली, आणि ते लागलीच इन्दूला हातांत धरून झोंपण्यासाठीं आंत घेऊन गेले.

* *

दुसऱ्या दिवशीं सकाळीं बरोबर आठ वाजतां कुमार निजून उठले; इन्दूही त्यांच्याबरोबर उठली– उठली कसली, त्यांनीं तिला उठविली. चहा वगैरे घेऊन झाल्यावर, मी जरा वसंताकडे जाऊन येतों, असें आपल्या पत्नीला सांगून ते बाहेर पडले.

वसंताच्या घरीं वसंत आपलीच वाट पहात बसल्याचें त्यांना आढळून आलें; म्हणून ते वसंताला म्हणाले,–

" काय रे, वसंत ! कशाला बुवा मला आज बोलवलं होतंस ? "

" तसं अगदीं विशेष कांहीं आहे असं नाहीं, तुला एक विचारायचं होतं; इतके दिवस वाट पाहिली तूं आपण होऊन सांगशील म्हणून, पण माझी अटकळ चुकीची ठरली. असो. आतां मला सांग, त्या दिवशीं त्या प्रोफेसर दासच्या जलशाहून तूं परत आलास, तेव्हांपासून तुझ्या मनावर कांहीं तरी परिणाम झाला असावा, असा मला संशय आलाय्; खरं सांग बरं का मला, त्यावेळीं बरोबर आपल्या समोर बसलेल्या पोरीनं तुला वेड तर लाविलं नाहीं ना ? खरं सांग अगदीं; माझ्यापासून कांहीं सुद्धां लपवून ठेवूं नकोस; मी म्हणतों तें खरं ना ? "

" खोटं कशाला बोलूं, वसंत ? तूं म्हणतोस तशी वस्तुस्थिति आहे खरी; त्या बालिकेच्या असामान्य सौंदर्यानं खरोखरीच मी अगदीं आश्चर्य-चकित झालों ! जड जगांत अशा प्रकारचं दिव्य सौंदर्य क्वचितच आढ-ळून येतें ! मला तर असंही वाटलं कीं, दिव्याच्या नंदनवनांत निवास करणाऱ्या कुठल्या तरी स्वर्गसुंदरीनें चुकून या जगाच्या वनांत– या माणसाच्या जगांत– प्रवेश केला असावा ! नुसत्या शारीरिक सौंदर्या-पेक्षां तिच्या मानसिक सौंदर्याच्या सजावटीमुळें जी शोभा तिच्या देहल-तेला आली होती, ती तर काय अवर्णनीयच ! दिव्य दिव्य म्हणून जें उठल्या सुटल्या कवि-लोक बोलत असतात, तें दिव्य तर हें नसेल ना, अशीही शंका मला त्यावेळीं आली ! असलें दिव्य हस्तगत करण्यासाठीं कोणतेंही दिव्य करायला माणूस तयार होईल ! दिव्याचा आभास मनाला पुष्कळ वेळां होत असेल, पण त्या कल्पनामय दिव्याचें प्रत्यक्ष दर्शन असें हें क्वचित्च नाहीं का रे, वसंत ? असल्या सत्य सृष्टींत प्रत्यक्षीभूत

होणाऱ्या दिव्यत्वाची मालकी, मृत्युलोकांतल्या माणसाच्या मनाला मिळवितां येणें शक्य आहे का रे ? शक्य असो अगर नसो, मरणाधीन मानवी देहाच्या जडबंधनांनीं जखडून गेलेल्या ज्या जीवात्म्याला या जड जगाच्या जंगलात दिव्याचें नंदनवन निर्माण करण्याचें सामर्थ्य आहे, इतकेंच नव्हे, तर माझ्यासारख्या क्षणाक्षणाला जडतेच्या जादूटोण्याला भुलणाऱ्या जडजीवाच्या मनांत त्या दिव्याच्या नंदनवनांत क्षणभर तरी प्रवेश मिळावा, अशी आकांक्षा उत्पन्न करतां येते, त्या जीवात्म्याची मालकी आपल्याकडे असावी असें कोणाला वाटणार नाहीं ? वसंत ! तूं मला हंस अगर चंचल म्हण, पण मी तुला अगदीं स्पष्ट सांगतों कीं, त्या रूपवती बालिकेच्या अंतःकरणाची अमर्याद मालकी मिळविण्यासाठीं मी माझ्या जीवाचें जंगल करायलाही मागेंपुढें पहाणार नाही ! तूं माझा मित्र, अगदीं जिवश्च कंठश्च मित्र, म्हणून तर मी माझ्या अंतःकरणाचें अंतिम इंगित तुझ्याजवळ एवढया मनमोकळेपणानें सांगून टाकत आहें ! आपल्या मित्राजवळ आपल्या हृदयाच्या वेदना स्पष्ट करणें, यांत कांहीं पाप आहे असें मला वाटत नाहीं; मी त्या लपवून ठेवीन, तरच दोषाला अधिक पात्र होईन; काय मी म्हणतों तें तुला पटतें का ? "

" तुझ्या मनाविषयीं मला अगदीं खात्री आहे कुमार ! पण इन्दुताईना तूं हें कळवलंस का ? "–

हा प्रश्न करतांना वसंताचा आवाज अडखळल्यासारखा भासला.

" कालच तिला मीं हें सगळं सागून टाकलें. "

" मग काय म्हणाल्या इन्दूताई ? "

" ती काय म्हणणार ? तीं इतर चारजणींसारखी नाहीं, हें मीं तुला सांगायला नकोच; तिनं मला निरुत्साही तर केलं नाहींच, पण उलट माझ्या मनाला बरं वाटेल, माझा उत्साह वाढेल, अशा तऱ्हेनें ती काल माझ्याशीं वागली; मला नवल वाटलें, आनंदही झाला ! "

" पण हें सारं त्यांनीं मनापासूनच केलं ना ? कीं तुला बरं वाटावं म्हणून केलं ? "

" दुसरं कोणीही मनापासनं करणं शक्य नाहीं; पण इन्दु केव्हांही मनाविरुद्ध वागायची नाहीं; तिच्या विचारी मनाला माझ्या या वागणुकींत

कृत्रिमता वाटली असती, अगर माझ्या मनाला जें वाटले तें अयोग्य, तरुण मनाचा चंचलपणा आहे अशी तिची खात्री झाली असती, तर तिनें ताबड-तोब माझा धिःकार केला असता आणि मला त्यापासून परावृत्त करण्याचा आटोकाट प्रयत्न केला असता; पण तिनें तसें कांहींच केलें नाहीं, उलट मला तिनें उत्तेजनच दिलें म्हणेनास!"

"मग त्या मुलीची ओळख करण्याचा तूं प्रयत्न करणार कीं काय?"

"ओळख करणं शक्य असेल तर अवश्य करीन."

"पण तिचें नांव, गाव, पत्ता वगैरे तुला कांहीं माहीत आहे का? नाहींतर, ती आपली असायची पुण्याबाहेरची; परत दर्शनसुद्धां होणं कठीण! बरं, ती विवाहित आहे कीं अविवाहित आहे, याची तरी तुला माहिती आहे का? नाहीं ना? मग काय करणार रे तूं? प्रेमाचा मार्ग-दिव्याच्या नंदनवनांत नेऊन सोडणारी पाऊलवाट-नाजुक फुलांनीं फुललेली नसून, अतिशय तीक्ष्ण अशा कांट्याकुटयांनीं भरलेली असते, असं म्हणतात तें कांहीं खोटं नव्हे कुमार!"

"फुलं असोत अगर कांटे असोत! फुलं मिळवावयाचीं झालीं तर हाताला कांटे बोचतील म्हणून भिऊन जाण्यांत काय अर्थ आहे? समुद्राच्या तळाशीं दडलेलीं रत्नें बाहेर काढायला,—समुद्रांतच बुडी मारली पाहिजे! अडीअडचणींचे काटे असल्याशिवाय प्रीतीचें फूल फुलत नाही, दिव्याच्या नंदनवनांत पाऊल टाकता येत नाहीं! प्रसववेदना असह्य असते म्हणून पुत्रजन्माची मातेला इच्छा होत नाहीं का? कपाळमोक्ष होण्याची भीति असली तरी समुद्र-लाटा खडकाला आलिंगन देण्यासाठीं धडपडतात ना? काळोखाचा बागुलबोवा भेडसावीत असला तरी, नक्षत्र-बाळें आकाशाच्या वाळूकिनाऱ्यावर खेळायला येतातच ना? प्रत्यक्ष मरणाचा मारेकरी जीविताची मान मुरगळण्यासाठीं टपून बसला असता, दीपज्योतीच्या दिव्य समागमासाठीं पतंग धडपडत असतो ना? मग दिव्यतम अशा प्रेमाच्या प्राप्तीसाठीं माझें मन निरर्थक अशा धार्मिक, सामाजिक बंधनांच्या अडथळ्यांनीं डगमगून जाईल अशी तुझी कल्पना तरी कशी झाली?"—

कुमारच्या डोळ्यांत यावेळीं खरोखरच प्रीतीचें तेज चमकत होतें!

दिव्याच्या नंदनवनांत अमरपद मिळविण्याची आकांक्षा धरणाऱ्या दिव्य-प्रेमी अंतःकरणाची तेजस्विता त्याच्या रोमारोमांतून उसळून बाहेर सांडत आहे कीं काय असा क्षणभर भास वसंताच्या डोळ्यांना झाला! ही वेळ जास्त कमी बोलण्याची नाहीं हें जाणून वसंतानें तो विषय तितक्यावरच थांबवला; आणि कुमारांशीं तो दुसऱ्या विषयांसंबंधीं बोलूं लागला.

थोडया वेळानें चहा वगैरे घेऊन झाल्यावर कुमार घरीं येण्यासाठीं निघाले; वाटेंत त्यांना रमावहिनी भेटल्या.

कुमारांना पाहून वहिनींच्या तोंडाचा पट्टा सुरू झाला,—

" काय बाई तरी एक एक पहावं ऐकावं तें आपलं मुलखावेगळं!"

कुमारांना इतक्या दिवसात वहिनींच्या स्वभावाची माहिती झाली होतीच; तरी ते म्हणाले,—

" वहिनी! असं काय मुलखावेगळं झालं, तें सागा तरी आम्हाला."

" काय सांगूं, कुमार तुम्हांला! अहो! त्या विमलच्या कुणी मैत्रिणी, काळजांत का फाळजांत असतात ना, त्या आल्यायत् आमच्या घरीं बरं का; येण्याबद्दल कांहीं नाहीं हो माझं; येइनात बापड्या; आहे – मुलींचा स्वभाव आहे, जरा खेळावं बागडावं, असं वाटणं साहजिक आहे; आम्ही लहान असतांना, आम्हांला नव्हतं का असं वाटत! लहानपणीं प्रत्येकाला वाटतं हो तसं, मी नाहीं नाय् म्हणत, म्हणून काय आपलं वाटेल त्याला घरांत घेऊन धांगडधिंगा घालायला या काय आतां म्हशी लहान का आहेत! मुसलमानाच्या पोरीला घरांत घेऊन या कारटीनं नुसता भ्रष्टाकार मांडलाय् घरांत! बघा तरी आंत जाऊन जरा तुम्ही कुमार बाबू, काय काय त्यांचे चाललेत् चाळे ते! मुसलमान, ब्राह्मण, एका ताटांत बसून खाताहेत काय, खिदळताहेत काय, काय अगदीं विचारूं नका; काय ताळतंत्र नीतिनियम आहेतच कीं नाहींत! कीं, काळजांत गेलं म्हणजे स्वर्गाला हात लागले! मेल्यांनो! अशा करणीनं, बरा स्वर्ग मिळेल तुम्हांला बरं! रांडेच्चं कपाळ फुटलंय्! उगाच नाहीं फुटलंय् तें! देवाला काय डोळे नाहींत का काय? मैत्रिणी असल्या म्हणून काय हो झालं? जातपात कांहीं आहे कीं नाहीं? का आपला सब् गोलंकार? अशानं मेली नरकांत पडेल, अन् दुसऱ्यांनाही पाडील! उद्यापासनं कारटीचं काळिजच बंद केलं पाहिजेय्."

कुमारांनीं वहिनींच्या या वाक्प्रहारावरून तात्काळ ओळखलें कीं, या वेळीं गप्प बसणेंच श्रेयस्कर आहे; उत्तरास प्रत्युत्तर म्हणजे आगींत तेल ओतल्यासारखें होणार आहे.

कुमार बोलत नाहींत असें पाहून रमावहिनींनीं आपलें चऱ्हाट पुन्हां सुरू केलें:—

" मला बाई उघड्या डोळ्यांनीं बघवेना, म्हणून मी आपली इकडे घराबाहेर आलें; घरांतनं त्या उठून जाईपर्यंत, मी तिकडे ढुंकूनसुद्धां बघायची नाहीं. कुमार बाबू ! तुम्हीही जाऊं नका तिकडे बरं का; या अशा भ्रष्टाकारानंच हो आपला देश बुडाला ! तुम्हांला नाहीं का असं वाटत कुमार ! "

उत्तरासाठीं रमावहिनी कुमारांकडे पाहूं लागल्या; पण कुमार त्या ठिकाणीं होते कोठें ? म्हातारीच्या तोंडाच्या पट्ट्याला कंटाळून त्यांनीं तेथून केव्हांच पाय काढला होता !

थोड्याच वेळांत ते विमलच्या घराकडे येऊन पोहोंचले. रमावहिनींनीं सांगितल्याप्रमाणें कोण कोण मंडळी आली आहे हें पहाण्यासाठीं ते आंत डोकावून पाहूं लागले.

—पण आंत दृष्टि जातांच, डोळ्यासमोर वीज चमकल्यासारखें त्यांना झालें आणि ते थबकले !



# कुंज ६ वा.

विश्वासराव बॅरिस्टर होऊन विलायतेहून नुकतेच आपल्या मातृभूमीला परत आले होते. बॅरिस्टर विश्वासराव माहीत नाहींत असा एकही माणूस सबंध नगर शहरात नव्हता; याचें कारण, त्यांची विद्वत्ता, सुस्वभाव किंवा साधी राहाणी हें नसून, बॅरिस्टर होऊनही मुंबईसारख्या शहरीं बॅरिस्टरी करावयाची सोडून, ते नगरसारख्या साधारण अप्रसिद्ध अशा जिल्ह्याचे ठिकाणीं 'प्रॅक्टिस' करीत होते हें होय; शिवाय, बडे बापके बेटे असल्यामुळें त्याचें घर म्हणजे, सांचकी शेणघाण किड्यामाशाचें विश्रांतिठिकाण, त्याप्रमाणें गावातल्या चांडाळ चौकडीची राजरोस बसण्याउठण्याची जागा झाली होती! माशा ज्याप्रमाणें आपण जातील तेथें आपल्याबरोबरची घाणही घेऊन जातात, त्याप्रमाणें ही 'चार मंडळी' चारचौघात त्यांचें नाव काढीत असल्यामुळें तर, त्याचें गावांत विशेषच नांव झालें होतें!

दुबळें शरीर सर्व रोगांचें माहेरघर, त्याप्रमाणें त्यांचें दुबळें मन बहुतेक सर्व व्यसनांचें आश्रयस्थान बनलें होतें; एवढें सांगितलें म्हणजे त्यांच्या रंगरूपाचें आणखीं निराळें वर्णन करण्याची जरुरी नाहीं! त्यांच्या दर्शनानें कोणाही सभ्यगृहस्थाला तिरस्कार, आणि कुलीन स्त्रीला मनांत भीति वाटल्यावाचून कधींच राहात नसे!—

परंतु, क्षुद्र कीटकाची दृष्टि तेजस्वी दीपज्योतीवर आकर्षिली जावी, त्याप्रमाणें त्यांची नजर, कथेंतील नायिका कुसुम हिच्याकडे वळली होती. तिला आपली करण्याचा त्यांनीं मनांत निश्चयही करून ठेवला होता. तो हळुहळू जनांत बोलून दाखविण्याच्या उद्योगांत ते हल्लीं गुंतले होते. या कारणामुळें, कुसुमच्या वडिलाकडे ओळख वशिला जमविण्याच्या खटपटींत त्यांना आपल्या 'प्रॅक्टिस'कडेही लक्ष द्यावयाला फुरसत सांपडत नव्हती. तसें पाहिलें तर कुसुमचे वडील वामनराव यांची आणि बॅरिस्टरसाहेब यांच्या वडिलांची पूर्वीची थोडीशी ओळख होती, ती ओळख दृढ कर-

ण्याकरितां जें कांहीं करतां येण्यासारखें होतें, तेवढें सर्व त्यांनीं करून पाहिलें होतें. त्याचा परिणाम असा झाला कीं, विश्वासरावांना कुसुमच्या घरीं राजरोस जाण्यायेण्याला मुभा मिळाली; पण या जाण्यायेण्यांत त्यांचा काय हेतु होता याचा नुसता संशय जर वामनरावांना येता, तर त्यांनीं या अशा माणसाला आपल्या घराची पायरीही चढूं दिली नसती !

आज सकाळीं चहा वगैरे घेऊन बॅरिस्टरांची स्वारी निघाली, ती थेट वामनरावांच्या घरीं आली. वामनराव बाहेर ओटयावर 'त्रिदळ' वाचीत बसले होते. त्याच्याकडे टाइम्स्, क्रॉनिकल, फ्री प्रेस वगैरे इंग्रजी दैनिकें, आणि नवाकाळ, केसरी हीं मराठी वृत्तपत्रें येत असत; परंतु 'त्रिदळ' हें नवीनच सुरू झालेलें दैनिक असल्यामुळें, तेंही त्यानीं नुकतेंच सुरू केलें होतें; त्याचें धोरण कोणत्या पक्षाचें आहे, हें त्यांनीं त्याच्या एकदोन अंकांवरूनच ओळखलें.

वामनरावांच्या हातांत 'त्रिदळ' पाहून, बॅरिस्टरसाहेबांनीं बोलण्यास सुरवात केली—

"काय बुवा तरी, आजकाल इतकीं वर्तमानपत्रें निघूं लागलीं आहेत, कीं जणूं काय चहाचीं हॉटेलें ! जिकडे पहावें तिकडे एक तरी चहाचें दुकान दृष्टीस पडत नाहीं असें कांहीं होत नाहीं, त्याप्रमाणें ह्या नाहीं तर त्या अशा कोणत्या तरी नव्या पत्राचें नांव जाहीर झालें नाहीं, असें कांहीं मला अजूनपर्यंत आढळून आलें नाहीं; रोज पहावें तर एक तरी नवीन वर्तमानपत्र—दैनिक म्हणा, साप्ताहिक म्हणा, नाहींतर मासिक म्हणा—आपलें, नवा जीव जगांत जन्मास यावा त्याप्रमाणें – निघूं लागलेलें पाहून, डोकें अगदीं कसें उठून जातें म्हणतां ! अशीं वर्तमानपत्रें प्रसिद्ध करून जर देशसेवा करतां आली असती, तर आम्हीसुद्धां—हो आम्हीसुद्धां—वर्तमानपत्रें काढलीं असतीं; पण आम्हाला माहीत, अगदीं पूर्णपणें माहीत आहे कीं, ज्याप्रमाणें नुसत्या कागदावर रेघोटया ओढून काव्य जन्मास येत नाहीं, तसें नवींनवीं वर्तमानपत्रें काढून देशसेवा करितां येत नाहीं ! तुम्हांला नाहीं का माझें म्हणणें बरोबर वाटत, बापूसाहेब ?"—

वामनरावांना सर्वजण 'बापूसाहेब' या नांवानें ओळखीत असत. त्याप्रमाणें विश्वासरावांनींही त्यांना त्याच नांवानें संबोधिलें.

" नुसत्या रेघोटयांनीं काव्य जन्मास येत नाहीं, हें तुमचें म्हणणें कबूल आहे मला, बॅरिस्टरसाहेब; पण सुंदर कल्पना, गूढ आणि तात्त्विक असे विचार, यांची योग्य अशी जुळणी करून कागदावर चार दोन सुंदर वाक्यें पद्यांत किंवा गद्यांत लिहून काढलीं, तर तें काव्य होईल कीं नाहीं? लहान अडाणी मुलें कागदावर रेघोट्याच काढणार; पण सुशिक्षित, बहुश्रुत अशीं जीं विद्वान माणसें आहेत, तीं नुसतीं रेघोटया काढण्यांत वेळ न घालविता, समाजाला, देशाला मार्गदर्शक होईल अशा प्रकारचें वाङ्मय निर्माण करूं शकतात; लहान मुलांसारख्या नुसत्या रेघोटया ओढणारीं वृत्तपत्रें आपल्या महाराष्ट्रांत पुष्कळ आहेत; पण उच्च प्रकारचें वाङ्मयामृत पाजणारींही वृत्तपत्रें तेथें, थोडींच कां होईना, पण निघत आहेत! अशा प्रकारच्या वर्तमानपत्रांचा एक विशिष्ट प्रकारचा मतप्रसार करण्याच्या कामीं उपयोग झाला, तर तो या दिवसात पाहिजेच आहे कीं!

देशसेवा म्हणजे नुसती तोंडाची बडबड नव्हे, हें मला कबूल आहे; त्याप्रमाणें देशसेवा म्हणजे नुसती ' एक घाव दोन तुकडे ' अशी लढवय्याची वृत्तीही नव्हे! देशसेवेला जशी लढाईची जरूरी आहे, तशी उत्कृष्ट वाङ्मयनिष्पत्तीचीही आहे! मला तर वाटतें कीं, हल्लींच्या ' सिव्हिल डिस्ओबीडियन्स् मुव्हमेंट ( Civil disobedience movement ) ' च्या काळांत तरी पहिल्यापेक्षां दुसऱ्याचीच जास्त आवश्यकता आहे; आणि त्यासाठीं जितकीं म्हणून नियतकालिकें, वर्तमानपत्रें देशांत प्रसिद्ध होतील तितकीं थोडींच आहेत!

पण देशसेवा नियतकालिकांच्या संख्येवर अवलंबून नसून, त्यांच्या गुणथोरवीवर अवलंबून आहे, हें अवश्य लक्षांत ठेवलें पाहिजे; नियतकालिकांमुळेंच देशाच्या कोनाकोपऱ्यात, हल्लींचे देशस्थिति सुधारण्याचे विचार शिरूं लागून, त्या विचारांच्या वाचनानें आणि दुसऱ्यांनीं वाचून आपण ते ऐकण्यानें, देशाच्या लढ्यांत भाग घेण्याची तयारी प्रत्येकाच्या मनगटांत नाहीं, तरी मनांत उत्पन्न होण्याचा संभव असतो! शरीराला रक्ताची जशी आवश्यकता, तद्वत् देशाला नियतकालिकांची प्रसिद्धी अत्यावश्यक आणि जरूर आहे! तुम्हांला नाहीं का असें वाटत?"

बापूसाहेब उत्तराची अपेक्षा न करतां प्रश्न करीत होते.

" देशसेवा वगैरे आम्हांला कांहींएक समजत नाहीं " — बॅरिस्टरसाहेब बोलूं लागले, " आम्हांला यथेच्छ खायाप्यायला सांपडलें आणि मनमानेल तशी चैन करतां आली, म्हणजे देश सुस्थितींत आहे असें आम्ही समजतों! तसें कांहीं करतां आलें नाहीं, तर देश निकृष्ठावस्थेस येऊन पोंचल्याबद्दल आमची पुरी खात्री होते! आमच्या चैनीच्या चटकेची पूर्ति म्हणजे देशाची सुस्थिति, असें आमचें म्हणणें आहे; आणि तें बरोबर आहे असें आपणही कबूल कराल, बापूसाहेब! "

" पोटाची खळगी कोणाला भरायला नको आहे? गरीब असो, श्रीमंत असो, बायको असो, पुरुष असो – प्रत्येकाच्या पाठीमागें पोट लागलें आहे! पण पोटाची खळगी भरल्यावर, बाकीचा उरला वेळ चैनीच्या नादान् चोंचल्यांत न घालवितां, तो, – निदान त्यांतला थोडासा भाग तरी, – देशसुधारणेच्या चिंतनांत घालविला, तर मी म्हणतों आपलें काय एवढें नुकसान होणार आहे बरें! निरुद्योगी श्रीमंत, जेवल्यानंतरचा वेळ झोंपेंत, गप्पाष्टकांत, नाहीं तर एखाद्या व्यसनांत घालवितो, तो आपल्या देशाच्या चिंतनांत घालवील, तर आणखी काय पाहिजे? "

"देशाच्या चिंतनांत म्हणजे काय हो बापूसाहेब? " —

एखादें अजाण मूल 'ईश्वर' म्हणजे काय असा जसा आपल्या वडील माणसाला प्रश्न करतें, त्याप्रमाणें बॅरिष्टरसाहेबांनीं हा प्रश्न बापूसाहेबांना केला!

" देशाचें चिंतन म्हणजे काय? प्रश्न सोपा आहे; पण त्याचें उत्तर देणें मात्र सोपें नाहीं; आणि तुम्हांला देणें तर मुळींच सोपें नाहीं. तुम्हाला मी एक प्रश्न विचारतों — 'आपल्या देशांत किती लोक आहेत, तेहतीस कोटी ना? – या तेहतीस कोटी लोकसंख्येपैकीं कितीजणांना पोटभर अन्न मिळत असेल याचा तुम्ही कधीं विचार केला आहे का? 'दृष्टि आड सृष्टि' या न्यायानें आपल्याला भरपूर, म्हणजे जरूरीपेक्षांही जास्त, अन्न मिळून आपल्या स्वतःच्या निरुपयोगी चैनी पुऱ्या करतां आल्या, म्हणजे आपणांला इतरांची आठवणही होत नाहीं! अन्नाच्या दोन घांसांसाठीं किती बायकापोरें तडफडत आहेत, किती लोक आपल्या हाडांचीं काडें करीत आहेत, आणि किती अभागी जीव अहोरात्र

डोकेंफोड करून आपल्या शरीरांतल्या रक्ताचा थेंब न् थेंब आटवून टाकीत आहेत, याची तुम्हांला नुसती कल्पना तरी आहे का! अंगावर धड वस्त्र नाहीं, पोटांत पाण्याचा थेंब नाहीं अशी उघडी नागडी प्रजा, कंठ कोरडा होईपर्यंत आरडून ओरडून आपल्या गांजणुकीचीं गाऱ्हाणीं, आणि कर्मांची कठोर कहाणी सांगण्यासाठीं धडपडत असतां, आमचे चैनी चोंचले पुरविण्याच्या नादान् छिचोरपणापुढें, त्यांचा आंतड्यांना पीळ पाडणारा दीन आक्रोश, आमच्या कानींही येत नाहीं; आणि यदाकदाचित् आलाच, तर त्याच्याकडे लक्ष देण्याइतकी साधी माणुसकीही दाखविण्याचें आमच्या निर्दय, सहानुभूतिशून्य मनांत येत नाहीं!

देशसेवा म्हणजे दुसरें काही नसून, डोळे उघडे ठेवून, असल्या उघड्या नागड्या जीवाच्या दीन आरोळ्याकडे सहानुभूतीनें पहाणें, त्यांच्या दुःस्थितींत त्यांना साहाय्य करण्याचे प्रयत्न करणें, आणि शक्य असेल तर उघड्या डोळ्यांना सहज दिसणारे त्याचे हाल थोडेबहुत कमी करण्यासाठीं झटणें, म्हणजेच देशसेवा होय!

कांहीं उन्मत्त भांडवलवाले आणि क्रूर कारखानदार आपल्या मूर्ख मिजासी, नादान चैनबाजी, – आपल्या शारीरिक मेहनतीच्या बळावर – नव्हे, सोन्यासारख्या शरीराची दैना करून, कांहीं काहीं वेळा उपाशी राहून, स्वतःच्या बायकापोराना डोकें टेंकायला धड हातभरसुद्धां जागा नसतांना – थोडक्यात म्हणजे आपल्या मोलाच्या जीवजीविताची माती करून, आपल्या सुखी संसाराची राखरांगोळी करूनही, – पुरविणाऱ्या दीन दुबळ्या मजूरवर्गावर कसा आणि कोणत्या प्रकारचा जुल्म करीत असतात इकडे डोळे उघडे ठेऊन पहाणें, आणि असला अन्यायी जुल्म नाहींसा करण्यासाठीं झटणें आणि शक्य असेल तर शरीरानें, मनानें किंवा पैशानें त्यांना सक्रिय मदत करणें – निदान तसा प्रयत्न तरी करणें म्हणजेच देशसेवा होय!

केवळ हातांत बंदूक घेऊन शत्रूला ठार करणें, किंवा सरकारच्या विरुद्ध दोनचार व्याख्यानें देऊन तुरूंगांत जाणें, हीच कांहीं देशसेवा नव्हे! तर, वर सांगितल्याप्रमाणें, निरपराधी निरुपद्रवी दीनदुबळ्या मजूरवर्गाला, होईल तितकी कायिक, आर्थिक मदत करणें, निदान

अंतःकरणाची सहानुभूति दाखवून त्यांच्या दुःखाचा भार हलका करण्या-साठीं झटणें, हें तुमच्याआमच्यासारख्या संपन्न लोकांचें काम नव्हे का ! "—

बापूसाहेब अगदीं जोराजोरानें बोलत होते; परंतु बॅरिस्टर साहेबांचें तिकडे लक्षच नव्हतें. ते बापूसाहेबांकडे आले होते, तें अशा प्रकारचें देशसेवे-वरचें व्याख्यान ऐकण्यासाठीं कांहीं नव्हे; तर पुण्याच्या 'फर्ग्युसन्' कॉलेजमध्यें ज्युनिअर बी. ए. च्या वर्गांत शिक्षण घेत असलेल्या त्यांच्या कुसुमची माहिती काढण्यासाठीं ते आले होते; तेव्हां विषय भलतीकडेच वाहावत चालला आहे— आणि विषय असा कीं, ज्यांत आपल्याला कांहींच गम्य नाहीं असा – असें पाहून, ते एकदम म्हणाले—

" बापूसाहेब ! तुम्ही कांहीं म्हणा, आमचा हा विषय नव्हे, आणि यात आम्हाला कांही समजत नाहीं— नव्हे, समजून घेण्याची इच्छाही होत नाहीं ! ज्या गांवाला जायचें नाहीं, त्याची वाट कशाला विचारा ! आम्हांला आमची 'बॅरिस्टरी' सांभाळतां सांभाळतां पुरें होत आहे; तर हा दुसरा आणखीं उपद्याप कोणीं सागितला आहे ! हें असलें विकतचें श्राद्ध नको बुवा आपल्याला ! "

" बरं बुवा ! मी तो विषयच बंद करतों; तुम्हीं दैनिकांची गोष्ट काढली, म्हणून हा विषय निघाला, नाहींतर मी तरी असला विषय तुमच्यापुढें कशाला काढणार होतों ! "

" बरं, काय हो बापूसाहेब ! पुण्याचें पत्रबित्र कांहीं आलें आहे का ?"

" पुण्याचं होय ? होय, कालच एक आलं आहे आमच्या कुसुमकडून."

" काय म्हणतेय् आपली लेक ! "

" काय म्हणणार ? आता कॉलेज बंद होणार आहे लवकरच, तर पंधरा, वीस दिवसांत आपण इकडे येणार म्हणते. "

" एकूण कुसुमताई पंधरा वीस दिवसांत इकडे येणार तर ? यंदा काय त्यांना ज्युनिअर आहे; मजा आहे ! "

" मजा कसली त्यांत विश्वासराव ? ज्युनिअर म्हणजे मजा नाहीं बरं ! खरें म्हटलें तर, या वर्षांत चांगला सडकून अभ्यास केला, तरच पुढें परीक्षेंत चांगलें यश मिळणें शक्य असतें; याच वर्षी अभ्यासाची शिकस्त

केली पाहिजे; तशी शिकस्त केली, तरच कॉलेजमधल्या या शेवटच्या परीक्षेंत चांगलें नांव मिळवून पुढच्या संसारांत पाऊल टाकायला, मनाला हुरूप येतो ! आतां आमच्या कुसुमला, संसारासाठीं नाहीं तरी नांवासाठीं तरी, या वर्षी चागला अभ्यास करून, वर 'क्लास' मिळविला पाहिजे; अभ्यास करील तर ती खात्रीनें वर येईल, याबद्दल मला संशय नाहीं !"

"आम्हांला त्यांत काय कळतें आहे, बापू ? आम्ही कॉलेजांत गेलों नाहीं, आलों नाहीं. मॅट्रिक परीक्षेचा कंटाळा आला म्हणून, व घरांत पैसे होते म्हणून आम्ही विलायतेला गेलों आणि 'बॅरिस्टर' होऊन आलों; आणि तसें म्हटलें तर बी. ए., एम्. ए. होण्यापेक्षां बॅरिस्टर होणेंच पैशाच्या दृष्टीनें हल्लीं जास्त चांगलें आहे. बी. ए., एम्. ए. लाहो हल्लीं कोण विचारतोय् ? एखाद्या हमालाइतकीही त्याला जगांत किंमत नाहीं ! मी म्हणतों तें खोटं का हो, बापू ?"

बापू याच्यावर काय बोलणार ? घुबडाला सूर्यप्रकाशाची किंमत काय ? असें मनांत म्हणून ते स्तब्ध राहिले; पण त्यांना स्तब्ध राहिलेले पाहून विश्वासरावांना कसेंसेंच झालें ! त्यांना कांहींतरी बोलावयाचें आहे असें त्यांच्या तोंडावरून उघड उघड दिसत होतें; आणि त्याप्रमाणें त्यांनीं बोलावयाला आरंभही केला—

"काय बापू ? यंदा मुलीचें लग्नबिग्न करायचें आहे कीं नाहीं ? चांगलं ज्युनिअर आहे. लग्न करायचें तर या वर्षीच करावें, म्हणजे सुटी मजेंत घालवतां येते, नाहीं का हो बापू ?"

"तसं कांहीं नाहीं हो; शिवाय तिच्या लग्नाचा आम्ही अजून विचारच केला नाहीं. ती काय आतां लहान आहे का ? आपलें लग्न स्वतःच जुळवायला ती अगदीं समर्थ आहे; इतकेंच नव्हे तर, तिला न विचारतां आम्ही या भानगडींत पडलों तर तें तिला खपायचेंही नाहीं !"

"बापू ! तुम्ही चुकतां ! लग्नाच्या बाबतींत मुलींना कांहीं विचारूं नये नी पुसूं नये ! असें स्वातंत्र्य मुलींना दिलें— आणि त्यांतून तें कॉलेजांत शिकणाऱ्या मुलींना दिलें – तर तें उलट आपल्या अंगाशींच यायचें; मला अनुभव आहे याचा, बापू ! माझी एक चलत चलत आतेची मावस-

बहीण होती; अशी चांगली बी. ए. झाली होती बरं का; तर तिनें काय केलें म्हणतां, तर एक बायको जिवंत असलेल्या मुसलमानाशीं तिनें लग्न कीं हो केलें! आणि त्याच्यापासून तिला मुलेंही झालीं; पण सांगायची गोष्ट काय कीं, त्या मुलांना आतां समाजांत कोणी म्हटल्या कोणी विचारीत नाहीं आणि पुसत नाहीं! पोरं ना धड मुसलमान! ना हिंदु! अशी बिचाऱ्यांची दशा! काय सांगूं बापू तुम्हांला! तेव्हां म्हणतों लग्नाच्या बाबतींत मुलीला कधींही स्वातंत्र्य देऊं नये!"

"पण योग्य असा नवरा सांपडल्यावांचूनच का तिचें लग्न करावयाचें? का कोणा वाटेच्या वाटसराच्या गळ्यांत तिला बांधायची? – इतकी कांही आम्हांला ती जड झाली नाहीं अजून! आणि व्हावयाची पण नाहीं बरं!"

"जड होण्या न होण्याचा प्रश्न नव्हे, बापूसाहेब! पण चांगला शिकलेला श्रीमंत नवरा मिळत असला, तर लग्न उरकून घ्यायला काय हरकत आहे मी म्हणतों? एकदां लग्न उरकून टाकलें कीं, आपण आपले मोकळे! नाहीं का? मुलीचें लग्न म्हणजे थट्टेचें काम नव्हे! माझ्या पाहाण्यांत एक उत्तम स्थळ आहे."

बापूसाहेबांना विश्वासरावांच्या बोलण्याचें हसूं येत होतें; तरी तें मनांतल्या मनांत दाबून ते थट्टेंत म्हणाले, "कोणतं बरं तें?"

"कोणतं म्हणून काय विचारतां? असें स्थळ शोधून सांपडणार नाहीं तुम्हांला, बापू!"

"मग सांगा कीं कोणतें तें," बापूसाहेब मनांत हंसत होते!

"सांगूं का? अहो दुसरें कोणतें नसून, मी स्वतःच तिच्याशीं लग्न लावायला तयार आहें! तिला कळवा तुम्ही; ती एका पायावर तयार होईल. बघा बुवा! आम्हांला कांहीं हुंडाबिंडा घ्यायचा नाहीं. मुलगी चांगली आणि शिकलेली असली म्हणजे बस्स; तोच आमचा हुंडा! मग काय? विचार करून सांगा काय तें."

विश्वासरावांचें हें भाषण ऐकून, बापूसाहेबांना हंसावें कीं रडावें तें समजेना! हा मनुष्य दुर्व्यसनी निरुद्योगी, निरुपयोगी आहे; शिवाय स्वभावानेंही कांहीं नीट नाहीं, हें त्यांना ऐकून माहीत होतें. परंतु तो इतका मूर्ख आणि अडाणी असेल, ही त्यांना कल्पनाही नव्हती! म्हणून

ते विश्वासरावांना म्हणाले—

"छे, छे ! असें कसें म्हणतां विश्वासराव ! आपण कुठें आणि आम्ही कुठें ! आम्हांला नाहीं हो हें झेपायचें ! आम्ही आपली गरीब माणसें; गरीबांची नजर गरीबाकडेच असावी ! आपल्या सूचनेबद्दल मी आपला फार आभारी आहें !"

असें म्हणून बापूसाहेब तेथून उठून गेले. पण हा मूर्ख तेथेंच बसला होता ! त्याला वाटलें आज नाहीं तरी पुढें मागें ते आपल्या म्हणण्याला कबूल होतील; ते नाहींच झाले तर खुद्द कुसुमलाच आपण विचारूं ! ती आपल्याशीं लग्न करावयाला हां हां म्हणता तयार होईल, अशी त्यांच्या मनाला खात्री वाटत होती ! त्यामुळें बापूसाहेबांच्या वरच्या भाषणानें त्यांचें मन निरुत्साहि झालें नाहीं.

बराच वेळपर्यंत बापूसाहेब बाहेर येत नाहींत हें पाहून, विश्वासराव अगदीं कंटाळून गेले; आणि शेवटीं आपल्या घरीं जाण्यासाठीं उठले !



## कुंज ७ वा

वामनराव घरांत गेले, ते तडक कुसमची आई वसुमतीताई इच्याकडे गेले; आणि हंसत हंसत तिला म्हणाले – " ऐकलंस का ग ? तुझ्या कुसुमला स्थळ सांगून आलंय् बरं का ! "

पतीचें हें तऱ्हेवाईक भाषण ऐकून ताई गारच झाल्या !

" खरं का ? कोणचं बाई ! " त्या उद्गारल्या.

" तूं ओळख पाहूं ! "

" मी काय ओळखणार त्यांत ? इथलंच आहे, का कुठलं बाहेरगांवचं आहे ? "

" अग ! अगदीं इथलंच आहे. चांगला बॅरिस्टर आहे मुलगा ! "

" बालिस्टर का ! वयानं किती आहे ? "

" आहे साधारण तीस, बत्तीस वर्षांचा. "

" दिसायला कसा काय आहे ? आमच्या कुसुमला अनुरूप आहे ना ? नाहींतर नुसत्या श्रीमंतीकडे बघून माझ्या पोरीचं जन्माचं नुकसान व्हायचं ! "

" तूं अगदीं भिऊं नकोस बरं; स्थळ उत्कृष्ट आहे ! पण कुसुमला पसंत आहे कीं नाहीं, तें पाहिलें पाहिजे; तिला पसंत नसलें, तर तिच्यावर कांहीं जुलूमजबरी नाहीं बुवा आपण करणार ! "

" लग्नाच्या बाबतींत जुलुमजबरी काय कामाची ती ! जन्माचा जिथं संबंध, तिथं मुलीच्या मनाच्या इच्छा आवडी बघायला हव्याच ! नाहींतर उभा जन्म दुःखांत अन् रडण्याकढण्यांत जायचा; नको ग बाई असला जुलमाचा रामराम ! माझी कुसुम म्हणजे नुसतं नाजूक फूल आहे अगदीं ! जितकी सुंदर माझी बाळ, तितकीच ती हळव्या मनाची आहे ! माझं भाग्य थोर, म्हणून असलं रत्न माझ्या पोटीं जन्माला आलं; लोकं मुलगा नाहीं नशिबांत म्हणून रडत बसतात; मला तरी कुठं आहे मुलगा ? पण माझ्या कुसुमकडे पाहून, मला मुलाची आठवणही होत नाहीं; माझी कुसुम म्हणजे खरोखरीच दुर्मिळ अशी एक अष्टपैलू हिरकणी आहे बरं !

ती कुणा श्रीमंत माकडाच्या गळ्यांत बांधूं नका गडे! राजाची राणीसुद्धां शोभेल बरं माझी गुणांची बाळ! एक एक गुण तर काय वर्णावा? जशी काय सीता-दमयंती! मी म्हणत्यें एखाद्या माकडाच्या गळ्यांत बांधण्यापेक्षां, एक दोन वर्सं लग्नाशिवाय राहिली, तर नाहीं का चालायचं? बरं घाई करायला तरी पोरीचं वय काय इतकं झालंय् अगदीं? सारीं एकोणीस का वीस वर्सं होतील या मार्गशीर्षांत माझ्या पोरीला! बी. ए. होऊं दे, मग मनासारखं स्थळ काय कुठंही सांपडेल! नाहीं सांपडलं तर ती काढील आपली आपण शोधून! मुलगा श्रीमंत नसला तरी चालेल बाई एक वेळ; माझ्या बाळीला सुखासमाधानांत ठेवील, अन् ज्याच्याविषयीं तिला अभिमान वाटेल, असा असला म्हणजे आणखी श्रीमंती ती कशाला हवीय्? पैशानंच काय सुख विकत घेतां येतं असं नाहीं कांहीं!"

"पण मुलाचं नांव ऐकलंस, कीं म्हणशील आतांच लग्न लावा म्हणून!"

"मग सांगायचं गडे तर; उगाच मला संशयांत कां बरं ठेवायचं?"

"सांगूं का? नीट कान कर! अग ते आपले बॅरिस्टर विश्वासराव!"

बॅरिस्टर विश्वासराव हें नांव ऐकतांच कडू बदाम चावल्यावर जी लहान मुलांच्या मनाची स्थिति होते तशी तिची झाली! आणि ती घाबरून म्हणाली—

"खरं कीं काय? आपल्याला तें स्थळ पसंत आहे का?"

"नसायला ग काय झालंय्? मुलगा चांगला श्रीमंत आहे, तरुण आहे आणि विलायतेहून बॅरिस्टर होऊन आलाय्—आणखी काय पाहिजे?"

"नुसती श्रीमंती असली म्हणजे झालं का? मुलाची चालचालणूक, स्वभाव, राहाणी वगैरे कांहींच का बघायला नको? अशा तऱ्हेचा तऱ्हेवाईकपणा कधींपासनं आपल्या स्वभावांत शिरूं लागला हा? नेहमीं मला म्हणायचं कीं, माणसाची किंमत त्याच्या पैशावर नाहीं, त्याच्या पेशावर नाहीं, तर त्याच्या माणुसकीवर आहे, तें सारं ढोंगच का? पैशाच्या आवाजाला आपलं मन केव्हापासनं हें असं भुलायला लागलं बरं?"

"मी कुठें ग हें स्थळ ठरवलं आहे? मी आपलं तुला सांगितलं कीं, असं असं एक स्थळ आलंय् सांगून; तुला पसंत असलं तर पुढचा विचार!"

" मला नाहीं बाई पसंत ! अन् माझ्या पसंतीचा यांत काय बरं प्रश्न? जिला उभा जन्म त्याच्याबरोबर काढायचाय्, त्या नवऱ्यामुलीची पसंती नको का विचारांत घ्यायला ? कुसुम ती ! एखादा भिकारी पसंत करील! पण विश्वासरावांसारख्या माणसाकडे नुसती ढुंकूनही पाह्यची नाहीं ! इथं असतांना आपण पाह्यलंत् ना ? विश्वासरावाचं नांव काढलं कीं, एकदम कशी तिथनं चालती होत असे; नाहींतर लोंचटपणा करून, तो बोलायला येईल म्हणून दुसऱ्या कोणाला तरी बाहेरून कडी लावायला सांगत असे ! होय ना ? मग अशी मुलगी, त्याच माणसाला नवरा म्हणून प्राण गेला तरी पसंत करणं शक्य आहे का ? "

" मी कुठं तसं म्हणतोंय् ? मलाही तो पसंत नाहीं; मीं आपली घटकाभर थट्टा केली ! आज तो आला होता इथें; अन् बेट्यानं जी एकदां सुरवात केली, ती शेवटीं स्वारी मुद्यावर आली; व आपण कुसुमशीं लग्न करायला तयार असल्याचें त्यानें लाजबीज सारी गुंडाळून ठेवून, प्रत्यक्ष मला–तिच्या बापाला — अगदीं स्पष्ट रीतीनें कळविलें ! प्रथम मला काय बोलावें तेंच सुचेना ! शेवटीं त्याला अप्रत्यक्ष रीतीनें माझी नापसंती कळविण्याचा मी प्रयत्न केला; पण आतां कदाचित् तो स्वतः तिलाही विचारील; त्याचा कांहीं नेम नाहीं ! माझी खात्री आहे चांगली थोबाडींत खाईल तिच्याकडून त्यावेळीं स्वारी गप्प बसेल; एरवीं तो स्वस्थ बसणं शक्य नाहीं ! "

" मग आपलंही म्हणणं माझ्यासारखंच आहे तर ! सुटलें बाई एकदांची ! काय पण मी घाबरून गेल्यें होत्यें अगदीं ! माझं नाजूक फूल! मेला पायाखालीं चुरडून टाकील ! देवाच्या डोक्यावर बसायची माझ्या बाळेची योग्यता ! तिला काय गटारांत फेंकून द्यायची कीं काय ? मेल्याला लाजलज्जा कांहीं म्हटल्या कांहींच कशी नाहीं वाटली, वाटेल तें तोंडानं विचारायला, मी म्हणत्यें ? "

" लाज ग कसली वाटायची ? जगांत असले लोक आहेत, म्हणून तर गरीब बिचाऱ्या पोरींचे हाल डोळ्यांनीं पहावे लागतात ? खरं म्हटलं तर, मुलीची पसंती नापसंती विचारल्याशिवाय लग्नच करूं नये आईबापांनीं मुलीचं ! प्रथम मुलीची पसंती घेऊन, नंतर आपली देऊन, आईबापांनीं

मुलामुलींचीं लग्नें जुळवावीं; यांतच मुलीच्या सुखाच्या दृष्टीनें आईबापांनीं आपलें कर्तव्य बजावलें असें म्हणतां येईल! त्यांत मुलीला सुख, आई-बापानांही सुख! लग्नासारख्या जन्मसंबंधाच्या बाबतींत, जिला आपला सारा जन्म दुसऱ्याबरोबर घालवायचा आहे, तिच्या पसंतीची खरोखरच जास्त जरूरी आहे! पण या बाबतींत, आईबाप आपल्याच पसंतीला जास्त महत्त्व देतात, आणि मुलीला मात्र कोणी एका अक्षरानेंही विचारीत नाहीं हा जुलूम नव्हे काय!

आपण बुवा या बाबतींत स्पष्टपणें जगाला सांगणार—प्रथम मुलीची पसंती मिळवा; आणि मग आमच्याकडे या! तिच्या पसंती कबुलीशिवाय आम्हांला एक शब्दही बोलता येणार नाहीं! काय मी म्हणतों तें खरं कीं नाहीं ग?"—वामनराव पत्नीच्या आनंदी मुखचर्येकडे पहात बोलत होते.

"मी बायकोमाणूस काय यांत सांगणार! अन् मला काय त्यांत कळायचंय्! आपण कराल तें सारं विचारानं कराल, याची मला अगदीं पुरी खात्री आहे, अन् माझ्या कुसुमचीही आहे!"

"आतां त्या विश्वासरावाला मात्र आपल्या दारावर नेहमींसारखा उभा करतां कामा नये; नाहींतर बिचाऱ्याची भलतीच समजूत व्हायची!"

"होय; आपण म्हणतां तें खरं आहे; पण त्याला एकदम आपलं घर बंद करणं बरं दिसणार नाहीं. आपण तें काम कुसुम इकडे आली कीं, तिच्याकडेच सोपवूं या; ती असल्या बाबतींत कुणाची भीडभाड ठेवणारी पोर नाहीं आहे! चांगला मेल्याला ताळ्यावर आणील!"

हें भाषण झाल्यावर, वामनराव बाहेर आले; बाहेर आल्यावर विश्वास-राव गेल्याचें पाहून, त्यांना सुटल्यासारखें झालें! व ते आपल्या दररोजच्या कार्यक्रमांत गढून गेले.

तोंपर्यंत आपल्या कथानायिकेच्या वडीलमातोश्रींची ओळख वाचकांना करून दिली तर ती अस्थानीं होणार नाहीं.

वामनराव हे रिटायर्ड रेव्हिन्यू ऑफिसर होते. त्यांना 'रावबहाद्दुर' हा किताब मिळाला होता; त्यांच्या घरांत येऊन जाऊन तीन माणसें!—ते स्वतः, त्यांच्या पत्नी वसुमतीताई आणि एकुलती एक कन्या म्हणजे

आपली कथानायिका कुसुम.

वामनरावांना किंवा त्यांच्या पत्नींना आपल्या लाडक्या सद्‌गुणी कन्येकडे पाहून अत्यंत धन्यता वाटत असे! आणि कोणालाही धन्यता वाटावी, अशीच ती मुलगी होती! या सुशील, सुविद्य कन्यारत्नाकडे पाहून तीं आपल्याला मुलगा नसल्याचें दुःखही पार विसरून गेलीं होतीं!

घरची अत्यंत श्रीमंती! तरी वामनराव व वसुमतीताई यांची वागणूक, राहाणी अगदीं साधी, प्रेमळ; लहानथोरांशीं वागण्याची त्यांची पद्धत एक नमुन्याची!— यामुळें वामनराव व वसुमतीताई हीं सर्वंध नगर शहरांत प्रत्येकाला माहीत होतीं; परंतु याहीपेक्षां त्यांचें नांव जें नगर शहरांत प्रत्येकाच्या तोंडीं होतें, त्याचें कारण म्हणजे त्यांची एकुलती एक मुलगी कुसुम होय! तिचें अद्वितीय सौंदर्य, असाधारण बुद्धिवैभव, अत्यंत लीन स्वभाव आणि लेखिका व कवयित्री या दोन्हीं नात्यांनीं तिनें मिळविलेला नांवलौकिक, हीं साऱ्या लोकांना माहीत असल्यामुळें वामनरावांचें नांव माहीत नाहीं असा सुशिक्षित गृहस्थ तर नगर शहरांत क्वचित्‌च आढळला असता.

* * * *

दुपारचें जेवण वगैरे आटोपल्यावर, थोडा वेळ विश्रांतीसाठीं वामनराव खोलींत गेले. इतक्यांत पोस्टाचा शिपाई त्यांच्या नांवानें हांक मारीत आला. ती हाक ऐकून वामनराव बाहेर आले; पोष्टमननें त्यांच्या नांवाचें एक पाकीट त्यांच्याजवळ दिलें, व तो निघून गेला. वामनरावांनीं तें पाकीट घेतलें व ते खोलींत गेले. आंत गेल्यावर त्यांनीं तें पाकीट फोडलें. पत्राच्या खालची सही वाचून, तें कुसुमचें पत्र आहे अशी त्यांची खात्री झाली; त्यामुळें त्यांना आश्चर्य वाटलें! कारण दोनच दिवसांपूर्वीं तिचें त्यांना पत्र आलें होतें. इतक्या लवकर ती कधीच पत्र पाठवीत नसे; त्यामुळें पत्रांत कांहीं तरी विशेष मजकूर असला पाहिजे असें वाटून, त्यांनीं तें घाईघाईनें वाचून पाहिलें. "मला दहा– पंधरा दिवसपर्यंत तिकडे येतां येणार नाहीं. पूर्वीच्या पत्रांत मी लवकर येतें म्हणून लिहिलें खरें, पण कांहीं जरूरीच्या कामाकरितां मी आणखी दहावीस दिवस येथेंच रहाणार आहें. नक्की केव्हां येईन ते कळवीनच." असा त्यांत मजकूर होता.

पूर्वीचा बेत बदलण्याला कारण काय झालें तें बिचाऱ्या वामनरावांना काय ठाऊक ? पत्र वाचून झाल्यावर त्यांनीं त्यांतला मजकूर आपल्या पत्नीला सांगितला.

आपली आवडती लेक लवकरच येणार, या विचारानें वसुमतीताई अगदीं आनंदांत होत्या; पण वामनरावांनीं सांगितलेला पत्रांतील मजकूर ऐकून त्यांच्या मनाचा विरस झाला ! व तो त्यांच्या चर्येवर उमटलेला वामनरावांनाही दिसून आला. त्यांनाही वाईट वाटलें होतेंच. साहजिक आहे, कुसुमचा लळा दोघांनाही अतिशयच होता. केवळ नाइलाज म्हणून त्यांनीं तिला आपल्यापासून दूर ठेविली होती. कुसुमही अजूनपर्यंत सुटी पडली रे पडली कीं, पुण्याला क्षणभरही न थांबतां, ताबडतोब नगरला येत असे. याच खेपेला मात्र ती ठरल्या मुदतीपेक्षा जास्त दिवस पुण्याला रहाणार होती. त्याला कारणही तसेंच घडलें होतें. चतुर वाचकांनीं ओळखलें असेलच ! 'किर्लोस्कर' थिएटरमध्यें कुमारांना पाहिल्या दिवसापासून कुसुमच्या मनाचा पूर्वीचा आनंदी मोकळेपणा पार नाहींसा झाला होता ! त्यांच्यासंबंधींच्या विचारांशिवाय कांहींएक तिला सुचत नसे ! त्यांची मनमोहन मूर्ति, अंतःकरणाच्या डोळ्यापुढें उभी करून, त्यांच्या सुखकर चिंतनांत ती तासचे तास आपल्या तळमळत्या मनाला, सूर्यास्तसमयीं सूर्याच्या संध्यारूप स्मृतिचिंतनांत गगनसुंदरी आपल्या विरही मनाला गुंगवून ठेविते त्याप्रमाणें, गुंगवून ठेवित असे ! तिला विशेष वाईट वाटत होतें तें हें कीं, इतके दिवस झाले तरी कुमारांविषयीं आपल्याला कांहींच माहिती मिळाली नाहीं ! किंवा लवकर मिळेल असा संभवही दिसत नव्हता ! त्यांचें दर्शन तर त्या दिवसानंतर तिला एकदांसुद्धां घडलें नव्हतें ! यामुळें ती जास्तच हिरमुसली झाली होती. तेव्हां तिनें मनांत असा निश्चय केला कीं, नगरला लवकर न जातां थोडे दिवस पुण्यांतच राहून, आपणांला त्यांची कांहीं माहिती मिळते का पहावी. निदान त्यांचें दर्शन तरी होईल या सुखकर आशेवर तिचा आणखी थोडे दिवस पुण्यासच राहण्याचा बेत होता; म्हणून तिनें त्याप्रमाणें पत्र पाठवून, वडिलांना कळविलें. वर वामनरावांना जें पत्र मिळालें होतें तें हेंच होय.

## कुंज ८ वा

कुमारांची दृष्टि रमावहिनींच्या घरांत जमलेल्या मंडळीकडे जातांच, तें चमकल्यासारखे झाले, वगैरे हकिगत मागेंच येऊन गेली आहे. असें चमकून जाण्यासारखें त्यांच्या डोळ्यांना तेथें काय दिसलें, तें जाणण्याविषयीं वाचक उत्सुक झाले असतील, तर तिकडे आतां आपण वळूं या !

रमावहिनींच्या घरीं विमलबरोबर आणखी दोन मुली हंसत खिदळत चहा घेत होत्या. त्यांपैकीं एक मुसलमान जातीची असून दुसरी– जिला पाहून कुमार चमकल्यासारखे झाले– ती तिची मैत्रीण कुसुम होती.

'किर्लोस्कर' थिएटरमध्यें ज्या बालिकेनें आपल्या सहजमनोहर सौंदर्यानें आणि मुग्ध, मधुर अशा अंतरंगींच्या हावभावांनें कुमारांचें भावकोमल मन आपल्याकडे आकर्षून घेतलें होतें, ती बालिका म्हणजे कुसुमच होय !

कुसुमनें कुमारांना वेड लाविलें, त्याप्रमाणें तिलाही त्यांनीं वेड लाविलें, यात कांहीं संशय नाहीं ! असें एकमेकांना परस्परांचें वेड लावण्यांत त्या जगन्नियंत्या जगदीशाचा काय हेतु होता, त्याचा त्यालाच माहीत ! नाजुक वायुलहर सुवासिक फुलांच्या दिव्य परिमळानें आकर्षिली जाऊन त्या परिमळाशीं समरस व्हावयाला पाहते ! त्यावेळीं तो दिव्य परिमलही त्या वायुलहरींत मिळून जाऊन ती लहर नेईल तिकडे जावयाला तयार असतो ! –इतकें त्यालाही त्या वायुलहरीचें आकर्षण असतें ! पण पुढें त्यांचा शेवट काय होतो, तो कोणीं पाहिला आहे का ?

आकर्षण ही भावना मानवी अंतःकरणांत किंवा निसर्गमनांत उत्पन्न करण्याचा सृष्टीचा हेतु, सजीव किंवा जड अशा कोणत्याही वस्तूनें आपल्या स्वतःच्याच विचारांत गुरफटून न जातां, जगांतल्या इतर वस्तूंच्या चिंतनात गढून जाऊन, पर्यायानें ज्यानें हा विश्वपसारा उत्पन्न केला आहे, त्या अज आणि अमर अशा दिव्यत्वाविषयीं मनांत पूज्यबुद्धि आणि आदर उत्पन्न व्हावा, आणि त्यामुळें त्यांत समरस होण्याची ओढ हृदयाला लागावी हाच असावा !

आकर्षणामुळें मनांत जी विशिष्ट भावना उत्पन्न होते, ती आनंदापेक्षां तळमळीचीच जास्त असते! शिवाय आकर्षण केव्हां उत्पन्न होतें? तर, आपल्यांत जें नाहीं, तें इतरांत उत्कर्षाला पोहोंचलेलें ज्यावेळीं आपल्याला आढळून येतें, त्यावेळींच!

" अपूर्ण अपुलें ईप्सित झालें पूर्ण दिसें जेथें
मनुजाचें मन सहज पावतें आकर्षण तेथें! "—

हे 'बालकवि' यांचे बोल किती समर्पक आहेत बरें?

हें 'तें' जें आपल्यांत नाहीं, आणि दुसऱ्यांत पूर्णत्वानें आहे, तें आपलें करण्यासाठी जी तळमळ, धडपड हृदयांत चालते ती आकर्षणानें उत्पन्न केलेली अवर्णनीय अशी आंतरिक तळमळ होय!

ही आतरिक तळमळ शांत करणें शक्य आहे का?—

ज्या वस्तूचें किंवा विषयाचें मनाला आकर्षण होतें, ती वस्तु किंवा तो विषय स्वतःच्या मालकीचा करूनही, ही आंतरिक तळमळ शांत होत नाहीं. ती शांत होऊन मनाचें पूर्ण समाधान व्हावयाला, ज्याचें आकर्षण मनाला होतें, त्यांत असलेलें अवर्णनीय असें, आकर्षणास कारणीभूत होणारें वैशिष्ट्य मनाला संपादन करतां आलें पाहिजे. हें अवर्णनीय असें आकर्षणास कारणीभूत होणारें वैशिष्ट्य ज्यावेळीं अंतःकरणाला संपादन करतां येईल, त्यावेळींच हें आकर्षण बंद होईल आणि मनाची तळमळ नाहींशी होईल. परंतु जग हें अपूर्ण असल्यामुळें, अशी स्थिति कधींच अनुभवतां येत नाहीं. कारण ज्याचा अनुभव घेता येणें शक्य आहे, किंवा जें संपादन करतां येण्यासारखें आहे, त्याचें आकर्षण होणेंच मुळीं शक्य नाहीं. त्यामुळें ज्या वस्तूचें आकर्षण होत असतें, ती वस्तु तरी आपल्या मालकीची व्हावी, निदान तिला आपल्याविषयीं तसेंच आकर्षण उत्पन्न व्हावें, आपल्याविषयीं तिला कांहींतरी वाटावें, असें अंतःकरणाला वाटूं लागतें.

कुमार आणि कुसुम यांच्या बाबतींतही अशाच प्रकारच्या भावना त्यांच्या अंतःकरणांत उत्पन्न होऊं लागल्या होत्या; आणि म्हणून, त्यांचीं हृदयें एकमेकांचीं मनें काबीज करण्यासाठीं अत्यंत उत्सुक झालीं होतीं.

कुमारांनीं रमावहिनींच्या घरीं कुसुमला पाहिली, त्यावेळीं त्यांच्या

मनाला जो दिव्य आनंद झाला त्याचें वर्णन करतां येणें अशक्य आहे ! त्या आनंदाच्या भरांत ते तिच्याकडे इतक्या एकाग्रतेनें पाहात राहिले कीं, कुसुमनें सहज म्हणून बाहेर दृष्टि फेंकली, त्यावेळीं त्यांची ती आपल्या मुखाकडे लागलेली एकाग्र दृष्टि पाहून, ती अत्यंत भावनावश झाली ! आणि त्या भावनावेशांत तिच्या हातांतला चहाचा प्याला खालीं पडून फुटला ! तरी तिचें लक्ष बाहेर कुमारांकडेच लागलें होतें ! सरळ फेंकलेला बाण ज्याप्रमाणें आजूबाजूला न पाहतां नेमका लक्ष्यविषयाकडे धांवत जातो त्याप्रमाणें तिची दृष्टि सरळ त्यांच्या मुखाकडे लागून राहिली !

कुसुमच्या मनःस्थितीचें कारण रोशननें ओळखलें; आणि त्यामुळें ती कांहीं बोलली नाहीं. पण विमलला त्याचा अर्थ कळेना; तिला वाटलें कीं, सहजच हातांतला प्याला निसटला असेल, आणि खालीं पडला असेल. तिला काय माहीत कीं, कल्पना नसतांना मनाला वेड लावणाऱ्या कुमारांच्या आकस्मिक दर्शनानें, तिच्या मनोवृत्ति भांबावून जाऊन, त्या भांबावल्या मनःस्थितींत तिच्या हातांतून तो प्याला खालीं पडला म्हणून ! त्यामुळें ती कुसुमला म्हणाली—

"काय ग ! हातांतनं प्याला निसटला कीं काय ?"—

कुसुम याच्यावर काय उत्तर देणार ? – आणि उत्तर देण्यासारख्या मनःस्थितींत तरी ती यावेळीं कोठें होती ? त्यामुळें रोशन तिला म्हणाली—

"होय ग होय; बोलण्याच्या गडबडींत हातांतनं प्याला निसटलासा वाटतो !" – असें म्हणत तिनें मुद्दाम कुसुमकडे हंसत हंसत पाहिलें. कुसुमनें यावेळीं इतका गोड मुरका मारला कीं, कुमार जर त्यावेळीं तो पहाते तर खरोखरच लाजबीज सारी गुंडाळून, त्यांनीं तिच्या गालावर चापट मारली असती ! पण कुसुम तेथें आहे, एवढी मनाची खात्री झाल्याबरोबर कुमार ताबडतोब घरीं गेले होते ! त्यांना पाहिजे होतें तें सांपडलें होतें ! ज्या बालिकेनें आपलें हृदय आपल्यापासून हिरावून नेलें होतें, ती बालिका विमलची मैत्रीण ! आणखी त्यांना काय पाहिजे होतें ? आणि तेथें आणखी जास्त वेळ उभें राहाण्याची तरी त्यांना काय जरूरी होती ?

घरीं आल्यावर, कुमारांची ती अत्यंत आनंदित आणि प्रफुल्लित मुद्रा पाहून इन्दूला अत्यंत आश्चर्य वाटलें ! कुमारांची मुख-

चर्या नेहमींच आनंदी असे हें जरी खरें, तरी आजची त्यांच्या मुद्रेवरची छटा कांहीं औरच होती! त्यामुळें इन्दूनें त्यांना विचारलें, – "काय, एवढा कसला आनंद झालाय् अगदीं? तिची भेटबीट झाली कीं काय? हरवलेली वस्तु सांपडली, म्हणजे जसा लहान मुलांना आनंद होतो, अगदीं तस्सा आनंद यावेळीं आपल्या मुखावर खेळत आहे! आपली हरवलेली वस्तु सांपडली कीं काय? माणसाला इतकं आनंदी होणं शक्य आहे असं मला कुणीं सांगितलं असतं तर, आपल्याला मी आतां न पहातें तर, मला मुळींसुद्धां खरं वाटलं नसतं बरं का! यालाच खरा आनंद म्हणतात, नाहीं का, गडे? असा खरा आनंद जगांत क्वचित्‌च पाह्यला किंवा अनुभवायला सांपडायचा! आपल्याला तो तसा अनुभवतां आला, अन् मला पाहतां आला, यामुळं माझं मनही पाह्यचं कसं आनंदानं नाचूं बागडूं लागलंय् तें! असा शुद्ध स्वरूपाचा आनंद मिळविण्यासाठीं, जीवाची सारखी धडपड चाललेली असते नाहीं का! पण या अपूर्ण जगांत ती अशी केव्हांतरी पुरी झालेली दृष्टीस पडते! हा असा शुद्ध, सात्विक आनंद आपल्या अंतःकरणाला नेहमीं उपभोगतां यावा, अन् आपण अनुभवित असतांना मला माझ्या डोळ्यांनीं तो पाहतां यावा, यासाठीं वाटेल तें करायला मी तयार आहें!"

यावर कुमार एकदम म्हणाले—"अशा तऱ्हेचा उच्च, सात्विक आणि दिव्य आनंद मला नेहमीं अनुभवतां, आणि तुला पाहतां येणं शक्य आहे बरं! आणि तें केवळ तुझ्या हातांत आहे, इन्दु!"

"माझ्या – या आपल्या लाडक्या इन्दूच्या – हातांत आहे? खरं का हें? मग सांगायचं गडे! मी काय करूं म्हणजे आपल्याला हा स्वर्गीय आनंद उपभोगतां येईल? आपण सांगाल तें करायला, मी माझ्या प्राणांचीही पर्वा करणार नाहीं बरं!"

"इन्दु! लाडके! सांगूंच का ग? सांगतोंच तर – ऐक, नीट कान करून ऐक बरं का – ज्या बालिकेनं माझं अंतःकरण आपल्या प्रीतिपाशानं पूर्णपणें अंकित केलें आहे, त्या बालिकेला माझी करायला – जगाच्या दृष्टीनें माझी करायला – मला अगदीं अंतःकरणपूर्वक अनुमति दे! तूं अशी

अनुमति मला आपण होऊन अगदीं आनंदानें दिलीस, तर माझ्यासारखा भाग्यवान् मीच ! ”

“ पतिस्वरूप परमेश्वरा ! आपल्यासाठीं — आपल्या सुखा-आनंदासाठीं — एवढंही करायला मी मागंपुढं पाहीन, अशी का आपल्या अंतःकरणाला भीति वाटली ? असं आपल्याला वाटलं असेल, तर नाथ ! आपण आपल्या या इन्दूला इतक्या दिवसाच्या अनुभवानंही ओळखायचं झालं नाहीं,असंच मी समजेन बरं ! बरं तें जाऊं दे गडे. आपल्याला तो दिव्य आनंद उपभोगायचा आहे ना ? तर तो आनंद उपभोगण्यासाठीं आपण खुशाल आपल्या प्रीतिदेवतेशीं विवाह करायचा ! त्यासाठीं माझी अनुमति आपल्याला पाहिजेच असेल, तर ती मी द्यायला — आनंदानं द्यायला—अगदीं तयार आहें ! आपल्या आनंदासाठीं, मी एवढं सुद्धां करणार नाहीं, तर माझ्या जन्माचा उपयोग तो काय बरं ? पतीच्या हृदयाला आनंद देणं, हेंच पत्नीचं कर्तव्य आहे ! कर्तव्य तर आहेच, पण त्यात तिला आनंद अन् अभिमानही आहे ! तें कर्तव्य पुरें करण्यासाटीं — तो आनंद अन अभिमान मिळविण्यासाठीं — परमेश्वरानं मला हा असा प्रसंग आणून दिला, याबद्दल त्या परमेश्वराची मी सहस्रशः आभारी आहें. ”

इन्दूचें हें भाषण ऐकून, कुमारांना आपल्या पत्नीचा अत्यंत अभिमान वाटला, आणि आनंदही झाला ! त्या आनंदाच्या भरात ते म्हणाले—

“ इन्दु ! तूं मर्त्यलोकींची मानव नसून कोणी तरी स्वर्गांतील शापभ्रष्ट देवता आहेस ! आणि माझी पुण्याई जबर म्हणून तर मला अंतिम सुखाचा अनुभव आणून देण्यासाठीं या जगांत माझी पत्नी म्हणून जन्मास आली आहेस ! देवी ! तुझ्या पायांजवळही उभा राहाण्याची माझी योग्यता नाहीं बरं ! माझ्या आनंदासाठीं—मला सुख व्हावें म्हणून—मला तूं दुसरें लग्नही करावयाला आनंदानें, स्वसंतोषानें कबुली देत आहेस, हें पाहून स्वर्गांतले गंधर्व किन्नर तुझीं स्तुतिगीतें मोठ्या आनंदानें गात तुझ्याकडे टक्मक् पहात असतील ! तुझ्यासारखी पत्नी मिळणें, म्हणजे खरोखरच महद्भाग्य होय. तें महद्भाग्य मला लाभलं, याबद्दल त्या विश्वनियंत्याचे आभार मानावे तितके थोडेच आहेत ! ”

कुमारांच्या या स्तुतिपूर्ण भाषणानें, इन्दु अगदीं लाजून गेली ! त्यामुळें तिला कांहीं सुचेना, किंवा वर मान करून त्यांच्या मुखाकडे बघवेना !

यासाठीं ती तेथून पळून जाण्याच्या बेतांत दिसली. कुमारांनीं हा तिचा उद्देश जाणला, आणि ती पळून जाण्यापूर्वींच आपल्या हातानें तिचा गोंडस हात त्यांनीं आपल्या हातांत धरून ठेविला ! इन्दूची या वेळची मुद्रा पाहण्यासारखी होती ! कुमारांनीं तिचा हात यापूर्वीं असा किती वेळां तरी धरला असेल; पण आज ज्या भावना तिच्या अंतःकरणांत त्यांच्या हस्तस्पर्शानें उत्पन्न झाल्या, तशा पूर्वीं आपण कधींही अनुभविल्या नाहींत अशी तिची तात्काळ खात्री झाली ! कुमारांना तर यावेळीं तिच्या त्या सुंदर मुखकमलाकडे एकसारखें पहात रहावेंसें वाटूं लागलें; व त्याप्रमाणें ते तिच्याकडे स्थिर दृष्टीनें पहात राहिले. यामुळें ती अगदींच लाजल्यासारखी झाली ! आणि " असं एकसारखं काय पाह्यचं माझ्या तोंडाकडे ?" एवढें बोलून, तिनें आपलें मुख त्याच्या कुशींत लपविलें ! कुमारांच्या वृत्ति अगदीं उचंबळून आल्या ! त्यांनीं तिला हृदयाशीं घट्ट कवटाळून धरिलें, आणि तिच्या डोक्यावर आपले ओंठ टेकले ! !

त्या स्पर्शानें परस्परांना जो काय आनंदानुभव मिळाला, त्याचें वर्णन करण्याच्या भानगडींत न पडणें हाच उत्तम मार्ग ! ! !

* * *

इकडे विमलच्या घरीं, कुसुम व रोशन बराच वेळ गप्पा मारीत बसल्या होत्या; परंतु त्या गप्पांकडे, खरें पाहिलें तर, कुसुमचें मुळींसुद्धां लक्ष नव्हतें. ती उगाच एखादा शब्द बोले; पण विमलला त्यांत कांहीं विशेष असें वाटलें नाहीं; कारण कुसुम कधीं कधीं अशी चार मंडळींतसुद्धां मुळीं न बोलतां स्वस्थ बसत असल्याचें तिला चांगलें ठाऊक होतें; असा अनुभव तिला पुष्कळ वेळां आला होता. बोलतां बोलतां पुष्कळ वेळां कुसुम एकदम जी गप्प बसत असे, ती बराच वेळ होईपर्यंत पुन्हां बोलतच नसे. ही तिची खोड विमलला माहीत असल्यामुळें, या वेळच्या तिच्या स्तब्धतेचें तिला नवल वाटलें नाहीं; पण रोशननें मात्र पूर्णपणें जाणलें कीं, आजच्या तिच्या स्तब्ध बसण्याचें कारण नेहमींपेक्षां निराळें आहे; आणि तें म्हणजे कुमारांचें त्या ठिकाणीं आकस्मिक आगमन हें होय.

रोशनला असें वाटलें कीं, कुमारांची विमलला माहिती असावी; म्हणून ती विमलला म्हणाली–" काय ग विमल! थोड्या वेळापूर्वी तुझ्या घराबाहेर उभे होते ते कोण ग? तुला माहित आहेत का?"

" म्हणजे ते कोण तें तुम्हांला माहीत नाहीं का? अग ते नन्दकुमार, ' रत्नकंकण ' नाटक ज्यांनीं लिहिलंय् ते!"

" खरं का?" असे आश्चर्योद्गार रोशन व कुसुम यांच्या तोंडांतून विमलचे ' ते नन्दकुमार! हे शब्द ऐकून–फुटबॉलला भोंक पडलें, म्हणजे त्यांतून हवा बाहेर पडावी त्याप्रमाणें–एकदम बाहेर पडले! रोशनच्या मुखावर कौतुकाची कोंवळीक झळकत होती! आणि कुसुमच्या?– तिच्या अंतःस्थितीचें वर्णन करणें म्हणजे अत्यंत सुस्वर गायन कानांनीं ऐकल्यावर त्याचा ठसा, दुसऱ्याला त्याची कल्पना आणून देण्यासाठीं, शब्दचित्रानें उठविण्याचा प्रयत्न करण्यासारखें निष्फळ होणार होतें! रोशन तर कुसुमकडे सारखी टक लावून पहात होती! तिच्या मुखावरची दृष्टि पळभरही काढून घ्यावी असें तिला वाटेना!

विमलचें लक्ष या हालचालींकडे होतेंच! म्हणून ती त्यांना म्हणाली–

" असं काय ग करतांहांत्! ते तुमच्या ओळखीचे आहेत का?"

यावर त्या काय उत्तर देणार? तरी रोशन म्हणालीच, " त्यांच्यासारख्यांची ओळख असायचं भाग्य कुठं आहे आमचं ग?"

हें ऐकून विमल तिला म्हणाली,–" त्यांची आमची अगदीं चांगली ओळख आहे बरं का! ते अन्–( पुढचें नांव घ्यावयाला तिची जीभ अडखळली; तरी तें बरें दिसणार नाहीं म्हणून नाइलाजानें तें तिला घ्यावें लागलें )– वसंतराव, दोघे नेहमीं आमच्याकडे येत जात असतात. तुमची त्यांची ओळख देईन करून मी. नंदकुमार स्वभावानं अत्यंत मोकळ्या मनाचे आहेत बरं! गर्वाचा लेशही नाहीं त्यांच्या अंतःकरणांत! असा सुस्वभावी माणूस क्वचित्च आढळतो बरं रोशन!"

या भाषणाचा परिणाम कुसुमच्या मनावर जो व्हावयाचा तो झालाच! तिच्या मनांतून आणखी पुष्कळ विचारावयाचें होतें! परंतु रोशन जवळ असल्यामुळें ती एकही शब्द बोलली नाहीं! गिरिकुव्हरें स्वस्थ उभीं असल्याप्रमाणें दिसत असलीं, तरी त्यांच्या अंतर्भागांत रानवेलींचीं, लहान-

सहान ओहोळांची एक प्रकारची नाजुक गुणगुण वाऱ्याच्या स्पर्शानें चाल-लेली असते, त्याप्रमाणें ती स्वस्थ असल्यासारखी दिसत होती तरी विमल-च्या वरच्या भाषणानें उत्पन्न झालेले नाजूक विचार तिच्या अंतःकरणांत दिव्यानंदाच्या लहरी उत्पन्न करीत होते !

विमल पुढें म्हणाली—" आतां सुद्धां ते इकडे येणार असते; पण तुमची त्यांची ओळख नाहीं म्हणून ते इकडे न येतां तसेच परस्पर गेले असावेत; पण असें एकही शब्द न बोलतां जाणारं त्यांचं हृदय नाहीं बरं रोशन ! कदाचित् घरीं काहीं घाईबिई असेल; पुन्हां तुम्ही इकडे केव्हां आलां, तर त्यांची तुमची अवश्य ओळख करून देईन बरं मी ! "

या वेळीं कुसुमच्या अंतःकरणांत ज्या गोड तरंगलहरींचा नाच चालला होता, त्यांचें तिच्या मुखावर पडलेलें अस्पष्ट प्रतिबिंब जरा बार-काईनें पाहणारांस ताबडतोब दिसून आलें असतें ! तिच्या हृदयाला वाटलें—कुमार जे असे एकाएकीं निघून गेले, ते त्यांना खरोखरच घरीं काम होतें म्हणून, कीं,—की—पुढचा विचार मनात येतांच ती आपली आपल्याशींच लाजली ! आपल्या दर्शनानें जर त्यांच्या हृदयाची अशी नाजुक स्थिति झाली असेल तर, तर आपण किती बरं भाग्यशाली !— या विचारानें तिचें कोमल भावमुग्ध अंतःकरण इतकें उचंबळून आलें कीं, ती रोशनला लागलीच म्हणाली—" रोशन ! चल ना गडे ! चल ना, जाऊं आतां आपण ! "

या वेळच्या तिच्या मुद्रेंत इतका गोड आणि मधुर भाव उत्पन्न झाला होता कीं, कोणाही सहृदय माणसाचें अंतःकरण त्यामुळें गारीगार झालें असतें ! कुसुमच्या मनाची स्थिति ओळखून रोशनही विमलला म्हणाली—" बरं विमल ! आम्ही येतों आतां बरं का ! उशिर झालाय्; कॉलेजांतही जायचंय् ! तूं येणार का ग कॉलेजांत आज, विमल ? "

" मी आलें तर येईन; माझी टर्म कधींच भरली; तुमची भरली का ग ? "

" हो, कुसुमची केव्हांच भरली ! माझी मात्र भरायची आहे. "

" मग टर्म भरली तर काय ग, कुसुम, तुला सुट्टींत घरीं नाहीं जायचं का ? "

" जायचंय् कीं ! पण परीक्षेला बसायचं आहे म्हणून नाहीं गेलें अजून मी. "

तिला घरीं न जाण्याचें कारण परीक्षेला बसणें हेंच केवळ नव्हतें ! परीक्षेशिवाय दुसरेंही कारण, आणि महत्त्वाचें कारण, तिच्या घरीं न जाण्याला होतें ! कुमारांचें दर्शन घडावें, निदान त्यांची माहिती तरी मिळावी या हेतूनें सुट्टींत घरीं जाण्याचें ती लांबणीवर टाकीत होती हें वाचकांना माहीत आहेच ! पण तिचें हें कारण बिचाऱ्या विमलला काय ठाऊक ? म्हणून ती कुसुमला म्हणाली—

" काय ग ! कुसुम, यंदा तयारी अगदीं जोरांत आहे ना ? फर्स्ट क्लास मिळविशील कीं नाहीं ? कॉलेज स्कॉलरशिप् तर तुझी ठरलेलीच आहे म्हणा, होय ना ? "—

या प्रश्नाचें उत्तर काय द्यावें, तें कुसुमला कळेना ! ती परीक्षेला बसणार होती, ती क्लास मिळविण्यासाठीं, कीं आपलें जाणें लांबणीवर टाकण्यासाठीं हें तिचें तिलाच ठाऊक होतें ! त्यामुळें " स्कॉलर्शिप् मिळेल कदाचित्; पण माझा अभ्यास मुळींच झाला नाहीं ग या टर्मला ! " एवढें बोलून ती स्तब्ध बसली.

" अभ्यास न व्हायला काय दुसऱ्या कसल्या उद्योगांत गढून गेली होतीस वाटतं ? काय ग ? "

हा प्रश्न ऐकून रोशन कुसुमकडे पाहून अशी कांहीं हंसली कीं, कुसुमला कसेंसेंच झालें !

विमल म्हणाली—" काय ग ! हंसायला काय झालं ग एवढं ? अभ्यासाशिवाय तुमच्यासारख्या मुलींना दुसरा कांहीं उद्योगच नसतो जसं काय ! कुणाकडे लक्ष बिक्ष तर नाहींना गेलंय् तुझं ?"— हा प्रश्न करून विमल कुसुमकडे रोखून पाहूं लागली !

" कांहीं तरी काय बोलत्येस तूं ग हें विमल ? " कुसुमनें उत्तर देण्या-ऐवजीं रोशननेंच दिलेलें पाहून विमलला हंसूं लोटलें ! आणि ती ताबड-तोब म्हणाली—

" काय ग रोशन ! तिच्या अंतःकरणांतल्या विचारांविकारांचें वकीलपत्र तूं घेतलं आहेस कीं काय ! तसं नसतं, तर तिला विचारलेल्या असल्या नाजूक प्रश्नाचं उत्तर तुला ग कसं देतां आलं ! "

रोशनला त्याच्यावर काय बोलावें तें सुचेना ! म्हणून ती विमलला म्हणाली—

" विमल ! पुरे तुझा आतां हा चावटपणा ! आम्हांला उशीर होतोय्; आम्ही जातों गडे आता. "

असें म्हणून कुसुमचा हात धरून रोशन ' रेसिडेन्सींत ' जावयास निघाली.

विमल, कुसुम आणि रोशन एकाच वर्गात होत्या; त्यांनीं एकच विषय बी.ए. ला घेतला होता; त्यामुळें विमलची व त्यांची लवकरच चांगली ओळख झाली; आणि त्या ओळखीचें पर्यवसान अत्यंत जिवलग अशा मैत्रींत झालें ! एखादा ' पिरिअड ' ' ऑफ ' असला, म्हणजे विमल रेसिडेन्सींतल्या तिच्या खोलींत जाऊन बसत असे; अशीच एकदां ती तेथें गेली असतांना कुसुम व रोशनला तिनें आपल्या घरीं सहज येऊन जावयाला सांगितलें होतें; त्याप्रमाणें आज त्या तिच्या घरीं आल्या होत्या.



## कुंज ९ वा.

कुसुम व रोशन जाऊन थोडावेळ झाला नाहीं, तोंच रमावहिनी घरीं परत आल्या. कुमारांबरोबर भाषण झाल्यावर त्या उमाकाकूंकडे जाऊन बसल्या. त्या ठिकाणीं सुद्धां आपल्या जिभेचा पट्टा सुरू करावयाला त्या मुळींच विसरल्या नाहींत! उमाकाकू त्यांना समजावीत होत्या— " असं चालायचंच् हो, वहिनी! हल्लींच्या पोरांपोरींचं देवाधर्माकडे आतां कुठं लक्ष राहिलंय्! त्यांतनं विमल अन् त्या पोरी शिकल्यासवरलेल्या, काळजांत जाऊन मोठमोठीं पुस्तकं वाचणाऱ्या! त्या काय थोड्याच जुन्या धर्मरूढींना भिऊन वागणाराहेत! पण मी म्हणत्यें तुमच्यासारख्या पोक्त अन् धर्मभिरु माणसांच्या देखत तरी त्यांनीं असले वेडेचार करायचे नव्हते! असो म्हणा; पण वहिनी! मी तुम्हांला सांगतें, आपण या असल्या गोष्टींत आतां लक्षच घालूं नये अगदीं! आतां हें असंच चालायचं बरं! "

" अहो काय चालायचंच् असं! अशा सवलती अन् मुभा असल्या बहकलेल्या तरुण पोरींना दिल्या, तर त्या कशा अन् कुणीकडे वाहवतील त्याचा काय थांगपत्ता लागायचा नाहीं! अशा वागणुकीनं या पोरी पुढें लगीन झाल्यावर नवऱ्याला नवरासुद्धां म्हणायला तयार व्हायच्या नाहींत, बघा तुम्ही काकू मी सांगतें तें खोटं का खरं तें! मी म्हणत्यें लेकांनो शिका तुम्ही, तुम्हांला शिकासवरायची हौस असली तर, पण असले भ्रष्टाकार का करायचे ब्राह्मणाच्या घरांत! ह्यांचें एक असो; पण त्या बाटगीला काय कळूं नये का— कीं बाई हें ब्राह्मणाचें घर आहे, तर आपण आपलं तिथं जरा बेताबातानं, अन् जपून वागावं! पण नाहीं! एवढीं मोठीं शिक्षणं घेतात! कसलीं हो शिक्षणं अन् अभ्यास! शिक्षणाच्या नांवाखालीं नुसता सांवळागोंधळ माजवायचा, अन् मजा मारायची मन मानेल तशी, दुसरं आणखीन् काय! शिक्षण घेऊन काय उजेड लावणाराहेत तें दिसतंय्च! ही विधवा! पण तिला त्याचा कांहीं विधिनिषेध तरी आहे

का! जशी काय एखादी नवी लग्नाची मुलगी! आपलं आपण बघायला नको का! काय मी म्हणत्यें तें खोटं का हो काकू! खोटं असेल तर बेलाशक् तुम्ही माझ्या चार तोंडांत मारा! उगाच तोंडापुरतं नका 'होय होय' म्हणूं!

मला जाऊन आतां तीं सारीं भांडीं सारखीं राखेनं घांसून घेतलीं पाहिजेत, अन् त्यांच्यावर चांगलं गोमूत शिंपडून टाकलं पाहिजे! मेल्यांनो! आपल्या सुखाचैनीसाठीं दुसऱ्यांना कां रे त्रासांत लोटतां! देव कांहीं डोळे मिटून नाहीं बसलाय् बरं! चांगला बघून घेईल तुम्हांला, रांडेच्यानों!"

असें बोलून ती प्रत्येकीचें वर्णन करूं लागली; प्रत्येकीची केंस बांधण्याची तऱ्हा; पोलका घालण्याची रीत; न दिसेल असें कुंकू लावण्याची पद्धत– कांहीं कांहीं तिच्या तडाक्यांतून सुटलें नाहीं!

एवढें झालें तरी कुसुमविषयीं मात्र तिचा ग्रह चांगला झाला; आणि तसें तिनें उमाकाकूंना बोलूनही दाखविलें!– "ती एक पोर मला बरी दिसली; इतकी सुंदर, पण राहणी सवरणी कशी अगदीं साधी अन् बालबोध पद्धतीची बरं का; मला बाई तिच्याकडे सारखं पहात रहावंसंच वाटत होतं! पण तो तिथला भरष्टाकार अन् चाळे बघून मी आपली बाहेरच आलें! तुमचा वसंत आहे ना! त्याला ती बायको कशी अगदीं छान शोभेल! विचारून बघा तुम्ही वसंताला! जोडा कसा अगदीं लक्ष्मीनारायणासारखा शोभेल बरं का, काकू! कुमारांच्या इन्दूवर कडी आहे बरं तिची! मला बाई, खरंच सांगत्यें काकू! तिच्याविषयीं आपलेपणाचा भाव वाटूं लागलाय् बघा नुसते एकदोन क्षण बघून तिला! कुणाची कोण, कांहीं माहीत नाहीं मला, पण चांगल्या कुलवान् अन् संपन्न घराण्यांतली असणार ती, याबद्दल मला कांहीं संशय नाहीं!"

थोड्या वेळानें रमावहिनी वर सांगितल्याप्रमाणें घरीं आल्या; विमल तिचीच वाट पहात होती. पहिल्या प्रथम तिच्या मनांतून कॉलेजांत जावयाचें नव्हतें; परंतु वहिनींचा राग शांत होण्याला आपण येथून दूरच गेलें पाहिजे, नाहींतर तिचा राग उलटा वाढावयाचा, म्हणून वहिनीला आलेली पाहून ती तावडतोब जेवावयाला बसली. ती जेवत असतां वहिनींनीं तिच्याजवळ कुसुमची चौकशी केली; यामुळें विमलला मात्र बरें वाटलें.

मघांची वहिनींची लहर जरा फिरली आहे, आणि तिच्या मनांत कुसुम-विषयीं तरी वाईट ग्रह झालेला नाहीं, यामुळें कुसुमची सर्व माहिती तिनें वहिनींना सांगून टाकली. ती ऐकून कुसुमविषयीं त्यांचें जास्तच चांगलें मत झालें; आणि ती विमलला म्हणाली—

"तिला इकडे केव्हां तरी अशी घेऊन येत जा कीं ग! अशा पोरी-बरोबर संगतसोबत ठेविलीस तर त्यांत तुझ्यासारख्या मुलीला खरोखरच फायदा आहे विमल! त्या मुसलमानिणीला बरीक नको आणूं इकडे."

यावर विमल म्हणाली, "ती मुसलमानीण फक्त धर्मानंच आहे हो वहिनी! बाकी तिचं चालणंवागणं, सारं अगदीं आपल्या ब्राह्मणासारखंच आहे. कॉलेजांत साऱ्या मुली एके ठिकाणींच बसून खातात जेवतात, त्यामुळें आम्हां कुणाला ती परकी वाटत नाहीं, वहिनी! तिलाही त्यांत कांहीं चुकल्याचुकल्यासारखं नाहीं वाटत; मग कुसुमबरोबर ती एकादे वेळ आली तर त्यांत काय हो एवढं बिघडलं वहिनी!"

"बरं, बरं! तशी ती चांगली मुलगी असेल तर येईना बिचारी; माझं काय जातंय्! पण खाणंपिणं बरीक तिला वेगळ्या भांड्यांतनं देत जा बरं का, ग!"

विमलला वहिनी इतकें तरी करायला तयार झाल्या याचाच आनंद झाला! खरें म्हटलें तर वहिनींचा स्वभाव जात्या दुष्ट नव्हता! पण जुन्या चालीच्या माणसांना, त्यांतून वहिनींसारख्या म्हाताऱ्या बायकांना, असले सुधारकी चाळे आवडणें शक्यच नाहीं! त्यामुळें ती विमलला प्रथम बोलली खरी; परंतु नंतर तिच्याकडून कुसुमची व रोशनची सगळी माहिती ऐकून घेतल्यावर तिचा राग थोडा थोडा शांत होऊं लागला! आणि शेवटीं तिनें रोशनला घरीं घेऊन यावयाला तिला परवानगी दिली. विम-लला मनापासून आनंद झाला; त्या आनंदांत तिला कॉलेजांत जावयाचें नव्हतें तरी ती मुद्दाम कॉलेजला गेली!

× × × ×

संध्याकाळीं विमल घरीं आली, तर कुमार आपली वाट पहात अस-लेले पाहून तिला फार आश्चर्य वाटलें! कुमार तिच्या घरीं येत जात असत; पण एकटे क्वचित्च; बहुतेक वसंत त्यांच्याबरोबर असत असे;

यामुळें तिला वाटलें कीं, कुमारांचें वहिनींकडे कांहीं तरी काम असेल; म्हणून तिनें त्यांना विचारिलें, “ वहिनी भेटल्या का ? ”

“ वहिनी भेटल्या मघांच ! मला चहाबिहा करून देऊन स्वारी बाहेर गेली आहे. ‘ जरा देवळांत जाऊन येत्यें हं ! तोपर्यंत बसा; आमची विमल येईल आतां इतक्यांत ’ असें सांगून त्या गेल्या बाहेर. ”—

थोडा वेळ कोण कांहीं बोललें नाहीं. कुमारांच्या मनांतून विमलशीं पुष्कळ बोलावयाचें होतें; पण सुरवात कशी करावी हेंच त्यांना समजेना ! पण स्वस्थ बसावें तर वाईट दिसेल, शिवाय आपला तेथें येण्याचाही हेतु अपूर्ण राहील म्हणून ते म्हणाले—

“ सकाळीं तुमच्याकडे कोण मंडळी आली होती ? ”

“ त्या आमच्या कॉलेजमधल्या मुली. आम्ही तिघी एका वर्गांत आहोंत; एकीचं नांव कुसुम, आणि दुसरीचं नांव रोशन; आम्ही अगदीं जीवाभावाच्या मैत्रिणी आहोंत; आमच्या वर्गांत आमच्याशिवाय आणखी मुलीच नाहींत, त्यामुळें तर आमची मैत्री लवकर जमली. ” एवढें बोलून विमल थांबली; कुमाराना अजून कितीतरी माहिती पाहिजे होती; विशेषतः कुसुमविषयीं जितकी माहिती मिळेल तितकी त्यांना ती थोडीच होणार होती; त्यामुळें विमल थांबलेली पाहून त्यांना जरा वाईट वाटलें; आपण होऊन तिची चवकशी करणें बरें दिसणार नाहीं यामुळें एकदम तिच्याविषयीं त्यांना चवकशी करतां येईना ! पण त्यांच्या सुदैवानें विमलनें आपण होऊनच सुरवात केली—

“ आमच्या सबंध कॉलेजांत कुसुमसारखी हुशार मुलगी नाहीं. तिचे लेख, गोष्टी, कविता वगैरे लिखाण बहुतेक सगळ्या मासिकांतून प्रसिद्ध होत असतें. ”

या वेळीं कुमारांना ‘ कुमारी कुसुम ’ या नांवाखालीं कांहीं कविता, गोष्टी वाचलेल्या आठवल्या; परंतु ती कुसुम ही असेल ही त्यांना स्वप्नांतही कल्पना आली नाहीं.

विमल पुढें बोलूं लागली— “ शिवाय ‘ बॅड्मिंटन्,’ ‘ पिंगपॉंग, ’ ‘ कॅरम, ’ ‘ टेनिस, ’ ‘ बुद्धिबळ ’ वगैरे बहुतेक सर्व खेळांत तिनं कॉलेजांतलीं ‘ प्राइझिस् ’ मिळवलीं आहेत ! कॉलेजांत ती विशेष जेर कशा-

बद्दल प्रसिद्ध असेल तर तिच्या गोड आवाजाबद्दल; दररोज तिचें गाणें रेसिडेन्सींतल्या मुली ऐकत असतात; अन् तीही त्यांची इच्छा पुरी करीत असते. पुरुषांत मात्र ती विशेष पुढं पुढं करीत नाहीं; तें तिला आवडत नाहींसं दिसतं; तरी एक दोन वेळ ती मुलांसमोर गाइली आहे.

खरोखर हिच्यासारखी गुणी मुलगी विरळा! ती नगरला राहाते; तिला भाऊ वगैरे कुणी नाहीं; आईबापांची एकुलती एक मुलगी; तिचे वडील कुणी एक पेन्शनर ऑफिसर आहेत म्हणे; त्यांना ' रावबहाद्दूर ' किताब मिळाल्याचं ती आम्हांला मागें सांगत होती. विशेष जो तिचा लळा आम्हां मुलींना लागलाय् तो तिच्या मनमिळाऊ स्वभावाचा! तिच्यासारखी गरीब अन् गुणी पोरगी क्वचित्च आढळेल! दुसरी रोशन, तिची कांहीं मला विशेष माहिती नाहीं."

पाहिजे असलेली माहिती अशी अचानक मिळालेली पाहून कुमारांना अत्यानंद झाला!

विमल आणखी पुढें सांगूं लागली—" त्यांना तुमची ओळख करायची होती; पण तुम्ही इथं आलां तसे गेलां, त्यामुळं त्यांची इच्छा पुरी झाली नाहीं!

हें एकून कुमारांना आश्चर्य आणि आनंद वाटून ते विमलला म्हणाले—" दोघींचीही इच्छा होती का माझ्याशीं ओळख करून घ्यायची?"

" होय, दोघींची असली तर त्यांत नवल काय? आपण 'रत्नकंकण' नाटकाचे लेखक, एवढं कळल्यावर कोण नाहीं आपल्या ओळखीची इच्छा करणार? पण कुसुम कांहीं तसं स्पष्ट म्हणाली नाहीं कांहीं; रोशननेंच तुमच्या ओळखीचा प्रश्न काढला. तुम्ही येण्यापूर्वी कुसुम कशी अगदीं पोपटासारखी बोलत होती! तुम्हांला पाहून मात्र जी एकदम बोलण्याची बंद झाली, ती जाईपर्यंत अगदीं स्वस्थ होती! तिचा स्वभावच असा आहे; परका पुरुष बघितलान् रे बघितलान् कीं ती अगदीं गरीब गाय बनते! किंवा तिला परका पुरुष असतांना बोलूं नयेसं वाटत असेल; काय आहे काय कीं; पण अशी ती वागते खरी."

यावेळीं कुमारांची जर कोणीं खात्री केली असती कीं तुमच्यामुळेंच ती बोलायची बंद झाली तर त्यांना हातांत स्वर्ग आल्यासारखें झालें

असतें! पण तसें त्यांना तेथें कोण सांगणारा होता! त्यामुळें त्यांची आनंदी मुद्रा जरा हिरमुसल्यासारखी दिसूं लागली!

थोड्या वेळानें विमल म्हणाली – "दोन चार दिवसांनीं त्या इकडे येणार आहेत; त्यावेळीं तुम्ही इकडे याल का? त्या आल्या म्हणजे मी आपल्याला बोलवायला पाठवीन बरं का! बरोबर त्यांनाही घेऊन या!"

हे 'ते' कोण तें कुमारांनीं तात्काळ ओळखलें; तरी जरा गंमत करण्याच्या उद्देशानें ते म्हणाले – "हे 'ते' कोण बुवा! नांव समजल्याशिवाय आम्ही कोणाला घेऊन येणार बरं?"

हें ऐकून विमल अगदीं लाजून गेली! कुमारांना वसंतरावांकडून विमलचें त्यांच्यावर व त्यांचें तिच्यावर प्रेम असल्याचें मागेंच समजून आलें होतें. या दुर्दैवी आणि गरीब विधवा मुलीचा वसंतबरोबर विवाह व्हावा असें कुमारांना मनापासून वाटत होतें; दोघेंही एकमेकांना अनुरूप होतीं! तेव्हां कुमार म्हणाले – "आम्हांला 'ते' कोण तें अजून कांहीं कळलं नाहीं; तरी 'त्यांना' आणण्याचा मी प्रयत्न करून बघेन बरं, विमल."

एवढें बोलून कुमार हसूं लागले; त्यामुळें विमलला 'कुसंसंच' झालें!

इतक्यांत रमावहिनी देवदर्शनाहून आल्या. कुमारांना अजून तेथेंच पाहून त्यांना आश्चर्य वाटलें आणि आनंदही झाला! कुमार वसंतविषयीं रमावहिनींच्या मनांत अत्यंत आपुलकीची भावना होती! त्या प्रेमभरांत त्या एखादे वेळ त्यांना 'अहो, जाहो' म्हणत; तर एखादे वेळ 'अरे, तुरेही' म्हणत असत; पण कशाही रीतीनें हांक मारली तरी आपला त्यांच्याविषयींचा प्रेमभाव कमी झाला आहे, असें त्यांना कधीं वाटलें नाहीं. त्यांना स्वतःला मूलबाळ वगैरे कांहीं नव्हतें; तरी कुमार, वसंत, विमल, इन्दु यांच्याकडे पाहून त्या आपलें दुःख विसरण्याचा प्रयत्न करीत असत! तीं सर्व त्यांना आपल्या आईप्रमाणें मान देत असत; आणि त्यांतच त्यांच्या दुःखी मनाला सुख होत असे!

आतां आल्याबरोबर कुमाराकडे पाहून त्या म्हणाल्या—

"काय रे, अजून बसलायस् का! मला जरा उशीर झाला; तिथं त्या देवळांत एका बुवाचं कीर्तन ऐकत बसलें ती बसलेंच; कीर्तनकार

कुणी मुंबईकडचा प्रसिद्ध माणूस होता म्हणे! मला काय बाई तें पुरं झाल्याशिवाय पाऊलच उचलवेना! म्हणून अखेरपर्यंत बसलें ती बसलेंच; तें संपलं अन् ही मी आतां नुकती घराकडे वळलें; त्यामुळं जरा यायला बघ उशीर झाला; तुला बसायला सांगितल्याची मला आठवण होती; पण म्हटलं विमल इतक्यांत येईल कॉलेजांतनं, तेव्हां मला काय अगदीं घाई-घाईनं यायला नको; अन् शिवाय तें कीर्तन सोडून मला बाई येववेनाच अगदीं, उगाच खोटं कशाला सागूं!"

कुमार म्हणाले – "त्यात काय एवढं! तुमच्या घरीं एकटा बसायला मला भीड कसली! मी कोण परका का आहें, वहिनी! मी तुमच्या मुलासारखाच नाहीं का!"

मुलाचें नांव काढताच रमावहिनींच्या डोळ्यांतून पाणी आलें; पण पदरानें लगेंच तें पुसून टाकून वहिनी म्हणाल्या – "बाबा! या सगळ्या नेमानेमाच्या गोष्टी! माझं नाहीं तेवढं नशिब मुलाचं सुख बघायचं! स्वतःचीं नसलीं तरी वसंत, तूं, विमल, इन्दु हीं सारीं तुम्ही मला खरो-खरीच माझ्या मुलांबाळांसारखीं वाटतां रे! स्वतःची मुलं नाहींत! नाहींत तर नाहींत!! मुलं नाहींत म्हणून माझं घर काय आज उघडं आहे का! वसंत, तूं, विमल आणि तुझी इन्दु हीं सगळीं माझं घर माझ्या स्वतःच्या मुलांसारखींच शोभिवतांहांत, नाहीं का रे! तुमची लग्न-कार्यं झालेलीं पाहिलीं – कुमार तुझं झालंयच् म्हणा! पण वसंताचं नाहीं झालं अजून; केव्हां एकदां बायको आणतोय् घरांत असं झालंय् अगदीं मला! हो बरी आठवण झाली! सकाळीं आमच्या विमलकडे तिची मैत्रीण कुसुम का कोण ती आली होती; मुलगी काय सुरेख अन् सुस्व-भावी दिसली म्हणून सांगूं कुमार, तुला! मला तर पाहिल्याबरोबर वाटलं कीं आमच्या वसंताला बायको करून घ्यावी! चांगला लक्ष्मीनारायणा-सारखा जोडा शोभेल अगदीं! तुला नाहीं रे वाटत असं! पण तूं तिला कुठं पाहिली आहेस म्हणा!"—

हा प्रश्न ऐकून कुमारांच्या मनाची काय स्थिति झाली असेल ती त्यांची त्यांनाच माहीत! खरें पाहिलें तर वहिनींचें म्हणणें चुकीचें नव्हतें. कुमार अविवाहित असते तर तिनें कुसुमला वसंतपेक्षां कुमारांचीच पत्नी म्हणून

पसंत केली असती ! पण त्यांचें अगोदरच लग्न झालें होतें म्हणून त्यांचा नाइलाज होता ! त्यामुळें त्यांनीं कुसुमला वसंतरावांना बायको करून घ्यावयाचा विचार जेव्हां बोलून दाखविला तेव्हां त्यांना हृदयाला कोणीतरी चावा घेतल्यासारखें झालें ! त्यांचें कुसुमवर निर्व्याज प्रेम जडलें होतें ! तें कोणत्याही कारणानें कमी होणें शक्यच नव्हतें; आणि त्यामुळेंच कुसुमला दुसऱ्याची म्हटलेली त्यांच्या मनाला मुळींच सहन झालें नाहीं; पण तसें ते बोलून कोणाला दाखविणार ?

कुमार बोलत नाहींत असें पाहून वहिनी म्हणाल्या—

" काय, रे ! बोलत कां नाहींस कुमार ? मी बोलतें तें चूक आहे का रे ! सकाळीं कुसुमला पाहिल्यापासून मला तिचा इतका लळा लागून राहिला आहे, कीं जणूं काय माझ्या घरांतलीच कोणी तरी एक ! पोर खरोखरीच गुणी आहे रे ! बिचारीला चांगला नवरा मिळो ! वसंत आमचा कांहीं वाईट नाहीं ! तो तिला नवरा मिळेल तर कुसुमही हक्कानं माझीच झाली – रक्ताच्या नात्यानं नसली तरी प्रेमाच्या नात्यानं झाली कीं नाहीं, काय रे ? मी काय बोललें तें खोटं आहे का रे, कुमार ? "

कुमारांना माहीत होतें कीं, वसंताचें विमलवर प्रेम आहे; पण ती गोष्ट वहिनींना सांगणें म्हणजे दारूच्या भुयारांत विस्तवाची ठिणगी पाडण्यासारखें आहे ! पण ही गोष्ट आज नाहीं उद्यां केव्हां तरी त्यांना समजणार, नाहीं तर सांगावी लागणार, तर ती आतांच सांगून टाकलेली काय वाईट ? असा विचार करून ते तिला म्हणाले—

"वहिनी ! तुम्हांला मी एक गोष्ट सांगूं का ? रागावणार तर नाहीं ना ? "

" नाहीं रे बाबा ! मुळ्ळीं, मुळ्ळीसुद्धां नाहीं रागवायची बरं ? मी रे कशाला बाबा रागावणार ? अन् तुझ्यावर ? – माझ्या बाळावर ? मुळींच नाहीं बरं ! काय तुला एवढं सांगायचं आहे या तुझ्या वहिनीला ते सारं, सारं सांगून टाक अगदीं बेलाशक ! त्यांत काय रे भ्यायचंय् ? तुझ्या आईची तुला कधीं भीति वाटली होती का रे ? नाहीं ना ? मग माझी— मी तुला तुझ्या आईसारखीच ना बाळ ? – माझी भीति तुला कशी रे वाटली ? आं ? सांग, सांग बाळ तुला काय सांगाय सवरायचं आहे तें सारं सांग मला; अगदीं भिऊं नको बरं ! "

वहिनींच्या या प्रेमळ भाषणानें धीर येऊन कुमार म्हणाले—

"आपल्या वसंताला चांगली बायको आहे माझ्या पहाण्यांत वहिनी! आपल्या घरांतच आहे ती!"

रमावहिनींना याचा कांहींच अर्थ समजेना! त्यामुळें त्या जरा त्रासून म्हणाल्या – "असं काय रे करतोस कुमार! मला काय फसवायूविसवायला बघतोयस् कीं काय रे? तशी नाहीं रे बाबा मी फसायची बरं! सांग झट्कन् कोण मुलगी तूं वसंताला बायको शोधून आणिली आहेस ती!"

"वहिनी! आपली विमल, बरं!"

"आपली विमल, बरं"— हे शब्द ऐकून, अंगावर विस्तव पडल्यावर लहान मूल जसें भांबावल्यासारखें करतें, तशा प्रकारची मुद्रा करून वहिनी बोलल्या—

"कुमार! तूंच काय रे हें बोलतोयस्? तुझ्या तोंडांतनं हे शब्द बाहेर पडले म्हणून मी गप्प राहिलें, नाहींतर असले शब्द दुसऱ्या कोणाच्या तोंडून ऐकले असते तर त्याला मी उभा जाळून टाकला असता बरं! विमल ही विधवा आहे हें तुला माहीत नाहीं का रे? विधवांचीं कुणीं कधीं लग्नं केलीं आहेत का रे?"

"कां? कोणीच करीत नाहींत का? वहिनी, पूर्वीचा काल आतां नाहीं उरला! हल्लीं विधवा मुलींचीं लग्नं म्हणजे कुमारिकांच्या लग्नांसारखींच बरं! त्यांत कांहींएक फरक नाहीं; आणि मी विचारतों तुम्हांला वहिनी–विधवांनीं – विशेषतः पोरसवदा विधवांनीं – पुन्हां लग्नं कां करूं नयेत? त्यांनीं संसारसुख भोगूंच नये का? त्यांच्या हृदयाला मुलाबाळांची इच्छा नसतेच का? का नवरा मेला म्हणजे सगळ्या आशा इच्छांची राखरांगोळी होते, असं तर नाहीं ना वहिनी? तुम्ही वाटेल तर माझ्या चार थोबाडांत द्या, पण या बाबतींत मी माझीं मतें – तुम्हांला भिऊन, अगर कोणालाही भिऊन – मागें घेणार नाहीं, हें तुम्हांला मी स्पष्टच सांगतों. शिवाय वसंत व विमल एकमेकांवर प्रेम करतात! हें तुम्हांला माहीत नाहीं; पण मी तें आज तुम्हांला सांगून टाकतों; तेव्हां त्यांचा विवाह करून देण्यांत जें सुख त्यांना दिल्यासारखं होणार आहे, त्याच्या मानानें, विमलच्या प्रेमाची मुस्कटदाबी करून, तिला तशाच विधवास्थितींत

ठेवल्यानें, जें दुःख तिला होणार आहे, तें किती तरी अधिक आहे बरं वहिनी ! विधवा असली तरी विमल ही एक नाजूक मनाची मुलगीच आहे ना ! तिच्या अंतःकरणांत एखाद्याविषयीं प्रेम उत्पन्न झालें, तर ज्याच्याविषयीं तिला हें प्रेम वाटतं, त्याच्याशीं तिचा विवाह करून देऊन, त्या प्रेमाची पूर्तता केली तरच तुम्ही आपलं कर्तव्य केल्यासारखं होणार आहे ! वहिनी, मी काय म्हणतों त्याचा तुम्ही सावकाश विचार करा; प्रथम तुमच्या मनाला हें कसंसंच वाटेल; पण सहानुभूतीनें आणि दयाशील अंतःकरणानं याचा तुम्ही विचार केला, तर तुम्हांलाही मी म्हणतों त्यांत कांहीं तरी राम आहे असं वाटूं लागेल. ''

हें भाषण चाललें असतांना विमल कोठें दूर पळाली होती ! कुमारांनीं अशा अचानक रीतीनें आपल्या नांवाचा उल्लेख केल्याबद्दल प्रथम तिला राग आला ! पण थोड्या वेळानें तिला झालें तें चांगलेंच झालें असें वाटूं लागलें ! कारण वसंतरावांविषयीं तिला वाटत असलेल्या प्रेमाची पूर्तता त्यांच्याशीं आपला विवाह झाल्यावांचून होणार नाहीं, ही तिला खात्री होती. तिच्या मनांतून त्यांच्याशीं विवाह करावा असें फार फार वाटत असे ! पण बायकांची जात ! कोणाला सांगावयाचें ? आणि ऐकून कोण घेणार ? त्यांतून तिच्यासारख्या विधवेला सगळेच मार्ग बंद ! त्यामुळें कुमारांनीं हा विषय वहिनींसमोर काढलेला पाहून प्रथम तिला राग आला, तरी मागाहून बरेंच वाटलें !

रमावहिनींना कुमारांची विचारसरणी पसंत पडण्यासारखी नव्हती ! विधवांचीं लग्नें करणें म्हणजे एक भयंकर पाप करण्यासारखें आहे असें त्यांना वाटत होतें; आणि त्यांच्यासारख्या धर्मभिरु माणसांना तसें वाटणें साहजिक आहे ! पण कुमारांना त्यांनीं एकदम सडेतोड उत्तर दिलें नाहीं; याचें कारण कुमारांच्या अंगांत कोणाही माणसावर आपल्या मताची छाप बसविण्याचा तेजस्वीपणा होता हें होय; यामुळेंच 'मी त्याचा सावकाश विचार करीन ! एव्हां बरीक मला त्यात कांहीं एक सांगतां येणार नाहीं!' असें स्पष्टपणें कुमारांना त्यांनीं सांगितलें.

---

# कुंज १० वा.

कुसुमला आपल्या मनाला वेड लावणारा तरुण कोण हें कळून आल्यावर तिच्या मनाची स्थिति अत्यंत नाजूक झाली ! जाईजुईचीं फुलें दुरूनही आपल्या दिव्य सुगंधानें मनाला वेड लावतात; पण त्यांचें दिव्य असें प्रत्यक्ष दर्शन रसिकांच्या डोळ्यांना जो एक प्रकारचा नाजूक आनंद देईल तो काय वेगळाच ! लहान मुलांना खेळणीं घेऊन येणार या विचारानें आनंद होतोच ! पण तीं आणलेलीं दृष्टीस पडतांच त्यांच्या आनंदात जो एक मृदुभाव दिसून येतो तो अवर्णनीयच ! रात्रीच्या शांत वेळीं अत्यंत मधुर असे गोड गळ्यांतून बाहेर पडलेले संगीताचे सूर ऐकून मनाला आल्हाद होतोच ! पण ते सुस्वर नाद काढणारी– गाणारी–व्यक्ति दृष्टीस पडल्यावर मनाला जी एक प्रसन्नता येते ती काय निराळीच !

कुसुमच्या मनोविश्वांत कुमारांविषयींच्या या माहितीनें जाईजुईच्या कळ्या विकसूं लागल्या ! लहानें मुलांना खेळणीं आणलेलीं दृष्टीस पडल्यावर होणाऱ्या आनंदाचे नाजूक वारे वाहूं लागले ! ! आणि संगीताच्या सुस्वर लकेऱ्यांनीं तिच्या अंतरंगाच्या दशदिशा निनादून गेल्या ! ! !

कुमाराची माहिती होण्यापूर्वी त्यांच्यावर असलेलें तिचें प्रेम विरळ ढगांआडच्या चांदण्याप्रमाणें, किंवा स्फटिकाप्रमाणें स्वच्छ अशा जलाशयांत पडलेल्या चंद्राच्या प्रतिबिंबाप्रमाणें, अस्फुट आणि गूढ अशा प्रकारचें होतें ! पण त्यांची माहिती मिळून त्यांच्या दर्शनानें दुणावलेलें तिचें त्यांच्याविषयींचें प्रेम म्हणजे मूर्तिमंत ज्योत्स्नासुंदरीच्या नेत्रांतील दिव्य तेज, किंवा पौर्णिमेच्या चंद्राचें मुखावरील मधुर हास्य होय !

कुमारांची माहिती तिला मिळाली खरी; पण ते विवाहित आहेत कीं अविवाहित आहेत हें मात्र तिला अजूनही कळलें नव्हतें ! त्यामुळें तिच्या मनाची स्थिति अभ्राच्छादित आकाशाप्रमाणें, किंवा गढूळ झालेल्या पाण्यांतील स्फटिकमण्याप्रमाणें झाली होती ! तसें म्हटलें तर त्याच्या विवाहित स्थितीच्या वादळवाऱ्यानें तिच्या अंतरंगकासारांत विकास पावूं लागलेली प्रेमलता गळून पडणार नव्हती ! कदाचित् किंचित् लवली

असती ! सुंगधानें दशदिशा दरवळणारीं तिच्यावरचीं नाजूक फुलें चुरगळून जाणार नव्हतीं ! कदाचित् त्यांच्या पाकळ्या थोड्या दुमडल्या असत्या !

फुंकरानें कापसाची लड हालेल ! पण विसकळीत होणार नाहीं ! ! त्याप्रमाणें कुमारांच्या विवाहानें, पाण्यांत मातीचे बारीक कण टाकल्याप्रमाणें, तिच्या प्रेमजलावर अस्पष्ट असा कंप उत्पन्न झाला असता ! तुफानी खळबळ उत्पन्न होणें कधींच शक्य नव्हतें !

सौंदर्याची हिरकणी काव्यमय अंतःकरणाच्या कोंदणांत चमकून दिसते ! लतेच्या हृदयावर बागडणाऱ्या कलिकेचें हास्य जास्त चित्ताकर्षक दिसतें ! स्वार्थत्यागी देशसेवा खादीच्या पातळात उठून दिसते ! तद्वत् कुमाराच्या अविवाहित स्थितीनें तिच्या त्यांच्याविषयींच्या प्रेमाचें तेज अधिकाधिक फांकणार होतें ! पण ईश्वराची इच्छा तशी नव्हती ! ! काळोखांतच चांदण्याची शोभा आनंददायक दिसावी, त्याप्रमाणें कुमार विवाहित असल्यामुळेंच कुसुम–कुमारांचें परस्पर-प्रेम अधिक तेजस्वी, निःसीम आणि सात्त्विक स्वरूपाचें भासेल असें वाटून कदाचित् त्यानें तशी परिस्थिति उत्पन्न केली असेल ! या अखिल चराचर विश्वांत घडून येणाऱ्या प्रत्येक गोष्टीला हेतु हा असतोच ! तो मानवी मनाला अज्ञेय आहे, म्हणून त्याचें अस्तित्व नाकबूल करणें, म्हणजे उघड्या डोळ्याना दिसत नाहींत म्हणून एखाद्या अडाणी रानवटानें समुद्रतळाशीं रत्नें नसतात असें म्हणण्यासारखें वेडगळपणाचें आहे ! तेव्हां कुमार विवाहित असले तर ईश्वराचा त्यांत गूढ असा एखादा हेतु असेल, अशी कुसुमनें आपल्या मनाची समजूत करून घेतली ! या मनाच्या समजावणीमुळें, वाऱ्यानें पाचोळा उडावा, त्याप्रमाणे तिच्या मनांतील असती नसती हुरहूर पार नाहींशी झाली ! आणि तिचें हृदय हलुहलू, सूर्यप्रकाशानें दशदिशा प्रकाशित व्हाव्या, तद्वत् कुमाराविषयींच्या नाजूक विचारानें प्रसन्न झालें ! पाऊस पडून गेल्यावर नाजूक उन्हाच्या प्रसन्न शोभेनें दाही दिशा उजळल्यासारख्या दिसतात ! अगदीं त्याप्रमाणें तिच्या मनांतील अकारण हुरहूर दैवविषयींच्या तात्त्विक विचारानें नाहींशी झाल्यामुळें तिच्या मनोवृत्ति आनंदानें उजाळल्यासारख्या झाल्या ! या वेळचें तिच्या प्रसन्न मुखावरील तेज कोणालाही वेड लावणारें असें होतें ! त्या आनंदभरांत ती उठली, आणि रोशनच्या खोलींत गेली.

रोशन स्वस्थ झोंपली होती; परंतु कुसुमच्या वृत्ति इतक्या आनंदून गेल्या होत्या कीं, तिनें रोशनला त्या निजल्या स्थितींत मिठी मारली, आणि तिच्या गालावर आपला गाल स्थिर केला! या अपरिचित परंतु नाजूक अशा स्पर्शसुखानें—कीं सुखस्पर्शानें!— रोशन एकदम जागी झाली, आणि उठण्याचा प्रयत्न करूं लागली; तेव्हां कुसुम तिला म्हणाली—

"उठूं नको गडे रोशन; I am very happy to-day!" (मला आज अत्यंत आनंद झाला आहे!)

"कां! कां ग! काय झालंय् तुला एवढा आनंद व्हायला! स्वप्नांत कुमाराची भेट झाली कीं काय? होय ना! होय; मला अगदीं तेंच वाटतंय्! म्हणून तर आपला आनंद दुसऱ्याला सांगायला इथं आलीस एवढ्या घाईनं!"

"नाहीं ग रोशन! कांहीं तरी भलतंच नको गडे बोलूं! त्यांचं दर्शन व्हायला माझं कुठं एवढं भाग्य आहे! भाग्यवंताच्या भाळीं असलेलं सुख आमच्यासारख्याच्या स्वप्नांतसुद्धां दृष्टीस पडायचं नाहीं बरं, रोशन! पावसाळ्यांत आभाळाच्या भाळीं बिजलीरूपात चमकत असलेली भाग्याची रेषा पृथ्वीच्या दुर्दैवी कपाळांत ग कुठं दिसून येणार! तिच्या फुटक्या कपाळावर नांगरानें खरटलेली दुर्दैवाची रेघोटी दिसली तर दिसेल! भाग्यभोगाचा थाटमाट काय वेगळाच! तो आमच्यासारख्या कमनशिबी जीवांच्या नशिबीं नाहीं!"

"कुसुम तूं कमनशिबी का ग! मग जगांत नशिबवान् कुणाला म्हणायचं तर? सद्गुण, सौंदर्य, सुस्वभाव या त्रिविध गुणांनीं शोभणारं तुझं देहस्वरूप मला तर सृष्टि, स्थिति आणि लय या त्रिविध गुणांनीं नटलेल्या भगवंताच्या स्वरूपासारखं भासत आहे! भगवंताचं स्वरूप भक्ताला वेड लावतं, त्याप्रमाणं तुझं स्वरूप कोणत्या तरुणाला वेड लावणार नाहीं बरं!

कुसुम तूं खरोखरीच भाग्यशाली आहेस ग! काय पूर्वजन्मीं असे पुण्याईचे डोंगर करून ठेवले होतेस त्या परमेश्वराला माहीत! या मर्त्य जगाचं सौंदर्य अपूर्णतेंत आहे! पण या अपूर्ण जगांतली तूं मात्र सुंदर असून पूर्ण आहेस याचं मला राहून राहून आश्चर्य वाटतं!

मला तुझ्यासारखी फार विचार करण्याची संवय नाहीं; पण तुझ्या संग-

तीनं, सुगंध ज्याप्रमाणं वातावरण आपल्यासारखं सुगंधमय बनवितो, त्याप्रमाणं मी केव्हां, केव्हां विचार करूं लागलें कीं माझ्या डोळ्यांसमोर जिकडे तिकडे उदासीनता दीन आक्रोश करीत असलेली दृष्टीस पडते ! परंतु तुला समोर पाहिली कीं, मला जग हें सुंदर असून आनंदी आहे असं वाटूं लागतं ! या अपूर्ण जगाला सुंदर अन् पूर्ण आहे असं म्हणायला लावण्याचं तुझ्या – माझ्या जिवाभावाच्या मैत्रिणीच्या–अंगांत सामर्थ्य – दैवी सामर्थ्य आहे हें पाहून मला किती किती अभिमान वाटतो म्हणून सांगूं !

उद्यां तूं दुसऱ्यांची–कुमारांची–लाजलीस का ग ? मी खोटं का बोलतें ? – खरंच कुमारांची झालीस, मग आमची आठवण तरी तुला होईल का ग ? रोशन म्हणून कुणी एक आपली मैत्रीण होती याचें स्मरण तरी तुझ्या जीवाला राहील का ग कुसुम ? खरंच, तुला आमची आठवण होवो अगर न होवो ! पण तूं सुखात असावीस ही माझी इच्छा, तुला जनदृष्टीनं कुमारांची झालेली पाहिल्याशिवाय तृप्त होणार नाहीं ! कुमारांसाठींच तूं जन्माला आली आहेस ! अन् तुझ्यासाठीं – खरंच कुसुम ! – तुझ्यासाठीं – या माझ्या कुसुमसाठीं – ते !! ईश्वराची इच्छा अशीच आहे ! मी म्हणतें तें खोटं का खरं तें तुला लवकरच कळून येईल बरं !!! ”

“ रोशन ! स्तुति करायची म्हणजे किती ग करायची, त्याला कांहीं सुमार आहे कीं नाहीं ? स्तुति माणसाला प्रिय असते ! कस्तुरीच्या वासानं ज्याप्रमाणें मृग मोहून जातो, तद्वत् स्तुतीनें लहानथोर प्रत्येक जण मोहून जातो ! पण स्वतःच्या पोटात असलेली कस्तुरी ज्याप्रमाणें मृगाला कधीं सांपडत नाहीं, त्याप्रमाणें स्तुतीच्या पोटीं दडपलेलं सत्य स्तुति करून घेणाऱ्याला कधींच पाह्यला मिळत नाहीं !

तूं माझी स्तुति करावीस, अन् मी ती ऐकून घ्यावी असा तुझा माझा जिव्हाळ्याचा संबंध आहे ! पण त्या स्तुतींत सत्याचा लवलेशही नाहीं, हें मला कबूल करणं भाग आहे; त्याप्रमाणें तुला तसं स्पष्ट सांगणं हेंही माझं कर्तव्य आहे ! स्तुतीची किंमत कानांनीं ऐकण्यापुरती असते ! तिच्यांत सत्यांश शोधण्याचा प्रयत्न करणं, म्हणजे फोनोग्राफांतील सुस्वर गायन ऐकून, गाणाऱ्याचं दर्शन घेण्यासाठीं फोनोग्राफ फोडून पहाण्यासारखं हास्यास्पद आहे ! तें असो; रोशन ! तुला एक मला विचारायचं आहे ! विचारूं का ?

" विचारूं का म्हणून कां बरं विचारतेस ? काय तुला विचारायचं आहे तें बेलाशक विचार कीं. "

" त्यांचं माझ्यावर प्रेम असेल का ग ? "

" त्यांचं म्हणजे कुमारांचं ना ! "

" आणखी कुणाचं ग ! त्यांचं माझ्यावर प्रेम असणं जर शक्य असेल तर अखिल चराचर सृष्टीला माझ्यावर प्रेम करायला लावण्याचं सामर्थ्य माझ्या अंगांत आहे असं मी बेलाशक म्हणेन ! त्यांच्या प्रेमाची मी भुकेली आहे ! त्यांची मला या जन्मांत भेट होईल का ग ? "

" भेट व्हायला ग काय ! आपण विमलला सांगूं अन् त्यांची भेट करून घेऊं ! "

"नुसती तशी भेट मला नको आहे ! ते मला आपली म्हणतील का ? "

"तुला याचा संशय वाटतो का ! "

" होय ग रोशन ! या उभ्या आयुष्यांत कधीं मला कोणत्याही गोष्टी-बद्दल संशय वाटला नाहीं ! पण या एकाच बाबतींत माझं अंतःकरण संशयानं भयभीत झालंय् ! "

" कुसुम ! असा धीर सोडूं नको ! कुमारांना तुझ्याविषयीं खात्रीनं प्रेम वाटत आहे हें मला त्यांच्या त्या दिवशींच्या वागणुकीवरनंच कळून आलं ! "

" तूं कांहीं तरी बोलतेस झालं, रोशन ! मला नाहीं बाई यांत तथ्यांश दिसत ! "

" मग तूं त्यांना विचारत्येस का ? "

" मी ? अन् त्यांना विचारूं ? "

" हो तूंच ! अन् त्यांना विचार ! "

" कसं विचारूं ? "

" अस्सं तोंडानं विचार ! " — रोशन तिला चिडवीत म्हणाली.

" थट्टा नको गडे ! "

" बरं नाहीं करीत थट्टा ! "

" सांग ना ग कसं विचारूं तें ! "

" त्यांना शकुंतलेसारखी प्रेमपत्रिका पाठव; अन् त्यांतनं आपलं हृद्गत त्यांना कळव म्हणजे झालं कीं नाहीं ? "

" अन् त्यांना तें आवडलं नाहीं तर ? "

" तर–तर स्वस्थ बैस ! "

" असं काय ग रोशन करतेस ? "

" मी ग काय करत्येंय् ? "

" तूं कांहींच का करत नाहींस ? हा तुझा तोंड बांधून बुक्क्यांचा मार बरा आहे ! "

(" मी तुला तोंड बांधून बुक्क्यांचा मार दिला तर ते बरे उगी राहतील!")

" रोशन ! तुला थट्टा बंद करायची आहे का आतां ? "

" करायची आहे ! "

" बंद करायची आहे का करायची आहे ? "

" अहो बाईसाहेब ! करायची आहे, बंद करायची आहे बंद ! "

" तर मग मला यांत तूं मदत करशील का ? "

" कसली मदत करूं मी तुला ? "

" मी पत्र लिहून देतें; तें नेऊन देशील का ? "

" अग पण मी देण्यापेक्षां तूं दिलेंस तर ? "

" मला नाहीं बाई तितका धीर ! "

" मग मला तरी कसा ग धीर व्हावा ? प्रेमासाठीं म्हणून तूं स्वतः नेऊन दिलीस तर तें खपून तरी जाईल; पण प्रेमाशिवाय केवळ तुझ्यासाठीं – तुझ्या प्रेमासाठीं – मी त्यांना दुसऱ्याची प्रेमपत्रिका नेऊन देणं बरं दिसेल का ? तूंच सांग कुसुम ! "

" मग मी काय करूं तर ? "

" त्याना कुठं तरी एकटे गांठ ! "

" ते आधीं कधीं मला दिसतच नाहींत ! त्यांतनं एकटे दिसतील कीं नाहीं हा प्रश्न आहे ! शिवाय एकटे गाठून त्यांच्याशीं बोलणं जर मला शक्य असतं, तर पत्र मी स्वतः नाहीं का नेऊन दिलं असतं ? मग तुला नेऊन द्यायला कशाला ग सांगितलं असतं ? "

" तुझ्या हातनं कांहीं व्हायचं नाहीं ! मग या प्रेमाच्या भानगडींत तरी

कशाला पडलीस ! प्रेमाचा मार्ग अत्यंत बिकट आहे ! धीटाईचा वाटाड्या बरोबर असल्याशिवाय असल्या मार्गानं आपण जाऊंच नये ! ”

“ मग काय म्हणतेस मी धीट होऊं ? ”

हो म्हणून बरी होशील धीट तूं ! ‘ तेथें पाहिजे जातीचें, येर गबाळाचें काम नाहीं !’ – असं तूंच म्हणतेस ना नेहमीं ? ”

“ बरं बाई ! आमचं राहिलं ! तूं तरी मला एखादा उपाय शोधून सांग. ”

“ मी कुणावर प्रेम केलं नाहीं तर तुला उपाय काय सांगणार ? — तूंच स्वतः शोधून काढ; जगांत इतके शोध लागले आहेत, पण प्रेमपूर्तीचा शोध अजून कसा कुणीं लावला नाहीं ? ”

“ तो तुम्ही लावा ! ”

“ स्वतःसाठीं नसला तरी तुमच्यासारख्या प्रेमी जीवाकरतां होय ना ग ?”

“ रोशन ! तूं अशी घमेंड मारूं नकोस ! एक दिवस तुला सुद्धां अशी दुसऱ्याची पायधरणी करावी लागेल ! मग समजेल बरं ! ”

“ प्रेमासाठीं दुसऱ्याचे पाय धरण्यापेक्षां मी माझ्या प्रेममूर्तीचेच पाय धरीन बरं का, बाईसाहेब ! ”

कुसुमला याच्यावर काय बोलावें तें सुचेना, त्यामुळें तिचा चेहरा जरा उतरल्यासारखा दिसूं लागला ! रोशनला तिची ती दुःखी मुद्रा पाहून वाईट वाटल्यावांचून राहिलें नाहीं ! त्यामुळें ती कुसुमला म्हणाली–

“ कुसुम ! तुझी थट्टा केली म्हणून रागावलीस का ग ? मला कळतंय् बरं का कीं, अशा स्थितींत थट्टा करणं, म्हणजे फोडावर चापटी मारण्यासारखं आहे हें ! माझा तुला राग येणं स्वाभाविक आहे; पण या बाबतींत मी तुला काय सल्ला देऊं बरं कुसुम ? थोडे दिवस वाट पहा; कदाचित् तुला ते एकटे भेटण्याचा संभव आहे; त्यावेळीं जरा धीट होऊन तूंच त्यांना आपला मनोदय सांगून टाक. प्रेमाला परकी तिऱ्हाइती पसंत नसते बरं ! शरीराला दोनच हात, दोनच पाय अन् डोळेही दोनच ! त्याप्रमाणं प्रेमाच्या संसारांत दोन जीवांशिवाय तिसऱ्याचा समावेश होऊं शकत नाहीं !– हें मी तुला सांगायला नकोच. प्रेम करतेवेळीं मन ज्याप्रमाणं स्वतःशिवाय दुसऱ्या कुणाच्या मदतीची अपेक्षा करीत नाहीं, त्याप्रमाणं प्रेमपूर्ततेच्या वेळीं सुद्धां त्याला दुसऱ्याच्या अस्तित्वाची जरूरी नाहीं !

प्रेमाचं विश्व म्हणजे दोन जीवांची दुनिया! दोन जीवांनीं रडायचं, दोघांनीं हंसायचं! रुसायूफुगायचं तेंही दोघांनींच! अशा या केवळ दोनच जीवांनीं खेळायच्या खेळांत तिसऱ्यानं कां पडावं? आणि तसं तिसऱ्यानं पडलेलं कुणाला खपेल बरं?"

"बरं बाई! तूं नको आमच्या खेळांत पडूं बरं का! पडलीस तर निष्कारण तुझे पाय मोडतील! नाहीं का?"

"माझे पाय मोडून तुमचा प्रेमाचा पांगुळगाडा सुरळीत चालणार असेल, तर माझे पाय मोडून घ्यायला मी बघ अगदीं एका पायावर तयार आहें!"

"पाय मोडून घेऊन आमच्या पवित्र प्रेमाला अपशकून नको करूं बाई तूं!"

"रागावलीस वाटतं?"

"पुष्पाप्रमाणं नाजूक अशा प्रेमभावनेच्या भोंवतीं रागाचं कांटेरीं कुंपण असायचंच् बरं का! नाहींतर प्रेमपुष्पाची किंमत उघड्यावर पडलेल्या फुलां-सारखी कमी व्हायची!"

"मग आणखीन् रागाव कीं, म्हणजे जगाच्या बाजारांत तुझ्या प्रेमाला अधिक किंमत चढेल!"

"पुरे गडे चावटपणा आतां! आपण आपल्या बॅड्मिंटन खेळायला जाऊं चल; बरेच दिवसांत बॅड्मिंटन खेळलों नाहीं, त्यामुळं माझे हात बघ कसे अगदीं फुरफुरताहेत खेळायला!"

"बॅड्मिंटन खेळण्यासाठीं फुरफुरताहेत कीं– कीं–बोलूं का ग?– कीं कुमारांच्या प्रेमामुळं फुरफुरताहेत, हें नक्की ठाऊक आहे ना? नाहीं तर बॅड्-मिंटन खेळून हाताची फुरफुर कमी होण्याऐवजीं, अधिकच वाढा-यची बरं!")

"रोशन! अलीकडे तूं फारच चावटपणा करायला लागली आहेस बरं का! एखाद्या तरुणाच्या प्रेमपाशांत तुला अडकविल्याशिवाय तुझा हा चावटपणा कमी नाहीं व्हायचा बरं का!"

"मग कुसुम, एवढा कर कीं माझ्यावर उपकार!" रोशन हंसत हंसत म्हणाली.

" अग हो, बरी आठवण झाली– आमच्या नगरला एक बॅरिस्टर आहेत; अजून अविवाहित आहेत बरं का ! ते तुझ्यावर खात्रीनें प्रेम करतील ! त्यांची मी देईन ओळख करून तुझ्याशीं बरं ! "

या शब्दांनीं थट्टेखोर रोशन खरोखरच लाजली ! प्रेमाचं नांव काढतांच तरुण कुमारिकांचें तोंड एकदम बंद कां होतें, हें खरोखरच एक मोठें कोडें आहे ! प्रेम, चुंबनानें तोंड बंद करणार, या कल्पनेनें तर नाहीं ना त्यांचें तोंड एकदम असें बंद होत असेल ?



# कुंज ११ वा

"काय रे, वसंत ! काय बुवा ? आज अगदीं या वेळींसा इथं आलास् ? काय गडबड आहे कीं काय ? मी हा आतांच चहा घेऊन कामकाज पहात बसलों आहें." – कुमारांना वसंत सकाळींच आपल्याकडे आलेला पाहून जरा आश्चर्य वाटलें. तसें पाहिलें तर तो केव्हांही, सकाळीं तर सकाळीं, भर दोन प्रहरी वाटेल तेव्हा त्याच्याकडे येत जात असे; पण त्याचें तोंड आज जरा काळवंडल्यासारखें त्यांना दिसल्यामुळें, त्यांना वाटलें, काळवंडलेलें आकाश पावसाळी गडबड सूचित करतें, त्याप्रमाणें त्याच्या घरीं खास कांहीं तरी गडबड असावी ! आणि यामुळेंच, वसंताचें उतरलेलें तोंड पाहिल्याबरोबर, त्याच्या तोंडातून वरील उद्गार बाहेर पडले.

"चालायचंच् कुमार ! जग आहे तिथें महारवाडा असायचाच !– नवराबायकोचें जमेनासं झालं कीं, भाडयाला भांडं लागून आदळआपट व्हायचीच ! आभाळांत जोंपर्यंत ढग एकजुटीनें असतात, तोंपर्यंत सगळं कसं अगदी सुरळीत असतं ! पण आपसांत त्यांचें जमेनासं होऊन ते जर एकमेकांची डोकेंफोड करूं लागले, तर कडकडाट हा व्हावयाचाच ! त्याला कोणाचा काय इलाज आहे ? जोंपर्यंत एकोपा, मिलभाव परस्परांमध्यें असतो, तोंपर्यंत काहीं तरी टिकाऊ, लोकहिताचं काम माणसाला करता येणं शक्य असतें; तसं कांही नसेल, तर एकमेकाची डोकीं उडवायलाही कोणी मागें पुढें पहाणार नाही ! सुतासारखा सरळपणा अंगांत असेल तर त्या सुतानें स्वर्ग सुद्धां गांठतां येईल; पण त्यांत वांकडेपणा येऊन त्याचा गळफांस झाला, तर तें खरोखरच स्वर्गाची वाट दाखवील ! मी म्हणतों तें खोटं का कुमार ?

मन ही एक अजब चीज आहे ! तें एकाच्या पायांवर डोकें ठेवायला तयार होईल, तर एखाद्याच्या डोक्यावर पाय टेवील ! एखाद्या दुःखिताला कळवळून हात देईल, तर एखाद्याला सारखा हात दाखवील ! एखाद्याला त्याच्या दुःस्थितींत तोंड वर काढावयाला मदत करील, तर

एखादे वेळीं त्याला तोंड खालीं घालायला लावील ! एखाद्या वेळीं जीवा-भावाच्या जीवासाठीं जीवास जीव देईल, तर स्वतःच्या जीवासाठीं त्याचा जीव घेण्यासही मागें पुढें पहाणार नाहीं ! एखाद्याला नाक कापून अप-शकून करील, तर एखादे वेळेस दुसऱ्याचं नाक खालीं झालेलं पाहण्याच्या धडपडींत, आपलं स्वतःचंच् नाक ठेंचून घेईल !

' संसाराची बाग विविधतेच्या फुलांनीं फुलावी, त्याप्रमाणें मन सुद्धां विविधतेनें नटलेलें आहे, ' असे जें तूं नेहमीं म्हणतोस, त्याचा अनुभव मला आज आला बाबा ! दिवसाच्या पटांगणावर ऊन– सावलीचा लपं-डाव जसा नेहमी सुरू असतो, तद्वत् मनाच्या मैदानावर सुखदुःखांचा लपंडाव नेहमी चाललेला असतो ! उन्हांत आकृतीची छाया स्पष्ट दिसते, सावलींत मुळीच दिसत नाही ! त्याप्रमाणें दुःखांत निराश उद्विग्नतेची छाया इतकी स्पष्ट दिसते की, एखादा कमी धीराचा माणूस, भित्रें मन भूताला पाहून घाबरून जावें, त्याप्रमाणें एकदम खचून जातो ! सुखाच्या सावलींत मात्र आशापूर्तीच्या आनंदाचें प्रतिबिंब स्पष्ट दिसणें शक्य नसतें ! ”

वसंताचें म्हणणे मनाला पटलें, म्हणून की काय कुमारांनाही बोलावेंसें वाटूं लागलें; ते म्हणाले–

“ आरशात आकृतीचें प्रतिबिंब स्पष्ट दिसतें; पण रोगण फासलेल्या कांचेंतून, आकृतीचें प्रतिबिंब तर राहोच, पण नुसत्या कांचेंतून बाहेरची वस्तु दिसते, ती सुद्धां दिसणें शक्य नाहीं ! दुःखाचा आरसा समोर धरल्याशिवाय मनाला स्वतःचें प्रतिबिंब दिसणें अशक्य आहे ! मन सुखी असेल तर, रोगण फांसलेल्या कांचेसारखं त्यांतून कांहीच दिसणें शक्य नाहीं; मनुष्य स्वतःच्याच नादात रमून जाईल ! बरें, सुख नाहीं दुःख नाहीं, अशी स्थिति असली तर, नुसत्या कांचेंतून दुसऱ्या वस्तु आंत दिसाव्या, त्याप्रमाणें मन दुसऱ्याच्या नसत्या उठाठेवी करण्यांत दंग होईल !

जीवितहेतु एक ठराविक नाही ! कोणाला सुख, तर कोणाला दुःख, तर कोणाला सुख नाही दुःख नाही, अशा या निरनिराळ्या तीन अवस्था प्रत्येक जीवमात्राला आपल्या आयुष्यांत भोगणें भाग आहे.

जीवित हा एक काळ धरला, तर त्यांत पावसाळा, हिंवाळा आणि

उन्हाळा असे तीन ऋतु आहेत ! एकच एक ऋतु सबंध वर्षाच्या काळांत चालू राहील, तर माणूस कंटाळून जाईल. जीवितामध्येंही प्रत्येकाला सुख, दुःख, आणि सुख नाहीं दुःख नाहीं, अशा या तीन स्थिती नेहमीं अनुभवाव्या लागतातच लागतात ! ठराविकाच्या अभावाची आवड हें खऱ्या जीविताचें रहस्य आहे !

रात्रीच्या वेळीं काळोख भेडसावीत असला, तरी चांदण्या आपल्या हास्यानें पृथ्वीला धीर देतातच ना ? त्याप्रमाणें दुःखांतही माणसानें, काल्पनिक कां होईना, कांहीं तरी सुख शोधून काढण्याचा प्रयत्न करावा, आणि तसा प्रयत्न केला, तर त्याला दुःखांतही सुख सापडण्याचा संभव आहे ! तसेंच, दिवसा भरपूर उजेड असला, तरी भर दोनप्रहरचा कडकपणा मनाला अगदीं नकोसा होतो ! कोणत्याही एका विशिष्ट स्थितींत जीवाला सुखसमाधान मिळूं नये, ही त्या सृष्टिचालकाची इच्छा दिसते ! आणि त्यामुळेंच जगाकडे, परक्या माणसाकडे लहान मूल पाहातें त्याप्रमाणें, एक प्रकारच्या परकेपणानें पाहण्याची मनोवृत्ति आयुष्याच्या शेवटीं शेवटीं मनात उत्पन्न व्हावी, हा सृष्टीचा नियम अबाधित चालू राहिला आहे.

धर्मशाळेंत आपण उतरलों, तर त्या जागेचा आपल्या मनाला आपलेपणा कधींच उत्पन्न होत नाहीं; तर असेल त्या स्थितींत ठराविक वेळ तेथें घालवावयाचा; त्याप्रमाणें शहाणा माणूस जगाकडे धर्मशाळेच्या दृष्टीनें पाहात असतो ! आहे त्या परिस्थितींत आयुष्याचा ठरला वेळ तेथें घालवावयाचा, आणि पुढें आपलें मकाण गांठावयाचें ! परंतु जगांत सगळेच शहाणे नसल्यामुळें, धर्मशाळेची डागडुजी करण्यांत आपण वाटसरू उगाच वेळ काढीत आहोंत !

तूं विषय काढलास म्हणून मी इतका वाहवत चाललों; पण हें सारं तत्त्वज्ञान बाजूला सारून, मी तुला विचारतों, वसंत ! आज असले विचार सुचायला असं काय घडलें रे तुझ्या घरीं ? बोलण्याच्या नादांत मी हें तुला विचारण्याचें विसरूनच गेलों कीं. "

" तूं आपलं काम संपव आधीं; तें पुरं झाल्यावर आपण बोलूं सावकाश ! "

" पण तुला घरीं जायला उशीर नाहीं का व्हायचा ? "

“ मी आज इथंच इन्दुताईच्या घरचा, त्यांच्या हातचा ताकभात खाणार आहें; मला आज घरीं जायचं नाहीं; तसं मी काकूला सांगूनच आलों आहें; पण आज तुला कोर्टांत काम असेल, नाहीं का रे ! ”

“ कोर्टांत काय विशेष काम नाहीं आज; एक लहानशी पुराव्याची केस आहे, तिच्यासाठीं गेलं पाहिजे कोर्टांत; तो जाईन मग दोन तीन वाजण्याच्या सुमारास; तूं आंघोळ वगैरे करून घे; स्वस्थ पहिल्यानें जेवून घेऊं, आणि मग तुला काय सांगायचं वगैरे आहे ते सांग सावकाश अगदीं ! ”

दुपारीं जेवण झाल्यावर कुमार आणि इन्दु, वसंत सांगत असलेली हकीकत ऐकण्यासाठीं एके ठिकाणीं जमलीं.

ज्या गोष्टीमुळें वसंताचा मनःक्षोभ झाला होता, त्या गोष्टीला सुरवात करण्यापूर्वी, त्याला कारणीभूत होणारी परिस्थिति प्रथम सांगणें बरें असें वाटून त्यानें त्याचीच अगोदर सुरवात केली:—

“तुला ठाऊकच आहे कुमार कीं मी इथल्या या शाळेंत तुझ्या इच्छेविरुद्ध मास्तर म्हणून राहिलों; तुझ्या मनातून मी वकील होऊन पैसे जमवावे, नांवलौकिक मिळवावा असें फार होतें, हे मला ठाऊक आहे. मला सुद्धा तुझें म्हणणें गैर वाटलें नाहीं; परंतु माझी वृत्तीच अशी बनत चालली होती कीं, मला आपलें खरोखर वाटे, कीं जो धंदा अगर पेशा आपण पसंत करतों किंवा स्वीकारतों, त्यांतच सचोटीनें वागून, निरर्थक वेळ न दवडता, आपण नेटानें मेहनत केली, परिश्रम घेतले, तर वाटेल त्या धंद्यात माणसाला नांव मिळविणें अशक्य नाहीं. ही विचारसरणी बरोबर आहे, असें मला अजूनपर्यंत वाटत होतें, पण तो माझा भ्रम आता दूर झाला, कुमार! माणसानें प्रयत्नाची कितीही शिकस्त केली, किंवा हातीं घेतलेल्या कार्यांत सचोटीची वर्तणूक कितीही ठेवली, तरी त्याला त्यांत यश मिळेलच ही नाहीं बुवा खात्री देतां येणार. ज्यांच्या बरोबरीनें आणि साहचर्यानें हें काम करावयाचें, त्यांच्या वागणुकीवर आणि त्यांच्या मदतीवरच हा यशाचा वाटा हातीं येणं शक्य आहे! आपण मोठे गवई असलों, तरी बरोबर साथ करणारा जर कच्चा असेल तर आपल्या गाण्याचा परिणाम श्रोतृवर्गावर चांगला होणार नाहीं; त्या-

प्रमाणेंच प्रत्येक धंद्याचें आहे; उत्तम शिक्षक म्हणून नांवलौकिक संपादन करावयाला शाळेंत असलेल्या इतर शिक्षकांचें साहचर्य, एकोपा, शाळेला ऊर्जितावस्था प्राप्त करून देण्याची इच्छा वगैरे सर्व गुण आवश्यक आहेत. मला आज दोन अडीच वर्षांचा अनुभव आहे—पगाराकडे तेवढं लक्ष! मुलांकडे नाहीं; त्याच्या वागणुकीकडे, अभ्यासाकडे, स्वभावाकडे, कशा-कडे म्हटल्या कशाकडे त्यांचें लक्ष नाहीं! पगार तेवढा उपटायचा; शाळेंत जें तास, दोन तास शिकवायचं त्यांत गप्पा मारायच्या, नाहीं तर तेवढा तास पुरा होईपर्यंत, नागराला जुंपलेल्या बैलाप्रमाणें अंगावरचं काम एकदां कसें तरी उरकून टाकायचें! अशानें का शाळेची सुधारणा होणार?

आमच्या शाळेंत मुली बऱ्याच आहेत; तर या मास्तरांचं मुलांकडे लक्ष असायचं, तें मुलींच्या तोंडाकडे लक्ष! मग मुलांचं तरी अभ्यासा-कडे कशाला बरं लक्ष जाणार? शाळेंत मुलींच्या सहवासांत वेळ जातो म्हणून शाळेंत यावयाचें, यापलीकडे शाळेंत दुसरा कांहीं उद्योग असतो हें जिथें मुलाना किंवा मास्तरानाही माहीत नसतं, तिथें शिक्षणांत सुधा-रणा कशी होणार, किंवा शाळेंत शिक्षण देणाऱ्या मास्तराचा, किंवा शिक्षण घेणाऱ्या मुलांचा नावलौकिक तरी कसा होणार?

आपल्या उद्दीष्टाप्रमाणें शाळा चालावी, अशी इच्छा बाळगणाऱ्यानें स्वतःच्या हिंमतीवर शाळा काढावी आणि ती चालवावी; आणि जे आप-ल्या मतांप्रमाणें, आपल्या सांगण्याप्रमाणें वागतील, आपल्या ध्येयाला अनु-सरून चालतील, अशाच मनोवृत्तीच्या माणसांना त्या शाळेवर शिक्षक म्हणून नेमल्याशिवाय मास्तराचा, मुलाचा किंवा शाळेचा नांवलौकिक होणं, किंवा शिक्षणाच्या दर्जा वाढणं, मुळींच शक्य नाहीं, याबद्दल आता माझी पूर्ण खात्री झाली कुमार!"

"झाली ना खात्री? मी तुला सागत होतों, पण तुला तें पटलं नाहीं त्यावेळी; आतां तरी शहाणा झालास ना? बाबा रे! जग हें आपण समजतों तसं नाहीं आहे! तसं तें असतं, तर घरोघर सोन्याचे दिवे पेटत असलेले आढळून येते!"

"होय कुमार! माझी आतां खात्री झाली; शाळेंत मुलं परीक्षा पास होतात; हुशार असतात ते भराभर पुढें जाऊन बक्षिसेंही मिळवतात; पण

त्यांच्या शीलाकडे, स्वभावाकडे कुणाचं तरी लक्ष आहे का?

आमच्या शाळेंत अस्पृश्य वर्गातला एक हुशार मुलगा आहे; नेहमीं पहिला असतो; पण तो इतका व्यसनी आणि हलकट आहे, कीं बोलतां सोय नाहीं! याच मुलानें त्या दिवशीं आपल्या वर्गातल्या एका मुलीला एक प्रणयपत्रिका लिहून पाठविली! प्रेमपत्रिका पाठविण्यांत पाप आहे, असं नाहीं मी म्हणत कुमार! एखाद्याला एखाद्याविषयीं प्रेम वाटणं साहजिक आहे! पण ज्या माणसाविषयीं प्रेम वाटतं त्याच्या मनाच्या इच्छा, आवडी बघायला नकोत का? दोघांचं प्रेम असेल, तर तें प्रेम वृद्धिंगत होईल अशा प्रकारचं वर्तन ठेवून, एकमेकांना एकमेकांविषयीं जास्त ओढ, जास्त आपुलकी, जास्त जिव्हाळा कसा उत्पन्न होईल, इकडे लक्ष द्यायचं टाकून नुसतं एकमेकांच्या तोंडाकडे बघण्यांत काय अर्थ आहे!

ज्या मुलीविषयीं मी बोलत होतों, ती एका श्रीमंत वेश्येची सच्छील कन्या आहे! ज्यानं हा पत्र पाठविण्याचा आचरटपणा केलान्, तो सगळ्या जगानं ओंवाळलेला प्राणी आहे! अशा दुर्वर्तनी पोराकडे—हुषार असला म्हणून काय झालं?—असल्या सच्छील पोरीचं लक्ष जाणं शक्य तरी आहे का? झकपक कपडे केले, उलटे केस फिरवून तिरपा भांग पाडला आणि टॉय् कॉलर बांधली म्हणजे जर मुलींचें प्रेम मिळवितां आलं असतं; तर शेंकडों बाजारबुंडग्याच्या गळ्यात सुशील कुमारिका माळ घालण्यासाठीं धडपडल्या असत्या!

अंतःकरण आकर्षण व्हायला कपड्यालत्त्याची जरुरी नसते! तोंडावरूनच माणसाची पारख होते! हृदयजुळणी होईल कीं नाहीं, हें एकवेळ तोंडाकडे पाहूनच समजतें! प्रेम उत्पन्न व्हावयाला प्रथमदर्शनाचीच आवश्यकता आहे; सहवास प्रेम वाढवत असेल, पण प्रेमोद्भव व्हायला मात्र क्षणापेक्षां जास्त अवधीची जरुरी नाहीं! पण तें प्रेम करणं बरोबर आहे कीं नाहीं याचा विचार, प्रत्येकानं आपली परिस्थिति पाहून करायचा असतो. पोषाख नीटनेटका करणं वावगं नाहीं; पण निव्वळ कपड्याच्या जोरावर प्रेम मिळवूं पहाणं म्हणजे फडक्याचं बाहुलं करून त्याच्याकडून जिवंत माणसाची 'जातिवंत करणी' अपेक्षण्यासारखं वेडेपणाचं आहे! नीटनेटका पोषाख आणि डामडौली छानछोकीपणा यांत खरा आंबा आणि लाकडाचा

बनविलेला रंगीत आंबा यांत जो फरक आहे, तो फरक आहे! खऱ्या आंब्याकडे आतला अमृतासारखा मधुर रस चाखायला मिळेल या आशेनं भुकेलं मन ओढलं जाईल! लाकडाच्या रंगीत आंब्याला पाहून कदाचित् डोळ्यांचं पारणं फिटेल; पण अंतःकरणाचं समाधान होणार नाहीं! प्रेमाला डोळ्यांचंच तेवढं सुख नको असतं, तर मनाचं सुख पाहिजे असतं! ज्यामुळें डोळ्यांपेक्षां अंतःकरण अधिक ओढलं जातं, तेंच प्रेम नव्हे का कुमार!

त्या मुलीचींही अशींच मतं आहेत. पत्र पाहून प्रथम ती गप्प बसली; त्याचं उत्तर तिनं पाठविलं नाहीं; याचा अर्थ त्या मूर्खानें भलताच केला; आणि पुन्हां एकदां त्यानें तिला तसेंच दुसरें पत्र पाठविलें; त्या पत्राला मात्र तिनें उत्तर पाठविलें कीं, पुन्हां असल्या प्रकारचें पत्र पाठवाल तर मला मुळींच खपावयाचें नाहीं! पण यामुळें ओशाळल्यासारखा होण्याऐवजीं, तो आचरट ज्याला त्याला सांगत सुटला कीं, अमुक अमुक मुलीनें मला प्रेमपत्रिका पाठविली! आहे कीं नाहीं कुमार! शेवटीं तिसऱ्यांदा त्या हलकटानें तिला अच्रकट् विच्रकट् विचारांनीं भरलेलें, असें एक लांबलचक पत्र पाठवून, तिच्याशीं फाजील लगट करण्याचा प्रयत्न केला; हें पत्र वाचूनच तिला शिसारी आली; आणि ती तें पत्र घेऊन माझ्याकडे आली; वर सांगितलेली हकीकत त्यावेळींच तिनं मला सांगितली; पत्र वाचून मला अत्यंत राग आला! त्या रागाच्या भरांत मीं त्याला बोलावून आणला; आणि त्याला तें पत्र दाखवून, असा झाडून काढला कीं, स्वारीला तोंड वर करून बघण्याची छाती होईना! मीं त्याला आणखी बजावून सांगितलें कीं—"याद राख, पुन्हां असले धंदे करशील, तर तुला शाळेंतून नांव काढून हाकलून लावण्यांत येईल!" एवढें सांगून मी त्याला बाहेर हांकून लावला.

ह्या मुलाचा बाप आमच्या शाळेच्या मॅनेजिंग कमेटीचा चेअरमन् आहे; या मुलानें रागाच्या भरांत आणि माझी फजिती व्हावी म्हणून, एकाचें दोन करून आपल्या बापाचे आईकडून कान फुंकलेसे वाटतात; कारण एकदोन दिवसांत सदरहु चेअरमन्साहेबांनीं मला आपल्या घरीं बोलाविलें, व ते मला आपल्या मुलाला बोलल्याबद्दल इतकें टाकून बोलले कीं, मला

तें सहन झालें नाहीं ! मीं त्याना रागाच्या भरांत उत्तरास प्रत्युत्तर देऊन असें काय भंडावून सोडलें कीं, त्यानीं मला माझ्यावर भलता आरोप ठेवून त्या पोरीला आणि मला शाळेंतून काढण्याचा हुकूम सोडला ! शाळा सोडायला माझी केव्हांही तयारी होती ! असल्या गटारांत लोळण्यापेक्षां रस्त्यावर उघडं नागडं पडलेलं काय वाईट ? परंतु शाळा सोडायला लावण्याचें त्यांनीं जें कारण दाखविलें, तें अत्यंत नीचपणाचें आहे ! 'त्या मुलीचा आणि माझा वाईट संबंध होता, आणि या अशा तऱ्हेच्या शिक्षकांच्या गैरशिस्त आणि अनैतिक वर्तणुकीमुळें मुलांच्या नीतिमत्तेवर फार वाईट परिणाम होण्याचा बराच संभव आहे, सबब तुम्हाला आणि त्या पोरीला शाळेंतून काढून लावण्यात येत आहे'—अशा तऱ्हेच्या ढोंगाखालीं त्यांनीं मला शाळेंतून हाकून लावला !

कुमार, इन्दुवहिनी ! तुम्हीच सांगा हा न्याय कीं न्यायाची चेष्टा ? या चोराच्या उलट्या बोंबा नव्हेत काय ? मला आतां बाहेर तोंड दाखवायला तरी जागा आहे का ? "

वसंत हें बोलत असताना रागानें अगदीं लालबुंद झाला होता ! बरोबरच आहे; विनाअपराध शिक्षा झाली, तर ती कोणाला सहन होईल ? पण हा नुसत्या शिक्षेचा प्रश्न नव्हता ! स्वतःच्या शीलाचा होता ! सच्चरित माणसाला शरीरावर चिखल उडविलेला खपेल; पण शीलावर निष्कारण कोणीं शिंतोडा उडविलेला खपणार नाहीं ! कपड्यावरचा डाग धुऊन जाईल ! पण शरीरावर झालेली जखम बरी झाली, तरी त्याचा व्रण कायम राहतो ! तळ्यांतलें कमळ आपल्या जीविताचें रक्षण करण्याकरतां चिखलही पायाजवळ करतें; पण त्याचा संसर्ग आपल्या पवित्र मुखाला लागूं नये, म्हणून त्या चिखलापासून नेहमीं दोन हात दूर, तोंड फिरवून राहातें ! नाहीं तर डबक्यांतले किडे पहा ! सबंध आयुष्यभर चिखलांत लोळण्यांतच त्याना मजा वाटते; त्यांचें सारं अंग चिखलपाणीनें भरलेलं असतं ! आंतून एक क्षणभर त्याना बाहेर काढलें, तर त्यांचें मरणच ओढवेल ! हा प्रत्येकाचा स्वभावधर्म आहे !

वसंत पुढें बोलूं लागला— " मला अशा तऱ्हेनं शाळेचे नामधारी अधिकारी वागवतील ही कल्पनाही नव्हती ! मुलां—मुलींचें, शिक्षक—शिक्ष-

किर्णीचें शील सुधारून आपली शाळा एक नमुनेदार संस्था बनावी या हेतूनें प्रेरित होऊन मी या शाळेंत पाऊल घातलें, तर खरोखर माझा काडीमात्रही दोष नसतां, मला या शिष्टांनीं अधिकाराच्या आणि पैशाच्या जोरावर वाईट चालीच्या निव्वळ खोट्या आरोपाखालीं शाळा सोडायला भाग पाडावें, आणि खरोखरच जो अपराधी, त्याला असाच पाजीपणा पुढें चालू ठेवायला शाळेंत राहूं द्यावें—याला काय म्हणावें तुम्हीच सांगा आतां ! अशा स्थितींत मी माझं सच्छील कसं सिद्ध करणार ? ''

" कां ?– कां नाहीं तुला सिद्ध करतां येणार ? '' कुमार एकदम म्हणाले; त्यांना या उघड उघड अन्यायाचा अगदीं राग आला, आणि त्या रागाच्या भरांत ते वरचें वाक्य बोलून गेले !– " आपण याचा चार दिवस विचार करूं; त्या मुलीला तूं माझ्याकडे घेऊन ये; तिला सगळी खरी हकीकत विचारून घेऊन, योग्य दिसेल तो मार्ग मी तुला लवकरच दाखवून देतों; मुळीं भिऊं नकोस वसंत तूं ! मलाही एक बरा उद्योग मिळाला. आपण त्या बुड्ढ्या नामधारी चेअरमन्वर फिर्याद लावूं या ! तूं काय असा डगमगतोस ? हलकटाला कळूं दे कीं दुसऱ्यांनाही कांहीं अक्कल आहे म्हणून ! ''

" मग काय खरोखरच तूं त्याच्यावर मला फिर्याद करावयाला लावणार ? ''

" हो, लावणार म्हणजे ? तुला काय शंका वाटली कीं काय?— मी तुला मागेंच सांगितलं नाहीं का कीं, खरी वकीली म्हणजे सत्य आणि न्याय एकत्र आणणारी एक अजब शक्ति आहे म्हणून; हें माझें म्हणणें मी माझ्या स्वतःच्या उदाहरणानें जगाला दाखवून देणार आहें ! खरोखरच खरी बाजू असून, पुराव्याच्या अभावीं शाबीत करतां न आल्यामुळें ती खोटी म्हणून सिद्ध करण्यांत, किंवा पैशाच्या जोरावर खऱ्या बाजूचा असलेला पुरावा नाहींसा करून, खोट्याला खरं ठरविण्यांत वकीलांचें जें हल्लीं मन गुंतलें आहे, त्या अयोग्य अशा प्रवृत्तीला हलुहळू आळा घातलाच पाहिजे ! नुसते पैसे मिळविले; दोन ' केसिस ' बुद्धिसामर्थ्याच्या जोरावर जिंकल्या म्हणजेच कांहीं खरी वकिली नव्हे, हें जगाला मला

दाखवायचें आहे, म्हणून तर मी या वकीलीच्या धंद्यात शिरलों; आणि तो प्रसंग इतक्या लवकर आणून दिल्याबद्दल, मी त्या ईश्वराचा अतिशय आभारी आहें ! ”

“ मग खरंच का आपण ही ‘ केस ’ हातांत घेणार ? ” इतका वेळ स्तब्ध बसलेली इन्दु बोलली. तिच्या मनात बरेच वेळां बोलावेंसें आलें; पण पूर्ण माहिती ऐकून घेतल्याशिवाय मध्येंच कांहीं तरी बोलून, दुसऱ्या बोलणाऱ्यांचें लक्ष वेधून घेणें आणि त्यांच्या चालू असलेल्या विषयांत व्यत्यय आणणें तिला बरें वाटलें नाहीं, म्हणून ती गप्प बसली होती. आतां सगळी हकीकत वसंतरावांकडून ऐकून घेतल्यावर त्यावर आपल्या पतीचें काय म्हणणें आहे तें समजून घेऊन, मगच तिनें बोलण्याचा प्रयत्न केला.

“ खरंच घेणार बरं ! मला पूर्ण खात्री आहे कीं, मी या कामांत यश मिळवून, उलट बाजूचे दांत त्यांच्याच घशांत अडकवणार ! अधिकाराच्या किंवा पैशाच्या जोरावर कायद्याला पायाखालीं लाथाडणें, म्हणजे शरीर-सौंदर्याच्या जोरावर एकाद्या हलकट बाजारबसवीनें दुसऱ्याचें शील लुबाडण्यासारखें आहे ! वेश्यावर्गाच्या सौंदर्याचा उपयोग दुसऱ्याचें शील लुबाडण्याच्या कामीं करावयाचा नसून, वाईट चालीच्या माणसाला त्याचें शील सुधारून सन्मार्गावर आणण्याकडे करावयाचा असतो ! हें कार्य मोठें कठीण व बिकट आहे; पण प्रयत्न केला तर तें सहज साध्य आहे ! वेश्या दुसऱ्याचें शील लुबाडतात !– कशासाठीं ? केवळ मजा म्हणून का ?– मुळींच नाहीं !– तर, टीचभर पोटाच्या खळगीसाठीं ना ? असल्या सुंदर वेश्यांना संपन्न लोकांनीं पैशाची मदत करून, त्यांचे विवाह सच्छील अशा दरिद्री पुरुषांशीं करून दिले, तर पैशाचा उपयोग– खऱ्याला खोटं ठरविण्यासाठीं खऱ्याचा पुरावा नाहींसा करण्यांत होणाऱ्या पैशाच्या खर्चापेक्षां– अधिक चांगला झाला, असें नाहीं का होणार ? दुसऱ्याचे गळे कापण्यांत पैसे खर्च करून खोट्याला मदत करण्यापेक्षां, ज्याना पैशाच्या अभावीं विवाह करतां येत नाहीत अशा विवाहेच्छु तरुणांशीं, पोटासाठीं आपलें शरीर विकणाऱ्या वेश्यांची लग्नें जमवून आणण्यांत ते पैसे खर्च केले, तर देश सुस्थितीवर यावयाला कितीसा वेळ लागणार ? पण लक्षांत कोण

घेतो ? स्वतःच्या चैनीला चटावलेल्या तोंडाला दुसऱ्याच्या दुःखावर फुंकर घालायला वेळ कुठें आहे ?"

याच्यावर इन्दु म्हणाली—

" समाजपुरुषाला आपण कपडे घातलेला पहातों, त्यामुळें फक्त त्याचें तोंड आपणांला दिसतें; पण त्याच्या झाकल्या अंगाआड दबा धरून बसलेले दारिद्य, रोग, अस्पृश्यता, वेश्याव्यवसाय, कज्जेदलाली, अनीति वगैरें अंतःस्थ शत्रु, त्याच्या शरीराचे क्रूरपणानें लचके तोडून, त्याची कशी विटंबना करीत आहेत, हें आमच्या डोळ्याना दिसत नाहीं !

सुधारणा करतां येण्यासारख्या किती तरी गोष्टी आपल्या समाजांत आहेत. प्रत्येकजण जर त्याला थोडाफार हातभार लावील, तर विकल होत चाललेलें समाजपुरुषाचं शरीर लवकर सुधारण्याच्या पंथाला लागेल; नाहीं तर, शेवटपर्यंत तोंडावरून कल्पना न आल्यामुळें, समाजपुरुषाचा नाश झालेला आपणांला पहावा लागेल यांत संशय नाहीं !

नुसतें तोंड साबणानं धुऊन भागत नाहीं; हृदयाची घाणही नाहींशी केली पाहिजे ! नाही तर बाहेरून दिसायला भरभक्कम पण आंतून पोखरत जाणाऱ्या वांशाप्रमाणें शरीर क्षणात कोसळून पडेल !

या बाबतींत वसंतभाऊजी ! आपण सर्व सुशिक्षित मंडळींनी कांहा तरी करण्याचा प्रयत्न केला पाहिजे ! वसंतराव तुम्ही शिक्षण अन् अस्पृश्यतानिवारण ही कामें हातीं घ्या; ते वकिलींत सुधारणा घडवून आणण्याचा प्रयत्न करतील; मी, विमल व इतर तिच्यासारख्या मुली विधवा-वेश्यावर्ग यांत सुधारणा करण्याचा प्रयत्न करूं ! प्रयत्न करणं आपल्या हातां आहे, यश मिळणं ईश्वराधीन !

नुसतं पोटभर अन्न मिळवलं आणि खाल्लं, म्हणजे इतिकर्तव्यता झाली नाहीं; तर तें शरीराला पचेल कसं याची काळजी घेतली पाहिजे ! नाही तर, अन्नपचन न झाल्यामुळें रोगाची वाढ होईल ! म्हणून म्हणतें, आपण कांही तरी आतां प्रत्यक्ष कार्य करून दाखविलं पाहिजे ! नुसती तोंडानं बडबड करण्याचे दिवस आतां संपले ! "

" वहिनी ! यातून तुम्ही राजकीय बाबत का वगळली बरं ? " वसंतरावांनीं विचारलें.

"राजकीय बाबत मीं वगळली नाहीं; माझं आपलं असं मत आहे कीं, आधीं घराभोंवतींचा केरकचरा काढायचा, आणि मग बाहेरचा! नाहीं का?"

"राजकीय सुधारणा ही आपणाला बाहेरची कां वाटावी बरं? मला तर असं वाटतं कीं, आधीं राजकीय सुधारणा, मग इतर सुधारणेच्या गोष्टी!"— वसंतराव म्हणाले.

"हें अगोदर कीं तें अगोदर, याचा विचार करण्यांत वेळ घालविण्यापेक्षा, जें आपल्या शक्तीला जमेल आणि बुद्धीला रुचेल, तें प्रथम करून दाखविणें ह्यांतच मोठेपणा आहे!

ज्याप्रमाणें व्यक्ति तितक्या प्रकृति, तद्वत् प्रत्येक माणसाला एखाद्या विषयाची अधिक आवड असते; तेव्हा ज्याची ज्याला अधिक आवड, त्यानें तें हातांत घ्यावें, व त्यांत, आपल्या मगदुराप्रमाणें, बरी वाईट सुधारणा करण्याचा प्रयत्न करावा. हें अगोदर कीं तें अगोदर, याचा विचारच मी म्हणतों हवा कशाला?" वादात वाद उपस्थित होऊन बोलणें वाढूं नये म्हणून कुमार बोलले.

इतकें बोलणें झाल्यावर कुमारांना कोर्टांत काम असल्यामुळें ते इंदूला चहा करण्याची घाई करूं लागले.

चहा वगैरे घेऊन झाल्यावर कुमार कोर्टांत गेले व वसंत आपल्या घरीं गेला. कोर्टांत जातांना शाळेंतल्या त्या मुलीला आपल्याकडे एक दोन दिवसात घेऊन ये, सर्व माहिती तिच्याकडून काढून घेऊन आपण योग्य असेल तो मार्ग शोधून काढूं, आणि त्या शाळेच्या चेअरमनवर फौजदारी अगर दिवाणी—जरूर पडल्यास दोन्ही प्रकारचे—खटले करून दुष्टांचें कारस्थान हाणून पाडूं. तुझ्यासारख्या निरपराधी माणसाला योग्य न्याय मिळण्यासाठीं शक्य तेवढे सर्व प्रयत्न करायला मी मागेपुढें पाहणार नाहीं याबद्दल तुला खात्री असूं दे बरं का!" असें वसंताला अश्वासन देऊन कुमार कोर्टांत निघून गेले.





## कुंज १२ वा

“रोशन ! चल ग, येतेस का जरा बाहेर ! ”— कधींही कारणाशिवाय बाहेर न पडणाऱ्या कुसुमच्या तोंडचे हे शब्द ऐकून, ऐन उन्हाळ्याचे दिवसांत आकाशांत ढग जमलेले पाहून मनाची जशी स्थिति व्हावी, तशी रोशनच्या मनाची स्थिति झाली ! प्रथम तिला वाटले कीं, कुसुमचें बाहेर कांहीं तरी काम असावें, म्हणून ती आपणांला बरोबर बोलावीत असेल; म्हणून तिनें तिला विचारलें,– “कां ग ? कांहीं घ्यायचं घ्यायचं आहे का ? ”

“ नाहीं ग ! कांहीं नाहीं घ्यायचंय्, उगाच जरा पाय मोकळे करून यावंसं वाटतंय् आपलं, म्हणून म्हटलं येत्येस का ? ”

“ चल जाऊं या, पण कुठल्या बाजूला जायचं ग ? गांवांत का हिल्वर ? ”

“ हिल्वर नको गडे, भारी गर्दी असते बाई तिकडे ! आपण आपल्या भांबुर्ड्याच्या बाजूला जाऊं या !”

“ चल तर. ”

असें म्हणून कुसुम व रोशन बाहेर जाण्यासाठीं खोलीबाहेर पडल्या. ‘लेडीज् रेसिडेन्सी’च्या ‘गेट’वरून बाहेर पडल्यावर त्या डाव्या हाताला भांबुर्ड्याच्या बाजूला जाणाऱ्या रस्त्याकडे वळल्या. थोडें अंतर चालून गेल्यावर समोरून नंदकुमार येत असलेले रोशनच्या दृष्टीस पडले. कुसुमचें तिकडे लक्ष नव्हतें, म्हणून रोशन तिला म्हणाली—

“ काय ग ! आतां कुमार भेटले तर बोलशील का ग त्यांच्याशीं ?” कुमारांचें नांव काढल्याबरोबर, अत्यंत सुस्वर आलाप एकाएकीं ऐकून, संगीतज्ञ माणूस ज्याप्रमाणें त्या मधुर गीतनादानें आकृष्ट होऊन, तें ऐकण्याच्या इच्छेनें तेथेंच उभा राहतो, त्याप्रमाणें तिचें हृदय आनंदामुळें त्याच विषयावर स्थिर झालें !

अलीकडे कुसुमच्या मनाची स्थितीच कांहीं वेगळी झाली होती ! तीन,

चार महिन्यांच्या अर्भकाला ज्याप्रमाणें आईच्या तोंडाशिवाय दुसरी कसली जाणीव नसते, त्याप्रमाणें तिच्या मनांत कुमारांशिवाय दुसरा विचारच येत नसे ! त्यांच्या विचारांनीं तिचें हृदय इतकें भरून येत असे कीं, एकांत शोधून काढून ती अस्पष्ट स्वरांत 'कांहो गडे ! असा कां बरं त्रास द्यायचा ?' असे शब्द उच्चारून सुस्कारे टाकीत असे ! आणि जवळ जें काय दिसेल त्यावर डोकें टेकून एक दोन मिनिटें स्तब्ध रहात असे ! ह्या निःशब्द तल्लीनतेंत तिच्या मुखाकडे पाहिल्यास, तिच्या दृष्टींत विश्वरहस्य उकलण्यासाठीं तळमळणाऱ्या योगनिष्ठ तपस्व्याची एकाग्रता, चराचराला आपल्या नादानें झुलविणाऱ्या प्रीतिदेवतेची चित्ताकर्षता, आणि प्रतिभावान् कविहृदयाला सायंकालीन एकांतसमयीं विशाल सागराकडे पाहून वाटणारी विस्मयगूढता एकदम भासमान् होत असत ! दिव्याच्या नंदनवनांत निवास करून राहणाऱ्या चैतन्याच्या दिव्यदर्शनासाठीं उत्सुक झालेल्या जीवाची, अशीच निःशब्द तल्लीन वृत्ति होत असेल का ? दोन मिनिटांनीं शुद्धीवर आल्यावर, तसाच अर्थसूचक सुस्कारा टाकून आपल्या नेहमींच्या उद्योगांत ती गढून जाण्याचा प्रयत्न करीत असे; परंतु पाऊस पडून गेल्यावर, गुलाबाच्या पाकळ्यावरून पावसाचे थेंब गळण्याचे बंद झाले, तरी बराच वेळपर्यंत पाकळ्याचा नाजूक ओलेपणा कायम असतो, त्याप्रमाणें दुसऱ्या उद्योगांत ती आपलें मन गुंतविण्याचा प्रयत्न करीत असतांनाही, तिच्या मनांत कुमारांच्या विचारांनी उत्पन्न केलेला नाजूकपणा तिच्या प्रत्येक कृतींत भासमान् होत असे ! आतांसुद्धां रोशनचे ते शब्द ऐकून तिची स्थिति इतकी नाजूक झाली कीं, आपण कोठें आहोंत, काय करीत आहोंत याचा विचारही मनांत न आणतां, ती रोशनच्या अंगाला भिडली, तिचा हात तिनें अत्यंत प्रेमानें दाबला, आणि त्या प्रेमावेगांत ती रोशनला म्हणाली—

"असं काय ग ! रोशन ! कां बरं मला असा त्रास देतेस ग ! तुला किती किती वेळां सांगितलं मी, कीं त्यांचं नांव ऐकून माझ्या मनाची स्थिति—वेगांत धांवत जाणाऱ्या मोटारींत बसलेल्या माणसाची, जोराच्या वाऱ्याच्या झोतानं व्हावी, तशी होते म्हणून ! खरंच रोशन ! अगदीं तश्शी होते ! अन् मला कांहीं म्हटल्या कांहीं सुचेनासं होतं ग !"

हे शब्द उचारून ती रोशनकडे केविलवाण्या मुद्रेनें पाहूं लागली ! रोशनला तिच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिलेले दिसले ! जणूं काय हृदयाची तळमळ शब्दांनीं व्यक्त होत नाहीं या कल्पनेनें स्वतः हृदयच, आपल्या व्याकूळ तळमळीचा जोर दाखविण्यासाठीं, अश्रूंच्या रूपानें डोळ्यांत येऊन उभें राहिलें कीं काय, असा रोशनला भास झाला !

अस्पष्ट चादण्यात एखादी चांदणी चमकावी ! मृदु दळाआड जाईची कोंवळी कळी डोकवावी, उघड्या शिंपल्यांत मोतीं चमकावें, तद्वत् तिच्या डोळ्यात अश्रु चमकताना पाहून रोशन तिच्याकडे गहिंवरून पहात म्हणाली—

" कुसुम ! नको गडे, इतकं वाईट वाटून घेऊं ! पूस ते डोळे, मी पुसूं का ! "

असें म्हणून तिनें आपला हात तिच्या डोळ्याकडे नेला; परंतु नाक्यावरच्या शिपायानें एकाएकीं हात दाखवतांच, गाडी हाकणाऱ्याला एकदम थांबावें लागतें, त्याप्रमाणें कुसुमनें आपल्या हातानें तिला झिडकारल्याबरोबर, रोशनला गप्प बसावें लागलें ! तेव्हा रोशन म्हणाली—

" काय ग ! रागावलीस का ! डोळे पुसायचे नाहींत का ! "

" रोशन ! मी खरोखरच रागावलें नाहीं; मला अलिकडे रागावयाचंच् जमत नाहीं ग ! माझ्या मनोवृत्ति हल्लीं कशा अगदीं नुसत्या जाईजुईच्या फुलांसारख्या नाजूक बनत चालल्यायत् ! मी तुझा हात झिडकारला, तो रागामुळं नाहीं बरं; तर माझ्या अंतःकरणाची तळमळ त्याना दिसावी, म्हणून मी तो अश्रु त्यानीं डोळ्यानीं पाहीपर्यंत पुसणारच नाहीं, अन् तुला किंवा दुसऱ्या कोणालाही पुसायला देणार नाहीं ! अन् म्हणून रोशन, तुझा हात मीं झिडकारला बरं का, रागानं नाहीं हो ! "

" अन् तो त्यानीं—तुझ्या कुमारानीं—पाह्यच्या आधींच—फुलावरनं दंवबिंदु गळावा, तसा खालीं गळून पडला, तर मग तूं काय ग करणार ! "

" नाहीं गळून पडायचा रोशन ! सूर्याच्या उष्णतेमुळें समुद्राच्या पाण्याची वाफ होऊन, ती पावसाच्या रूपानें खालीं गळून पडते; तसं माझ्या हृदयाचं दुःखामुळं, किंवा दुसऱ्या कशामुळं पाणी झालेलं नाहीं आहे; तसं कांहीं झालं असतं तर, आभाळांतनं भळभळ पाऊस पडतो, त्या-

प्रमाणें माझ्या डोळ्यांतनं अश्रु खालीं गळून पडले असते! नितांत नाजूक अशा प्रेमाच्या गोड गारव्यामुळं माझं अंतःकरण दाटून येऊन त्याचं बर्फ बनलं आहे; अशा बर्फमय अंतःकरणाचा, समुद्रांत बर्फाचा डोंगर बनावा त्याप्रमाणं, माझ्या डोळ्यांत बर्फाचा डोंगर अश्रुरूपानं उभा राहिल्यामुळं, तो पाण्यासारखा खालीं गळून पडणं शक्य नाहीं, रोशन!"

"मग समोर त्या सूर्याकडे बघ कीं, म्हणजे तो त्याच्या उष्णतेनें खालीं गळून पडेल!"

"कुठं पाहूं समोर! सूर्य आतां जातोय् समुद्रांत बुडी मारायला; मला नाहीं वाटत त्या मावळत्या सूर्यांत माझ्या अश्रूला खालीं पाडण्याचं सामर्थ्य आहेसं; पाहिजे तर पहातें मी त्याच्याकडे."

("अग त्या दूरच्या मावळत्या सूर्याकडे नको पाहूं; या जवळ येणाऱ्या उगवत्या सूर्याकडे पहा!"— )

असें म्हणून रोशननें तिला समोरून येत असलेल्या कुमारांकडे पहाण्यास सांगितलें; त्याप्रमाणें ती समोर पहाते न पहाते, तोंच कुमारांची ती सूर्यासारखी तेजस्वी मूर्ति पाहून तिची नजर—सूर्याकडे मुद्दाम पहाणाऱ्या माणसाची दृष्टि, त्याच्या दैदिप्यमान तेजामुळें एकदम खालीं वळावी, तशी —झटकन् खालीं तिच्या पायाकडे वळली! आणि अंतःकरणांत कायमची विराजमान् झालेली कुमारांची मनमोहन मूर्ति आणि प्रत्यक्ष आतां डोळ्यासमोर दिसत असलेली त्याची मूर्ति, यांची तुलना करण्याच्या कामीं आपलें अस्तित्व आड येऊं नये, म्हणून एवढा वेळ डोळ्यांत घुटमळत असलेला अश्रु, आकाशांत भटकत असलेला एकाकी आणि शेवटचा ढग वाऱ्याच्या हालचालीनें खालीं जमिनीवर पावसाच्या रूपांत कोसळून पडावा, किंवा तेथल्या तेथेंच नाहींसा व्हावा, तद्वत् खालीं गळून पडला—नव्हे! कुसुमच्या इच्छेप्रमाणें, डोळ्यांतल्या डोळ्यातच विरून गेला!

कुमारांचेंही त्याच वेळीं तिच्याकडे लक्ष गेलें! आणि त्यांना अत्यंत आनंद झाला! परंतु अंतःकरणात जागृत झालेली आनंदाची भावना मुखावर कोणत्या तऱ्हेनें व्यक्त करावी, हा त्यांच्या मनाला प्रश्न पडला! हंसावें, तर आपली तिची ओळख नाहीं!— खरोखरच का पण तिची त्यांची ओळख नव्हती? मग एकमेकाच्या अंतःकरणांत प्रीतीचें ब्रह्मांड

उभारूं पहात होतें—नव्हे उभारलें होतें—तें एकमेकांच्या ओळखीशिवायच का! प्रेमाला ओळख लागत नाहीं काय! प्रेमाला ओळख लागते! पण इतर दोन माणसांची वरवरची ओळख असते, तशा प्रकारच्या व्यावहारिक ओळखीची प्रेमाला जरुरी नसून, परस्पर-दर्शनोद्भव-आकर्षणानें दोन अंतः-करणांत उत्पन्न झालेल्या हृदयाच्या ओळखीची प्रेमाला जरुरी असते! तशा प्रकारची त्यांची ओळख झालीच होती! व ती त्यांच्या मनांतल्या मनाला पूर्ण माहीतही होती! परंतु समुद्राच्या पृष्ठभागाला त्याच्या तळाची माहिती नसावी, त् त्याची त्याच्या जगांतल्या मनाला जाणीव नव्हती! त्यामुळें मनात असूनही, त्यांना आपली आनंदी मुद्रा निर्विकार बनविण्याचा निर्दय प्रयत्न करावा लागला! तरी पण, जलाशयाच्या अंतर्भागांत चालू असलेल्या हालचालींमुळें त्याच्या पृष्ठभागावर अस्पष्ट अशा कंपलहरी दृष्टीस पडतात, तद्वत् त्याच्या मुद्रेवर, अंतःकरणांत चालू असलेल्या मनोव्यापारांमुळें, एक प्रकारची कंपित छटा उत्पन्न झालेली, सूक्ष्मपणें पहाणाऱ्याला आढळून आली असती!

थोडा वेळ कुमार पुढें चालत होते; पण त्यांचीं पावलेंच भराभर उच-लेनात! बरें, तसें मागें फिरावें तरी पंचाईत! अशा स्थितीत त्यांचें अंतः-करण घड्याळांत हालणाऱ्या लंबकाप्रमाणें आंदोलन पावूं लागले! तरीपण तराजूच्या ज्या पारड्यांत वजन अधिक तें पारडें खालीं जावें, किंवा दोन्ही बाजूंनीं ओढल्या जाणाऱ्या खेळांत ( Tug of War ) ज्या बाजूला जोर अधिक त्या बाजूला दुसरी बाजू ओढली जावी, किंवा चोहींकडच्या वायुलहरी फूलवेलीवर प्रेमवर्षाव करीत असतां, तिनें ज्या बाजूच्या वायुलहरींच्या प्रेमभावना अधिक गाढ, त्या बाजूच्या वायुलहरीं-वर प्रेमातिशयानें मान टेंकावी, तद्वत् त्यांचें अंतःकरण, कुसुम ज्या बाजूनें जात होती, त्याच बाजूला ओढलें गेलें; आणि ते मागें फिरले! कुसुम एकसारखी मागें पहात होतीच; पण तिची कल्पना नव्हती कीं कुमार असे एकदम मागें वळतील; त्यामुळें वेगांत चालू असलेली मोटार पुढयांत एकाएकीं माणूस आलेला पाहून, ब्रेक दाबल्यामुळें अचानक थांबावी, त्या-प्रमाणें तिचें हृदय एकदम थबकलें! आणि मोटारींत बसलेल्या माण-सांना एकदम धक्का बसावा, किंवा पावसाच्या दिवसांत इलेक्ट्रिक लाइ-

टच्या बटणाला हात लागतांच त्याला एकदम झटका बसावा, तशा प्रकारचा तिच्या हृदयाला धक्का बसला ! त्यामुळें तिच्या अंतःकरणाची आणि शरीराचीही धांदल उडाली ! म्हणून ती रोशनला म्हणाली,—

"रोशन ! तूं अगदीं माझ्या बाजूनं चल ना गडे ! दूरदूर जाऊं नको!"

" ते तुझ्या बाजूला असल्यावर मी ग कशाला पाहिजे जवळ ? मी आपली जातें माघारीं ! जाऊं ना ग ?"

रोशननें जावें—अन् जाऊंही नये, असें तिच्या मनाला वाटत होतें ! आणि खरोखरच ती निघून गेली, तर आपण काय करणार, या विचारांत ती गढून गेली असतां, दोन नद्या बराच मार्ग आक्रमण करीत एकमेकां-जवळून जाव्या, आणि नंतर त्यापैकीं एक, एकाएकीं दुसरीला एकटी सोडून निराळ्या बाजूला वळावी तशी रोशन तिला एकटी सोडून निघून गेली !

विचारांतून जागी झाल्यावर कुसुम जवळ पहाते तों रोशन नाहीं ! या जाणीवेनें तिची जी कांहीं धांदल उडाली, त्याचें वर्णन करता येणें अशक्य आहे ! कुमारांच्या डोळ्यांना मात्र ती त्या स्थितींत—एखादी सुंदर स्त्री, अतिशय जोराच्या वाऱ्यामुळें अंगावरचें पातळ उडत असतां तें सांवरण्यासाठीं धडपड करीत असतांना जशी दिसते, तशी दिसली !

कुमार हंसले ! — मनात हंसले ! — पण त्याचा पडसाद त्यांच्या मुखा-वर उठला ! थोड्याच वेळांत ते कुसमच्या समांतर रेषेंत आले. कुमा-रांना बोलावें कीं न बोलावें तें काहीं कळेना ! कुसुमनें तर, हुशार विद्यार्थी ज्याप्रमाणें आपण पहिलाच नंबर मिळविणार, असें परीक्षेचे पेपर्स जाण्यापूर्वीच ठरवून ठेवितो, त्याप्रमाणें 'कांहीं झालं तरी त्याच्याशीं बोला-यचंच् नाहीं अगदीं' असें अगोदरच मनांत ठरवून टाकलें ! !

अशा परस्परानुरक्त दोन नाजूक मनांच्या धडपडधादलींत, फुलांचा सुगंध नाकावाटे अंतःकरणांत शिरावा, त्याप्रमाणें 'कुसुम' असे नाजूक स्वरांत उच्चारलेले शब्द तिच्या कानांवाटे हृदयावर कोरले गेले !

यावेळीं इतर ठिकाणांपेक्षां भांबुर्ड्याच्या बाजूला रहदारी बरीच कमी असते. त्यांतून कुमार कुसुम याच्या सुदैवानें, ज्या बाजूनें तीं चाललीं होतीं ती बाजू अगदीं शांत होती ! संध्याकाळचा पांच सहाचा सुमार

असल्यामुळें, जिकडे नजर टाकावी तिकडे सायंकालीन रमणीयता मनाला प्रसन्न करीत होती; त्यांतच शीतल वायुलहरी आपसांत पाठशिवणीचा खेळ खेळत असल्यामुळें, जणूं काय, सुगंधी पुष्पांनीं बहरलेल्या रम्य उद्यानांत कारंज्यांचे जलतुषार थुईथुई नाचत आहेत, असा मनाला भास होत होता!

अशा त्या रम्य वेळीं 'कुसुम' हे कुमारांच्या तोंडचे शब्द ऐकून, कुसुमच्या नाजूक मनाची जी अवर्णनीय अशी स्थिति झाली, तिचा तिला जन्मात विसर पडला नसेल! जाईजुईच्या पायघड्यांवरून चालण्याचा प्रसंग काव्यप्रेमी मनाला आला, तर तें ज्या रीतीनें त्या पायघड्यांवरून पावलें टाकीत जाईल, त्याप्रमाणें तिच्या हृदयाचा श्वासोच्छ्वास होत होता! सुंदर अशा कुमारिकांचा घोळका, डोक्यांत गुलाबाचीं फुलें घालून जगाला वेड लावणाऱ्या गजगतीनें ठुमकत ठुमकत चालत जात असता, त्यांच्या डोक्यांतील सुंदर गुलाबांच्या मधुर सुगंधानें एखाद्या रसिक अंतःकरणाला जो कांहीं आनंद होईल, तशा प्रकारच्या दिव्यानंदांत, एखाद्या शात सरोवरांत नौका डुंबत रहावी, त्याप्रमाणें तिचें अंतःकरण नाजूक हेलकावे खात राहिलें!

अशा प्रकारच्या अंतिम आनंदाच्या अनुभवात गर्क असल्यामुळें कुसुमला कुमाराच्या नाजूक हांकेला 'ओ' देण्याचें भान राहिलें नाहीं! कुमारांना वाटलें आपण मारलेली हांक तिला ऐकूं गेली नसेल, म्हणून ते जरा जवळ जाऊन म्हणाले—

"बोलायचं नाहीं का!"

या अत्यंत मधुर अशा शब्दनादानें ती भानावर आली! परंतु लज्जेनें तिची लाजरी दृष्टि अधोमुख होऊन पायाच्या नखांवर स्थिर झाली! मन बोलण्यासाठीं धडपडत होतें! पण स्त्रीसहज लज्जा तिला बोलण्याची मनाई करीत होती! प्रीतीच्या चांदण्यानें चमकणारी कुमारिकांची मुग्ध मधुर नजर, समोर आपल्या प्रीतिविषयाला पाहून, किंवा त्याच्या मुखांतले प्रेमाचे बोल ऐकून, अशी एकदम अधोमुख कां होते, तें त्या परमेश्वराला किंवा त्यांच्या मनालाच माहीत! डोळ्यांत चमकणारी प्रीति, आपल्या प्रीतिपरमेश्वराच्या डोळ्यांना दिसूं नये, आपल्या नाजूक प्रेमाचा त्याच्या

लबाड मनाला सहजासहजीं सुगावा लागूं नये, म्हणून डोळ्याच्या पापण्यांचें आच्छादन घालून, अंतःकरणांतील दिव्य प्रीतितेज लपवून ठेवण्याचा तर त्यांचा प्रयत्न नसेल ना ? पण हृदयांतील प्रीतीचे लपंडाव आपल्या हृदयेश्वराला कळूं नयेत, अशी खरीच का प्रेमी स्त्री-मनाची इच्छा असते ? आपल्या प्रियतम प्राणेशाच्या प्रणयाकर्षणरूप पूर्णचंद्राच्या प्रियदर्शनानें उचंबळत असलेल्या आपल्या स्वतःच्या अंतःसागराच्या तळाकाठीं दडलेल्या मुग्ध, मधुर तरंगरत्नाचें दिव्य तेज, त्याच्या अंतश्चक्षूंना विनासायास न दिसता, तीं दिव्य तेजोरत्नें शोधून काढण्यासाठीं त्यानें त्या सागराच्या तळाशीं बुडी मारावी, अशी प्रणयमुग्ध बालिकांच्या मनाची इच्छा असते, म्हणून तर हा प्रीतीचा लपंडाव त्यांचें प्रणयाकुल मन अजाणतेपणीं खेळत नसेल ना ?

परंतु प्रेमाच्या हालचाली नुसत्या पापण्यांच्या आच्छादनांनीं न दिसत्या झाल्या असत्या तर मग काय पाहिजे होतें ? डोळे मिटून भर उन्हांत सूर्याकडे पाहिलें, तरी त्याचें प्रखर तेज मिटल्या डोळ्यांनाही जाणवत असतें, तद्वत् स्त्री-हृदयानें आपल्या अंतःकरणांत उत्पन्न झालेलें प्रेम, आपल्या प्रीतिविषयापासून लपवून ठेवण्याचा कितीही आणि कसाही प्रयत्न केला, तरी तें त्याला कळून आल्यावांचून राहात नाहीं ! अंतःकरणसागरांत उत्पन्न झालेली प्रीतीची लाट, डोळ्यांच्या किनाऱ्यावर येऊं पहात असतांना, पापण्याच्या खडकाला आपटली तरी, ज्याप्रमाणें लाटांचे तुषार, खडकांच्या कृत्रिम अडथळ्याला न जुमानतां अधिक जोरांत वर उडून, त्या खडकाचें सर्वांग भिजवून टाकतात, त्याप्रमाणें ती प्रीतीची लाट पापण्याच्या खडकाला न जुमानतां, अंगातून बाहेर पडण्याची धडपड करीत असल्याचें, आणि त्या नाजूक धडपडींत आपल्या प्रेमलेचें शरीर, आपल्या प्रीतीच्या तेजतुषारांनीं भिजवून टाकीत असल्याचें, चतुर प्रेमिकाला तिच्या त्या धडपडधांदलीमुळें आणि प्रेमानें वरखाली होणाऱ्या हृदयाच्या धडधडीमुळें तात्काळ समजून आल्याशिवाय रहात नाहीं.

यावेळीं कुसुमची तशीच स्थिति झाली ! आणि ती कुमारांच्या प्रीतिचतुर हृदयाला उमगूनही आली ! परंतु तिच्या नाजूक प्रेमानें धडधड-

णाऱ्या हृदयाला सांवरण्याचें त्यांच्या मनांत असतांनाही तें त्यांच्या हातानें झालें नाहीं !

प्रेमानें डोलणाऱ्या वेलीची प्रेमळ धडपड वृक्षाच्या दृष्टीस पडून तो तिच्या प्रणयलीलांनीं वेडावून जातो, तरी तिला आपल्या हृदयाजवळ धरण्याचा तो आपण होऊन प्रयत्न न करतां, दुसरें एकादें अगांतुक कारण शोधीत असतो; व तें त्याच्या सुदैवानें तिची प्रियसखी जी वायुलहर, तिनें तिला त्याच्या अंगावर लोटल्यामुळें त्याला आयतें मिळालें, म्हणजे मात्र त्या वेलीला हृदयाजवळ कवटाळून धरावयाला त्या वृक्षाला मुळींच संकोच वाटत नाहीं !

कुमारही अशाच प्रकारचें कारण शोधीत होते; आणि तें त्यांच्या नशीबानें त्यांनाही लवकरच सापडलें !

कुमार दुसऱ्यांदा तिच्याशीं बोलतांना अगदीं तिच्याजळ आले होते; त्यावेळी वाऱ्यानें उडून तिच्या पातळाचा पदर त्याच्या अंगाखांद्याला स्पर्श करूं लागला ! या सोन्यासारख्या संधीचा फायदा घेऊन कुमारांनीं तिच्या त्या पदराला हातानें स्पर्श केला आणि त्या प्रेमोन्मादांत भान न राहून त्यांनीं तिचा नाजूक हात आपल्या हातांत प्रेमानें धरला ! !

जाईजुईच्या फुलांच्या हारातून चांदीसारखी लखलखणारी पातळ कलाबतु जशी चमकते, तशी त्यांच्या जाईजुईसारख्या नाजुक अंतःकरणात अत्यंत नाजूक आणि मधुर अशी प्रेमसंवेदनेची लाट उसळूं लागली ! त्या दिव्य प्रीतिसमाधीच्या मधुर तन्मयतेंत कुसुम अजाणतेपणीं कुमारांच्या अंगाला भिडली ! ! पण स्वतः आपण होऊन त्यांच्या अंगाला भिडत असतांनाही – " सोडा ना माझा हात ! – " हे शब्द, अस्पष्ट कां होईना उच्चारावयाला मात्र ती विसरली नाहीं ! दिव्याच्या नंदनवनांत पहिले पाऊल पडल्याचा त्याच्या जिवाला अनुभव आला असेल का ?

" का बरं ? " दोनच शब्द; पण त्यामुळें कुसुमचें हृदय थरारलें !

" सोडा ना ! असं काय तें ? " – वरच्या ' कां बरं ? ' या प्रश्नाला हें उत्तर अगदीं विसंगत आणि अस्वाभाविक दिसत होतें !

" कुसुम ! खरंच का ग तुला माझ्या हाताचा स्पर्श सहन होत नाहीं ? – " व्याकुळ होऊन कुमारांनीं तिला विचारलें !

" आपल्या हाताचा स्पर्श मला सहन होणार नाहीं ! – कां ? – कां बरं सहन होणार नाहीं ? ज्या स्पर्शांत स्वर्गीय अशा चांदण्यांच्या दिव्य तेजांत विकसणाऱ्या सुंदर अशा जाईजुईच्या फुलांचा नाजुकपणा आहे ! सृष्टिमातेच्या मांडीवर पडून तिचें स्तनपान करणाऱ्या तिच्या गोजिरवाण्या तान्हुल्यांचें दिव्य पावित्र्य आहे ! अक्षयांत नांदणाऱ्या सुरसुंदरींच्या हृदयाची स्निग्धता आहे ! आणि स्वर्गीय देवतांच्या डोळ्यांत चमकणाऱ्या दिव्य प्रेमाची हृदयाकर्षकता आहे, तो स्पर्श मला कां बरं सहन नाहीं होणार ? मला सहन होईल, पण तें दिव्य स्पर्शसुख कायमचं अनुभवण्याचं दिव्यत्त्व माझ्या नशिबांत नाहीं ! होय ना ? "

तुझ्या नशिबाची किंमत तूं कधी केली होतीस ? जन्मास येणाऱ्या जीवाचें भावी नशीब त्याला अगोदर कळूं नये म्हणून त्या सच्चिदानंद प्रभूनें त्याचें नशीब डोळ्यांना न दिसणाऱ्या अशा कपाळावर कोरून ठेविलें आहे असें म्हणतात. मग तुला ग तुझं नशीब कसं कळलं ? "

" नशीब डोळ्यांनींच पाह्यचं असतं का ? अंतःकरणाला स्वतःच्या नशिबाची खूणगाठ असत नाहीं का ? स्वतःचं मुख स्वतःला दिसत नाहीं म्हणून माणसानें जगात आरशाचा शोध लावला; त्यामुळें स्वतःचें मुख आरशांत पहाता येतें; त्याप्रमाणेंच आपलं नशीब डोळ्यानी बघतां येत नाहीं म्हणून ईश्वरानें माणसाला अंतःकरणाचा आरसा जवळ देऊन ठेवला आहे. त्यामुळें अंतःकरणात स्वतःच्या नशिबाचें पूर्ण प्रतिबिंब माणसाला दिसून येतें. अंतःकरणाला आपल्या नशिबाची पारख नसती, तर जमिनीवरचे दगड बेशक् आकाशात तारकासुंदरींकडे जाण्यासाठीं धडपडले असते ! समुद्राच्या पोटांत दडलेलीं रत्नं सृष्टिसुंदरीचें वदनकमल पहाण्यासाठीं समुद्राच्या पृष्ठभागावर येऊन राहिलीं असतीं ! पण अशी अजब धडपड कुणी अजून पाहिलेली नाही ! "

" पण स्वर्गातल्या तारका दगड होऊन खालीं येतात ना ? समुद्रांतलीं रत्नें सृष्टीच्या जामदारखान्यांत येऊन बसतात ना ? कोणाचें नशीब काय आहे, तें कोणाला कधीं सागतां येईल का ? "

" मग काय माझं भाग्य आपल्या दिव्य सहवासाचं चिरसुख भोगण्याइतकं बलवत्तर आहे, असं का आपलं म्हणणं ? पण मी विचारितें. दिव्याचा

जडाशीं संगम शक्य आहे का ? दिव्य तारा जड अशा वसुधेसाठीं धडपडून आपल्या आयुष्याची माती करून घेतो त्याप्रमाणें आपण आपलं दिव्य जीवित माझ्या सारखीच्या जड देहाबरोबर घालवून, आपलं मोलाचं आयुष्य मातीमोल बनविणार का ? "

" पण जड कोण आणि दिव्य कोण, हें कोणी ठरवायचं ? तुझ्या दृष्टीनें मी दिव्य; माझ्या दृष्टीनें तूं दिव्य ! मग अशा स्थितींत एकमेकानीं एकमेकात मिसळून जाण्याचा प्रयत्न केला, तर काय नुकसान होणार आहे ? बरं, तूं म्हणतेस, त्याप्रमाणें मी दिव्य कोटींतला, आणि तूं जड सृष्टींतली आहेस असें घटकाभर मानलें, तरी दोघांचा संगम व्हायला काय हरकत आहे ? दिव्य आत्मा जड देहाशीं संगम पावून, जगांत मोठमोठ्या उलाढाली करतोच कीं नाहीं ? जगात दृष्टीस पडणारे अजब शोध, मोठमोठाली ग्रंथनिष्पत्ति, वगैरे ज्या दिव्य गोष्टी जगात घडून येतात, त्या या दिव्य आत्मा आणि जड शरीर, यांच्या संयोगामुळेंच ना ? मग आपल्या दोघांपैकीं एक जड अगर दिव्य आहे असें मानले तरी त्या जड आणि दिव्य अशा दोन जीवाच्या चिरसंयोगानेंच जगाचा चिरपरिणामी फायदा होणार नाहीं कशावरून ? दिव्याच्या नंदनवनात जडालाही शिरकाव करून घेता येऊन आपली कर्तबगारी जगापुढें आणता येत असते असे माझें म्हणणें आहे. "

" पण जगाचा फायदा करण्यासाठीं आपण एके ठिकाणींच कशाला आलों पाहिजे ? वेगवेगळे राहून आपल्या हातून चिरस्थायी कार्यनिष्पत्ति व्हायची नाहीं का ? "

" शरीरापासून आत्मा निराळा काढला, किंवा फोनोग्राफांतली पेटी यंत्रापासून बाजूला काढली, तर जी अनवस्था प्राप्त होईल, ती तूं आणि मी निरनिराळे राहिल्यामुळें होईल, असें मला वाटतें ! "

" मग मी आपली झालें तर जगाचा फायदा होईल, असं आपलं म्हणणं आहे तर ? जगाच्या फायद्यासाठीं मी आपली व्हावी, अशी आपली इच्छा आहे ! आपल्या स्वतःच्या इच्छेसाठीं मी आपली व्हावी, अशी आपली इच्छा नाहीं ना ? "

" तूं माझी झाल्यानें जगाचा फायदा होईलच, असें मी म्हणत नाहीं !

जगाचा नाहीं झाला, तरी आपला एकमेकाचा तरी होईल कीं नाहीं ! आणि आपलाही नाही झाला, तरी माझी तूं व्हावीस अशी माझी इच्छा आहे; अगदीं अंतःकरणांतल्या अंतःकरणापासून आहे ! तुझं माझ्यावर प्रेम नसेल, तर मात्र आपण शरीरानें एक होण्यात काही अर्थ नाहीं ! सुंदर वस्त्राला ठिगळ लावल्यामुळें जसें तें बेढब दिसेल, त्याप्रमाणें आपलें शारीरिक साहचर्य मनमिळणीवाचून हीणकस दिसेल ! (माझ्यासाठी तूं माझी होऊं नकोस ! एकमेकासाठी आपण एक होऊं या ! ")

" आपल्याला मी एक प्रश्न विचारूं का ? "

" विचार ना ! त्याला आर्जव आणि विनवणी कशाला पाहिजे बरं ?"

" आपण अविवाहित आहा कीं नाहीं ? " हा प्रश्न विचारतांना तिची वृत्ति जरा अस्थिर झाली !

" नाहीं ! मी अविवाहित नाहीं ! माझं लग्न झालं असून, माझी पत्नी सर्वगुणानी अगदीं परिपूर्ण आहे ! तिचं माझ्यावर अत्यंत निःसीम प्रेम आहे, त्याप्रमाणं माझंही तिच्यावर आहे ! "

" मग मी आपली कशी बरं होणार ? " —

कुसुमच्या डोळ्यात अश्रू आल्यामुळें, तिला कुमाराच्या मुखावरच्या हालचाली स्पष्ट दिसणें अशक्य झाले आणि त्यामुळें ती कुमाराच्या मुखाकडे अधिक एकाग्रतेनें पाहण्याचा प्रयत्न करूं लागली ! कुमाराना तिची ही दीन अवस्था पाहवेना ! म्हणून त्यानीं तिच्या खांद्यावर एक हात ठेवला आणि दुसऱ्या हातानें, पाकळ्यावरचे थेंब वारा ज्याप्रमाणें पुसून काढतो, त्याप्रमाणें अत्यंत नाजूकपणानें तिच्या डोळ्यातले अश्रू पुसून टाकले ! जगात माणसाला माणसाची गरज लागते ! कशाला बरें ? तर दुःखानें डोळ्यात येणारे अश्रु, योग्य वेळी हक्कानें पुसणारा हात सांपडावा म्हणून !

कुसुमला आपल्या जन्माचें सार्थक झाले असें वाटलें ! असें समाधान तिला आपल्या उभ्या आयुष्यात तरी लाभलें होतें का ? ध्येयपूर्तीच्या दैविक समाधानाच्या तल्लीनतेंत तिला साऱ्या जगाच्या विसर पडला ! दिव्याच्या नंदनवनात स्थान मिळाल्याचा दिव्यानंद तिच्या देहामनाला झाला ! आणि ती अत्यंत प्रेमानें कुमाराना म्हणाली—

" आपण कुठं तरी जाऊन बसूं या गडे थोडा वेळ ! "

" चल " – म्हणून कुमारांनीं तिचा एक हात हातांत घेतला, आणि तिला त्यांनीं जगाच्या रहदारीपासून अलग असलेल्या अशा एकांत जागीं टेकडीच्या वर नेली. चागली बसण्यासारखी जागा बघून, तीं दोघें अगदीं एकमेकाला भिडून बसलीं ! प्रथम कुमारानींच बोलण्यास सुरवात केली–

" माझं लग्न झाल्याचं मी तुला मघाच सागितलं, पण माझा हा विवाह जगाच्या दृष्टीनें तूं माझी व्हायच्या आड येणं मुळींच शक्य नाही!"

" असं कसं बरं ? " कुसुमनें उत्सुकतेनें विचारलें.

" तुझ्याविषयी माझ्या मनात उत्पन्न झालेली आपुलकीची भावना मी माझ्या पत्नीला स्पष्टपणें कळवली; आणि माझी इच्छा मी तिच्याजवळ उघड केली ! तिनं माझ्या अंतःकरणाची ओढाताण ओळखून, तुला आपली करण्याची मला कबुली दिली ! इतकेंच नव्हे, तर तिने मला तसा आग्रह केला आहे ! मला तिची योग्यता माहीत असल्यामुळें, या गोष्टीचं, मला इतकसं आश्चर्य वाटलं नाहीं ! "

" मग आपण आपल्या प्रथम पत्नीची व्यवस्था काय करणार तर ? "

" व्यवस्था काय करायची ? माझं तिच्यावर – मी मघाच सागितलं तुला ना– कीं अत्यंत प्रेम आहे म्हणून इतकेंच नव्हे तर माझ्यापासून जर ती दूर जाईल, तर मला मरणाच्या यातना होतील ! असं असूनही, तूं माझी झाली पाहिजेस ही तर माझी उत्कट इच्छा आहे ! "

" मग दोन पत्नींवर आपल्याला प्रेम करतां येणं कसं शक्य आहे बरं?"

" का बरं शक्य नाहीं ? अंतःकरण हें सागराप्रमाणं अथाग आहे ! एकाच अंतःकरणात प्रेम ही दिव्य भावना आणि काम, क्रोध, लोभ, मद, मोह आणि मत्सर, हे षड्रिपु ज्याप्रमाणें एके ठिकाणीं वास्तव्य करून असतात, त्याप्रमाणेंच त्या अंतःकरणाला दोन व्यक्तींवर प्रेम करता येणं शक्य असतें. आपले एकापेक्षा जास्त शत्रू असतात कीं नाही ? आपले एकाहून अधिक मित्र असतात कीं नाहीं ? त्याप्रमाणेंच पत्नीप्रेम मनाला एकापेक्षा अधिक स्त्रियांवर का करता येऊं नये बरं ? करणं योग्य आहे कीं नाहीं हा प्रश्न वेगळा ! पण शक्य आहे ना ? झालं तर मग ! "

" पण दोन पत्नींच्या संगतींत आपल्याला सुख होईल का ? एका

म्यानांत दोन तरवारी रहात नाहींत! आकाशहृदयाला रविकला आणि चंद्रकला यांचा एकदम प्रीतिसहवास लाभत नाहीं! आभाळांत एकच वीज चमकते! एकाच वेळीं दोन वीजा चमकलेल्या दिसत नाहींत!"

"पण एक वीज चमकूनही व एकीवरच प्रेम करूनही आकाशाच्या निराश मनाला शांति आहे का? बिचाऱ्याच्या नशिबांत या पत्नीमुळें अश्रूच काढावे लागतात ना? आयुष्य सुखी होणें न होणें, हें अमुक एका गोष्टीवर अवलंबून नाहीं! तें आपल्या मनावर आहे! मन सुखी तर आयुष्य सुखी! आणि मन सुखी, संतुष्ट असावयास मानसिक समाधानाची जोड मनाला आवश्यक आहे! माणूस पुढें यावयाला ज्याप्रमाणें परिस्थितीची मदत लागते, त्याप्रमाणें आयुष्य सुखी व्हावयाला मानसिक समाधानाची अत्यंत आवश्यकता आहे! तुझ्या सहवासानें मला पाहिजे असलेलें मानसिक समाधान पूर्णपणें मिळविता येईल, या उत्साही आशेनेंच मी तुझ्याशीं विवाह करायला—तुला जगाच्या दृष्टीनें माझी करायला—तयार झालों आहें!

तुझ्यावाचून आयुष्य म्हणजे चिच्छक्तीवांचून जग! प्रतिभा आणि कल्पना यांच्यावांचून काव्य किंवा नादमाधुर्यावांचून संगीत, सर्व कांहीं निरुपयोगी आणि निरर्थक आहे!"

"मग आपलं म्हणणं असं आहे तर, कीं मी जनदृष्टीनें आपली झालें म्हणजे आपल्या आयुष्याच्या विश्वांत चैतन्य खेळूं लागेल! आपल्या जीवितांचं काव्य कल्पना आणि प्रतिभा याच्या विलासांनीं नटलेलं भासेल! अन् आपल्या हृत्संगीतांत नादमाधुर्याची भर पडेल! असंच ना?"

"होय बरं! माझ्या प्रथम पत्नीच्या आणि आणि कुसुम तुझ्या दिव्य अशा सहवासाच्या सामर्थ्यानें माझ्या दिव्यासक्त मनाला दिव्याच्या नंदनवनांत शिरकाव करून घेतां येईल, अशी माझी खात्री आहे! म्हणून तर माझी प्रथम पत्नी जिवंत असतांना तुझ्याबरोबर लग्न करायला मी तयार झालों आहें!"

"पण आपल्या प्रथम पत्नीच्या आयुष्याची वाट काय? तिला, मी आपली झालें तर सुख होईल का? आपण दोघे सुखी झालों, म्हणजे सारं जग सुखी झाल्यासारखं झालं का? आपल्या स्वतःच्या सुखासमा-

धानासाठीं दुसऱ्याच्या–दुसऱ्याच्या कशाला ? आपल्या विवाहित पत्नीच्या–आपल्याला आपलं हृदयसर्वस्व अर्पण केलेल्या एका नाजूक स्त्रीहृदयाच्या – सुखाचा आपण विचारच नाही का करायचा ? "

" पण तूं माझी झाल्यानें माझी पत्नी मला परकी झाली, असं तुला कां वाटावं ? तुझ्याशी लग्न केल्यामुळें माझ्या पत्नीच्या अंतःकरणातील सुखसमाधान कमी होईल, असा तुला संशयच मुळी का यावा ? "

" मातेचं प्रेम गुलावर असणं जितकं शक्य आहे, तितकंच मानी स्त्रीमनाला सवतीचं अस्तित्व सहन होणं अशक्य आहे ! स्त्रीहृदय वाटेल त्या हालअपेष्टा, अपमान सोसण्यास तयार होईल, पण त्याला सवतीचं नाव क्षणभर सुद्धा खपायचं नाहीं बरं का ! "

" हें तूं आपल्यावरून सागतेस का ? सवत जिवंत आहे, या कल्पनेनें तुला माझ्याशीं लग्न करायला कसंसंच होतंय् होय ना ? "

" माझं आपल्यावर असलेलं प्रेम इतकं हीणकस आहे, अशी आपली समजूत झाली का ? तशी आपली समजूत झाली असेल, तर ती अगदीं कीची आहे बरं ! आपल्यावर प्रेम करणं, अन् त्या प्रेमासाठी आपली होणं, या दोन विचाराशिवाय दुसरा कोणताही विचार माझ्या मनात कधीं आलाच नाही !

शरीरातनं आत्मा काढल्यावर, ज्याप्रमाणं त्या शरीराला कवडीचीही किंमत नसते, त्याप्रमाणं आपण माझ्यावर – या आपल्या कुसुमवर – प्रेम केल्याशिवाय, अन् आपण प्रेमानं माझे झाल्याशिवाय, माझ्या जीविताला कवडीचीही किंमत नाहीं, याची मला पुरी जाणीव आहे ! आपल्या अंतःकरणांतील प्रेमाच्या दिव्य तेजामुळें, अन् त्या प्रेमाच्या सुखकर सहवासामुळं, माझं आयुष्य आकाशांतल्या नक्षत्राप्रमाणं लोकदृष्टीला कौतुकास्पद वाटेल, यांत मला मुळीच संशय नाहीं ! पण लोकांना कौतुक वाटावं म्हणून मी आपली होण्याचा प्रयत्न करतें आहें, असं बरीक आपण समजूं नये ! माझ्या हृदयांत उत्पन्न झालेली व्याकूळ तळमळ मी आपली झाल्यानं पूर्ण शांत होईल ! माझं हृदय आपल्या हृत्संगीताच्या आलापांनीं दिव्यानंदांत गढून जाऊन त्या आनंदाच्या शीतल चंद्रप्रकाशांत भोंवतालच्या भयाण काळोखाची काजळी पार नाहीशी होईल, याची मला पुरी खात्री

असल्यामुळंच, अन् त्या खात्रीच्या गोड जाणीवेमुळंच बरं का मी काय-मची आपली होण्याचा प्रयत्न, माझं हृदय एवढ्या उत्साहानं, आनंदानं अन् प्रेमानं करीत आहे ! त्या प्रयत्नाच्या आड कोणतीही ऐहिक अडचण येणं शक्य नाहीं– आपलं माझ्यावर प्रेम नसेल अन् आपलं अंतःकरण मला आपली करायला तयार नसेल, तर फक्त ती एक अडचण या माझ्या मनाच्या आड येईल ! हें मी आपल्याला– माझ्या प्रेमाच्या पंचप्राणाला, माझ्या पंचप्राणाच्या परमेश्वराला– पुन्हां पुन्हा अगदीं स्पष्टपणें, अन् लाज सोडून सागत आहें !

माझ्या सद्भाग्यानं, अन् जबर पूर्वपुण्याईनं, आपलंही माझ्यावर– या आपल्या दीन दासीवर –प्रेम आहे, हें आपल्या तोंडानंच मला आतां कळलं ! आतां माझ्यासारखा सुखी अन् आनंदी जीव या जगांत कोण आहे बरं ? ”

“ कुसुम ! लाडक्या जीवा ! खरंच का ग तूं इतकी सुखी होशील ? माझी झाल्यानें तुला खरंच का इतकं सुख होणार आहे ? खरं का हें कुसुम ? ”

“ खरंच गडे ! आपण माझे झाल्यानं अन् मी आपली– कायमची– आपली झाल्यानं– मी अत्यंत सुखी होईन ! या वेळींच पाह्यचं मी किती सुखांत आहे ती ! नाथ ! आपण सुखी असायचं का ? ”

“ लाडके ! तूं– माझी कुसुम– माझं नाजूक फूल– सुखांत असल्यावर माझ्या सुखाला काय तोटा बरं ? ”

“ पण यांतनं आपल्या प्रथम पत्नीला का बरं वगळायचं ? आपण तिघेजणं एकदम सुखी होऊं या गडे ! चलायचं, मला आपल्या पत्नीची ओळख करून द्यावी. एकमेकांच्या संगतींत आपण तिघेजणं दिव्य अशा आनंदाचें साम्राज्य स्थापन करूं या गडे ! ”

“ आपण तिघेजणच कां बरं कुसुम ? आपल्याला मुलंबाळं नाहीं का होणार ? माझी इंदु– तुला सांगायला मला लाज नाहीं वाटत बरं !– लव-करच सुमाता होणार आहे ! लाडके ! आपल्या सुखाचे वांटेकरी तिघेजणच नसून, थोडया दिवसांनीं चौघेजण होणार आहेत बरं का ! या सर्वांना आनंद देण्याइतकं आपलं सौख्य अमर्याद आहे ना ग ? ”

"आपल्या सुखाच्या सावलींत जितके जीव येतील, तितक्या सर्वांना सुख कसं देतां येईल, हा एकच विचार माझ्या आयुष्यांत मी प्रथम करीत जाईन ! आपल्या प्रेमासाठीं मला इतकं नाहीं का करतां यायचं ? जगात आनंद नाहीं म्हणतात ! जग हें आनंदाचें साम्राज्य आहे ! दिव्याचें नंदनवन आहे ! अन् तसें तें आहे, हें साऱ्या जगाला दाखविण्यासाठीं आपला जन्म आहे, असंच ना गडे ?

"होय, लाडके ! त्याप्रमाणेंच, आपण– म्हणजे तूं, मी, माझी इंदु आणि तिच्या पोटीं लवकरच जन्मास येणारा भावी जीव– या जगाला असें दाखवून देऊं या कीं, आनंद, शांति, समाधान या दिव्य भावना अनुभवणं माणसाच्या मनावर अवलंबून आहे ! त्यांचा परिस्थितीच्या गळफांसांनीं कधींही कोंडमारा होणार नाहीं ! सामाजिक बंधनांनीं किंवा धर्म, रूढी, कायदे यांच्या निर्दय आणि निरुपयोगी गळफांसांनीं ह्या दिव्य भावनांचे हातपाय बांधता येणार नाहींत, किंवा त्याची निर्दयपणें गळेचेपही करता येणार नाहीं !"

"पण आपल्याला मी विचारतें –रागावूं नये गडे !– कीं अनेक पत्नीत्वाची चाल समाजाला फायद्याची आहे का ?"

"माझं म्हणणं असं आहे कीं, ज्याप्रमाणें स्त्रीनें एका वेळीं एक पती करणं योग्य आहे, त्याप्रमाणें पुरुषानेंही एका वेळीं एकाच स्त्रीशीं लग्न करणं रास्त आणि समाजदृष्टया हितकारक आहे, यात मुळींच संशय नाहीं ! यापासून समाजाचा फायदा आहे, आणि यामुळेंच समाजाची सर्वांगीण उन्नति होऊन, समाजाचें अंतिम ध्येय जें व्यक्तिस्वातंत्र्य आणि व्यक्तिसुख, तें समाजाला त्यांतल्या प्रत्येक व्यक्तीला मिळवून देतां येणार आहे ! केवळ विषयवासनेच्या तृप्तीसाठीं, फुलपांखरूं एका फुलावरून दुसऱ्या फुलावर मधुपानासाठीं उडत जातें, त्याप्रमाणें एकापेक्षां अधिक बायका एकाच वेळीं पुरुषानें कधींही करूं नयेत ! परंतु, नियमाला अपवाद, त्याप्रमाणें विशिष्ट परिस्थितींत, एकापेक्षां अधिक बायका एकाच वेळीं करायला समाजानें प्रत्येक पुरुषाला मोकळीक दिली पाहिजे ! त्याचप्रमाणें तसेंच कारण असेल, तर स्त्रीलाही एक नवरा मेल्यावर दुसरा करण्याची तर असोच, पण एक नवरा जिवंत असतां दुसरा करण्याचीही मुभा समाजानें ठेविली

पाहिजे! यासाठीं, समाजांत योग्य कारणाकरिता काडीमोड करण्याची पद्धत रूढ झाली पाहिजे! पण याचा उपयोग अगदीं निरुपाय म्हणून करायचा! वाटेल तेव्हां आणि मन मानेल तसें प्रत्येकानें विवाहसौख्य भोगावें, आणि विनाबंधन आयुष्य वैषयिक सुखसेवनांत घालवावें, असा मात्र यापासून कोणीही निष्कर्ष काढूं नये!

जगांत अशा अनेक अपरिहार्य परिस्थिति उत्पन्न होतात कीं, त्या वेळीं अमुक एक नियम लागू करणें, अगदीं अशक्य असतें! अशा वेळीं परिस्थितीला योग्य होईल, समाजाला, आपल्या अब्रूला, ज्यामुळें धोका बसणार नाहीं, व्यक्तिस्वातंत्र्याच्या जी आड येणार नाहीं आणि व्यक्तीचें व्यक्तित्व ज्यामुळें नष्ट होणार नाहीं, अशा प्रकारची लवचिक (Flexible) नियमनपद्धति समाजात रूढ करणें, समाजाच्या हिताच्या दृष्टीनें अत्यंत इष्ट आहे. अशा या नियमनपद्धतीमुळें समाज ढांसळून तर पडणार नाहींच; परंतु उलट, त्याची फार झपाट्यानें वाढ होऊन, त्याच्या घटकावयवाला, अर्थात् प्रत्येक व्यक्तीला, आपला स्वतःचा शारीरिक, आधिभौतिक, मानसिक, नैतिक, अध्यात्मिक वगैरे सर्वांगीण विकास करावयाला वाव मिळून, त्याची झपाझप प्रगति होईल, यात तिळमात्र संदेह नाहीं!"

कुसुम कुमारांच्या या वक्तृत्वओघात इतकी गुंग होऊन गेली होती कीं, त्यांच्याकडे सारखी टक लावून पहात राहिल्यामुळें तिला आपल्या स्वतःचा आणि जगाचा पूर्ण विसर पडला! कुमारांचें भाषण संपलें, तशी कोठें ती भानावर आली! पण आपल्या मनःस्थितीची कुमारांना द लागूं नये, म्हणून ती ताबडतोब म्हणाली—

"मग आपल्या इन्दुताईची मला केव्हा द्यायची ओळख करून!"

"देईन बरं, लौकरच."

असें म्हणून कुमार हंसले; कुसुमही हंसली. त्या हास्यांत शाश्वत समाधानाची दिव्य शांतता दृग्गोचर होत होती!

थोड्या वेळानें कुमार कुसुमला घेऊन टेंकडीच्या खालीं आले; त्यावेळीं पाय घसरून कुसुम किती वेळां तरी खालीं पडत असतांना कुमार तिला आपल्या हातांनीं सांवरीत होते! त्यावेळच्या त्यांच्या स्पर्शसुखाच्या संवेदना

कुसुमच्या हृत्पटावर – प्रातःकालीन किंवा सायंकालीन सांध्यछटा गगनपटांत विरून जाव्या, त्याप्रमाणें पूर्णपणें आणि कायमच्या कोरल्या गेल्या असल्यास त्यात नवल करण्यासारखें कांहीं आहे का!

कुमारांनीं कुसुमला 'लेडीज् रोसिडेन्सी'च्या 'गेटा'कडे सोडलें, आणि ते परत आपल्या घरी गेले!

ध्येयाची पूर्तता झाल्यावर ध्येयवादी मनाला जो सात्त्विक आणि शुद्ध आनंद उपभोगतां येतो, तशा प्रकारचा दिव्य आनंद त्यांचें ध्येयवादी मन आज उपभोगीत होतें! जड अशा जगांतही दिव्याचें नंदनवन निर्माण करता येणं शक्य आहे, अशी त्याच्या मनाची खात्री झाली!

## कुंज १३ वा.

विद्युत्प्रकाशाच्या नाजूक प्रेमस्पर्शानें आकाशसुंदरीचें हळुवार अंतःकरण अत्यंत नाजूक अशा प्रीतिभावनांच्या मेघांनीं भरून आलें म्हणजे, त्या भावनांचा भार असह्य होऊन, अपरिचित, अनोळखी अशा भूदेवीजवळ आपलें हृदय उघडें करीत असताना, तिच्या डोळ्यांतून वाहणारा आनंदाचा पूर त्या अनोळखी हृदयातही प्रेमळ प्रसन्नता उत्पन्न करीत असतो ! त्याप्रमाणें कुमाराच्या अत्यंत सुखकर आणि प्रेमळ सहवासानें, कुसुमच्या अंतःकरणात उदय पावलेले व नाजूक खळबळ उत्पन्न करणारे मधुर भाव बाहेर पडण्यासाटीं धडपड करीत असतांना, तिच्या डोळ्यांत ठिबकत असलेले आनंदाश्रु, भोंवतालचें अनोळखी वातावरणही प्रेमाच्या नाजूकतेनें भरून टाकीत होते ! आपण अनुभवित असलेला अननुभूत असा आनंद आपल्या रोशनला केव्हां एकदां आपण सागून टाकतों, असें कुसुमच्या आनंदी मनाला झालें होतें ! त्यामुळें ती जी आली, ती एकदम रोशनच्या खोलींत गेली !

आज कुमार कुसुम एकमेकांशीं बोलण्याचा प्रयत्न करतील, ही रोशनलाही साधारण कल्पना होतीच; त्यामुळें आपल्याला त्यांतलें कांहींच माहीत नाहीं, अशा प्रकारची मुद्रा मुद्दाम धारण करून ती अगदीं स्वस्थ बसली होती !

लहान मूल काहींतरी कौतुकास्पद अशी करणी करीत असलें, म्हणजे आपल्या आईनें तें पाहून त्याचें कौतुक करावें, अशी त्याच्या मनाची इच्छा असते. परंतु तशा प्रकारचें वर्तन आईच्या हातून घडलें नाहीं, म्हणजे तें हिरमुसलें होतें आणि नाइलाज म्हणून आईचें तिकडे लक्ष ओढण्यासाठीं धडपडत असतें ! त्याप्रमाणें आपली आनंदी धडपड रोशनच्या मनाला कळावी, आणि तिनें त्याविषयीं आपल्याला आपण होऊन विचारावें, यासाटीं तिनें पुष्कळ प्रयत्न करून पाहिले ! शेवटीं कंटाळून कुसुम रोशनला म्हणाली—

" का ग, रोशन ! असं काय बरं करत्येस ग ? आजच अगदीं मूक-स्तंभासारखी कां ग तूं अशी ? माझ्याशीं बोलायचं नाहीं का ? अशी अबोल किती ग वेळ राहणार आहेस तूं ? बोलना गडे माझ्याशीं, बोलना रोशन ! तूं आतां जितकं म्हणून बोलत राहशील, तितकं मला थोडंच आहे बरं; तूं आपण होऊन नाहीं बोललीस बरं का, तर मी तुझ्याशीं पुन्हां कध्धीं–कध्धीं नाही बोलायची, समजलीस ना ? नेहमीं अगदीं भाटासारखी बडबडत असतेस्, अन् आजच काय ग हें असं ?"

" मी काय बोलूं ग ? खरं म्हटलं तर तूंच प्रथम बोलावंस नाहीं का ? कुमारांकडून इतका वेळपर्यंत इतकं कांहीं ऐकलं सवरलं असशील, तें सारं टाक कीं बोलून ! तुला कुमारांनी इतकं काय ग सांगितलं, कुसुम ? लक्षांत आहे का ग ? कीं त्यांच्या मुखांतून स्रवणारं शब्दामृत ऐकण्यासाठीं जी सारखी बघत बसलीस त्यांच्या तोंडाकडे, ती तें सारें लक्षांत ठेवायला तुझं लक्षच नव्हतं ठिकाणावर ? असं तर नाही ना ग झालं ? मग सांग कीं सगळं काय काय ऐकलंस तूं तें ! हो पण मी चुकलेंच बरं का अगदीं ! प्रियकरानं आपल्या प्रणयिनीकडे बोललेले प्रीतीचे बोल तिसऱ्याला सांगायचे नसतात, आणि ते कुणीं तिसऱ्यानं ऐकायचेही नसतात ! खरं ना ग हें ? अगदींच मी विसरून गेलें बरं का हें ! मी नाहीं बाई तुला तें विचारीत बरं ! "

" रोशन ! नको गडे, मला असा त्रास देऊं तूं आतां ! विचार ना मला ! "

" काय विचारूं ग ? "

" असं काय ग, रोशन करतेस तूं ? "

असें म्हणून कुसुम रोशनला मिठी मारून रडूं लागली. रोशनला त्या स्पर्शानेंच कुसुमच्या अंत:करणाचा भावनावेग कळून आला. त्यामुळें कुसुमला अधिक वेळ त्रास न देतां ती तिच्या तोंडावरून हात फिरवून म्हणाली–

" कुसुम ! तूं आतां पूर्ण सुखी आहेस ना ग ? "

" रोशन ! माझ्या सुखाचा आतां स्वर्गांतल्या अप्सरासुद्धां हेवा करतील ग ! स्वर्ग, स्वर्ग म्हणजे ग आणखी तो काय असतो ? या मर्त्य जगांत जिवंत माणसालासुद्धां स्वर्गप्राप्ति होणं शक्य आहे, बरं का रोशन ! मला

अजूनपर्यंत हें खरं वाटत नसे, पण मी तुला प्रत्यक्ष अनुभवावरून सांगतें कीं, स्वर्गसुख या अपूर्ण जगांत माणसाला मिळूं शकतं ! मरणानंतर स्वर्ग मिळविण्यापेक्षां, जिवंतपणीं असा स्वर्ग गांठणें म्हणजे या जड देहानं निसर्गावर मिळविलेला विजयच नव्हे का ? स्वर्ग किंवा नरक, या जगांत जिवंतपणीं उत्पन्न करणं, माणसाच्या मनावर आहे ! स्वर्गसुख मिळवायला, स्वर्गात जायला नको ! किंवा नरकयातना भोगायला, नरकांत पडायला नको ! नरक आणि स्वर्ग या मरणोत्तर अनुभवास येणाऱ्या अवस्था नसून, जितेपणींच त्याचा अनुभव प्रत्येक जीवाला घेतां येणं शक्य आहे बरं, रोशन !

अकारण किंवा सकारण अंतःकरणाची कळी कुस्करून टाकणारे किडे ज्या चिखलात उत्पन्न होतात तो नरक ! आणि समाधानी आनंदाचें साम्राज्य पसरणारा देवदूत ज्या ठिकाणीं वास्तव्य करितो तो स्वर्ग ! तेंच दिव्याचें नंदनवन ! जग हें अपूर्ण असल्यामुळं, अज्ञानामुळं देहाच्या विश्वात भरून उरलेल्या मनाच्या चैतन्याचें तेज आंधळ्या डोळ्यांना दिसत नाहीं; आणि या अज्ञानजन्य अंधत्वामुळं, चिखलांत पाय रुतले म्हणजे माणसाला जग हा नरक आहे, असें वाटूं लागतें ! डबक्यांत किडे असतात, त्याप्रमाणें अत्यंत सुंदर अशा कमलिनीही असतात ! डोळे मिटून चांचपडताना पायाजवळ किडे लिवलिवताहेत, म्हणून रडत बसायचं, अन् डोळे उघडे ठेवून पाहिल्यास सहज दिसणाऱ्या सुंदर कमळांकडे पाठ फिरवायची, अशी विलक्षण तऱ्हेची मानवी मनाची घडण आहे.

प्रत्येकजण बाहेरच्या शारीरिक भपक्याकडे अगोदर पहातो, अंतःकरणाचा विचार मागाहून किंवा समुद्रांतले खडक डोळ्याना प्रथम दिसतात, आंतलीं रत्नें नंतर, त्याप्रमाणें जगातल्या डबक्यातल्या नरककिड्यांना प्रथम पाहून मन भयभीत होतें ! त्यातल्या स्वर्गाच्या अस्तित्वाची कल्पनाही त्याला असत नाहीं !

घाणीनं सांचलेल्या डबक्यांत किडेच जिकडे तिकडे दिसायचे, कमळं थोडींच, बहुतेक नाहींच; त्याप्रमाणं नीच वृत्तींच्या माणसांनीं गजबजलेल्या या जगांत नरकाची घाणच प्रथम नाकांत शिरते ! स्वर्गातील दिव्य सुगं-

धानं दरवळणारी वायुलहर त्याच्या हृदयाला दिसत नाहीं, अन् दिसलीच, तर ती त्याच्या हृदयाला शांत करूं शकत नाहीं !

डोळ्यांना ज्या तऱ्हेचा चष्मा लावावा त्या प्रकारचा रंग भोंवतालच्या वातावरणावर पडलेला दिसतो ! त्याचा खरा रंग चष्मा काढून ठेवला तरच डोळ्याना कळून येईल, एरवीं नाहीं ! त्याप्रमाणं, मन ज्या दृष्टीनं विचार करतं, त्या विचार करण्याच्या मनाच्या मांडणीवर जीव जगाला नरक किंवा स्वर्ग बनवित असतो; आणि एकदां त्यानं जगाला स्वर्ग किंवा नरक बनविला, म्हणजे त्याच्या त्या ठरल्या मतांत आणि दृष्टींत त्या मताच्या किंवा दृष्टीच्या उलट येणाऱ्या जगांतल्या अनुभवानंही त्याला फरक करतां येत नाहीं !

माझीही आज अशीच स्थिति झाली आहे. त्यांच्या—माझ्या कुमारांच्या—दिव्यतम अशा सहवासानं जगातला स्वर्ग मी पाहूं शकलें. माणसाला माणसाची गरज लागते, रोशन ! का ? का लागते ग ?—तर दुःखाच्या भेसूर छायेमुळं डोळ्याना नरक भासणाऱ्या जगातला नसता नरक नाहींसा करून त्यातल्या स्वर्गाचं दिव्यत्व—दिव्याच्या नंदनवनाचं अस्तित्व— अंतःकरणाला कुणीं तरी पटवावं म्हणून बरं !

एकलकोंडें आयुष्य म्हणजे मरणाच्या मसणवटीची वाट दाखविणारा वाटाड्याच होय ! असलें दुर्दैवी आयुष्य एकटें कधींच असत नाहीं तर त्याच्या जोडीला निराशा, दुःख, अपमान आणि नसती हुरहूर, हीं—तुटलेल्या अन् खोल अशा दरीचा भयानकपणा वाढवायला भयाण अंधःकार, अति तीक्ष्ण काटे, प्रचंड वारा आणि क्रूर श्वापदं खाऊन टाकतील कीं काय ही काळजी, हीं अगदीं जशीं तयार असतात—त्याप्रमाणें आयुष्याचा कडवटपणा जास्त प्रमाणात वाढवायला एकजुटीनं धडपडत असलेलीं दृष्टीस पडतात !

अशा निराशेच्या ढगांनीं अंतःकरण काळवंडून गेलं असतां, वायुलहर आपल्या मंजूळ हास्यानं अभ्रपटल एका क्षणात नाहींसं करून टाकून आकाशाला उजाळा देतें, तद्वत् हृदयाकाशाला व्यापून टाकणारं निराशेचं अभ्रपटल, आपल्या अंतरंगीच्या संगीत नादमाधुर्याच्या वायुलहरींनीं नाहीसं करून, मनाला शांतिसुखाची जोड मिळवून देणाऱ्या अंतःकरणासाठीं

जीव तळमळत असतो ! अशा वेळीं, अशा अंतःकरणाची त्याला जोड मिळाली नाहीं, तर तो हातभागी जीव जीवाचं बरंवाईट करायलाही मागं पुढं पहात नाहीं !

रोशन ! माझ्या अंतःकरणाची इतके दिवस अशीच तळमळ तळमळ चालली होती ! अन् तें आता सांगितल्याप्रमाणं, सुखासमाधानाची जोड मिळवून देणाऱ्या हृदयाच्या शोधांत होतें ! दिव्याच्या नंदनवनांत बागडणाऱ्या फुलपांखरामागें माझं हृदय धांवत होतं ! त्याच्या सुदैवानं त्याला पाहिजे त्यापेक्षां अधिक उदात्त हृदय कुमाराच्या स्वरूपांत मिळालं ! माझ्या प्रेमाच्या फुलपांखराचा मला आज लाभ झाला ! मग तें आनंदानं कां बरं आता नाचूं लागणार नाहीं ? रोशन, या जगात इतकं सुख मिळूं शकतं याची कल्पनासुद्धा नव्हती ग मला ! माझ्या सुखाचा स्वर्गलोकच्या देवादिकाना सुद्धा हेवा वाटूं लागायचा बरं !

रोशन ! माझ्या हृदयाचा आनंद मी कुणाला अन् कसा दाखवूं ग ? तूं माझी एक जिवाभावाची मैत्रीण ! पण या माझ्या जिवलग मैत्रिणीला माझा आनंद बोलून दाखवूनही, माझ्या आनंदी मनाचं समाधान नाहीं ग होत, रोशन ! त्याला मी काय करूं ?

रोशन ! लाजबीज सारी बाजूला सारून मी बोलतें त्याची क्षमा कर गडे ! ही कुसुम बोलत नसून, तिच्या अंतःकरणांतला अंतिम आनंद बोलत आहे बरं रोशन ! माझे कुमार—होय ग ! माझेच आहेत ते !—किती ग गुणी आहेत ते ! अशानं माझीच दृष्ट लागायची ग त्यांना ! पण इतकं कळत असूनही, डोळे उघडे ठेवून त्याच्या त्या गुणी मूर्तीकडे डोळे भरून पहावंसंच् मला वाटतंय् ! रोशन, स्वतःच्या माणसाला स्वतःचीच दृष्ट लागते का ग ? "—

इतकें बोलून कुसुम कुमारांची मूर्ति पहाण्यासाठीं डोळ्यात प्राण आणून दशदिशांना पाहूं लागली ! हें पाहून रोशनला तिच्या त्या दीन स्थितीची कीव आली ! आणि ती कुसुमला म्हणाली—

" कुसुम ! काय ग असं वेड्यासारखं करतेस ? इथं का तुझे कुमार आहेत ? इथं तुला मी मात्र दिसेन ! दुसरं कोण बरं दिसणार आहे ग ? "

" रोशन ! मला जाऊन जरा स्वस्थ पडूं दे ना ग ! माझ्या कुमारांची

मूर्ति आतां इथं माझ्या या फुटक्या डोळ्याना दिसली नाहीं, तरी अंतःकरणांत नाचणारी त्यांची हंसरी मूर्ति मला माझ्या दिव्य अंतर्दृष्टीला दिसत आहे; ती मला घटका, घटका सारखी पाहात राहूं दे ना ग !

त्यांनीं आपल्या मुखांनीं आपलं प्रेम माझ्यावर—या त्यांच्या—हो, त्यांच्याच बरं रोशन—त्यांच्या कुसुमवर—असल्याचं सांगितल्या वेळेपासून रोशन, माझं अंतःकरण त्यांच्याशी बोलत राहण्यासाठीं—मूक प्रीतीचे अबोल बोल बोलत राहण्यासाठीं—नव्हे !—मुळींच न बोलता त्याच्या उदात्त अंतःकरणावर मान टेंकून त्यांच्या मनाचं शोधन करण्यासाठीं—कसं अगदीं उत्सुक अन् उतावीळ झालंय् ग ! रोशन, जाते गडे, मी आतां माझ्या खोलींत ! क्षमा कर हं मला ! करशील ना रोशन ?"

परंतु रोशनचें उत्तर ऐकावयाला कुसुम तेथें होती कोठें ? भावनावेग अत्यंत तीव्र झाल्यामुळें, तिने एकदम जाऊन आपल्या पलंगावर अंग टाकलें ! आणि बिछान्यांतल्या उशीला अंतःकरण भिडवून तिनें तिचे पटापट मुके घेतले !

' पण कुमारांच्या दिव्य प्रेमाने व्याकूळ झालेल्या तिच्या हृदयाचें यापेक्षां अधिक आविष्करण करण्याच्या भानगडींत आमच्यासारख्या तिऱ्हाइतानें पडूं नये हेंच बरें !

* * *

दुसऱ्या दिवशीं साधारण संध्याकाळचे पाच सहाचे सुमारास वसंत, गजरेला — त्या शाळेतल्या मुलीला — व ज्याच्यामुळें त्याला शाळा सोडावी लागली त्या मुलाला — विनायकाला — घेऊन नंदकुमारांच्या घरीं आला.

विनायकाला तेथें घेऊन येण्याची तजवीज गजरेकडून वसंतानें अगोदरच केली होती. या बाबतींत कुमारांनीं वसंताला असें स्पष्ट कळविलें कीं, विनायक आपल्या बाजूने साक्ष देण्यास तयार झाल्याशिवाय आपल्याला कोर्टाच्या कामांत यश येणार नाही ! विनायकाला आपल्या बाजूला वळवून घ्यावयाला एक गजराच समर्थ आहे, हें वसंताला गजरेकडूनच समजून आल्यावर, त्यानें तिला विनायकाची एकांतीं भेट घेऊन त्याला आपल्या बाजूस वळविण्याचा आग्रह केला. त्याप्रमाणें गजरेनें आपली

कामगिरी आपल्या प्रेमाच्या शिताफीनें योग्य रीतीनें बजावली. यासंबंधीं कुमारांचें आणि वसंताचें असें ठरलें कीं, खरोखरच विनायक हा हाडाचा वाईट नसेल, तर त्याला गजरेला सांगून चांगल्या मार्गावर प्रथम आणावयाचा, आणि त्याचें गजरेवर मनापासून प्रेम असेल, तर गजरेशीं त्याचें लग्न लावून त्याला सुखी करावयाचा. गजरासुद्धां या विचाराला कबूल झाली. कारण तिला माहीत होतें कीं, विनायकाचें आपल्यावर मनापासून प्रेम आहे. या प्रेमाच्या मोहिनीनें आपण त्याला नीट ताळ्यावर आणूं. शिवाय अशी आपण कुमारांना कोर्टाच्या कामात मदत केली, तर वसंतरावांसारख्या सच्छील माणसाच्या चारित्र्यावर जो निष्कारण शिंतोडा पडला होता, तोही नाहींसा होणार होता!— या सर्व कारणामुळें, गजरा विनायकाशीं लग्न लावण्यास वर सांगितल्याप्रमाणें कबूल झाली! विनायक तर एका पायावरच तयार होता!

या सर्व योजनेमुळें आपल्या कामात आपल्याला हटकून यश येईल, असा कुमारांना भरंवसा वाटूं लागला. त्यामुळें विनायक व गजरा यांना आलेलीं पाहून त्याना अतिशय आनंद झाला, आणि त्या आनंदांत ते विनायकाला म्हणाले—

"काय रे बुवा! विनायक, तूं कोर्टांत सगळी खरी हकिकत सांगायला तयार होशील का?"

"होय वकीलसाहेब! मला खरी हकीकत सांगायला काय हरकत आहे! खरं म्हटलं तर वसंतरावांना शाळेंतून काढून टाकायला मीच कारण झालों ना! खरीखुरी हकिकत जर मी माझ्या वडिलांना सांगितली असती, तर असा प्रसंगच आला नसता. परंतु मी तसं केलं असतं, तर उलट मलाच त्यांनीं चांगला सडकून काढला असता; म्हणून मी त्यावेळीं रागाच्या भरांत आईच्याकडून खोटं कांहींतरी सांगितलं, आणि त्याचा परिणाम हा असा झाला. पण गजरा जर माझ्याशीं विवाह करण्यास तयार असेल, तर सगळी खरी हकिकत कोर्टासमोर सांगायला मी अगदीं तयार आहें."

"पण ऐनवेळीं तूं उलट तर फिरणार नाहींस ना! नाहींतर आम्हां-

नंदनवनांत

लाच उलट फशीं पाडशील ! काय रे, काय तो आपला पुरा विचार कर." कुमार म्हणाले.

" वकीलसाहेब ! मी इतका का नीच मनाचा आहें ! एखाद्या मुलीला एखादं पत्र पाठवलं, म्हणजे माणूस खरोखरच का मनाचा वाईट होतो ! मला संगत वाईट लागली, वडिलांचं माझ्यावर लक्ष राहिलं नाहीं, या सगळ्या कारणांमुळं मी अशा तऱ्हेचा माणूस बनलों. तशी माझ्यावर वडिलांची देखरेख असती व घाणेरडीं व्यसनें लागायला मला संगतच वाईट मिळाली नसती, तर मी सुद्धां आपणाला वाटतों तितका वाईट झालों नसतों. माणसाच्या परिस्थितीकडे कोणींच लक्ष देत नाहीं, साहेब ! त्यामुळें चांगलीं मुलें सुद्धां वाईट मार्गाला लागलेलीं दृष्टीस पडतात ! यापुढं मात्र मी माझं वर्तन पुष्कळच सुधारीन, इतकंच नव्हे, तर कांहीं दिवसांनीं हा विनायक या मुलीच्या सहवासांत अगदीं निराळाच माणूस झालेला दिसून येईल, वकीलसाहेब ! मी म्हणतों तें खोटं कीं खरं, तें तुम्हांला लवकरच दिसून येईल बरं ! "

विनायक हें सर्व अगदीं मनापासून बोलत होता. कुमार व वसंत याची विनायकाच्या बोलण्याबद्दल खात्री पटली व त्यांनीं त्याला कोर्टांत कशी कशी जबानी द्यावयाची, उलट जबानींत काय काय सागावयाचें व शेवटीं खरोखर खरी जी हकिकत असेल ती, न भितां न डगमतां कोर्टाला सागून कशी टाकावयाची, तें सर्व सांगितलें.

खऱ्याला कधींही मरण नाहीं. खऱ्या माणसाचा अखेर जय होणारच. जगांत चांगल्या रीतीने वागल्यापासून आपला तोटा न होतां, उलट फायदाच होतो ! आता यावेळीं तूं सत्यानं वागण्यास कबूल झालास, म्हणून तर तुला गजरेसारखी सुशील, शिकलेली पत्नी लाभणार आहे. तेव्हा यापुढें केव्हांही जगात सत्याला स्मरून, पापाला भिऊन, वागण्याचा तूं निश्चय केलास, तर तुला अंतीं फायदा झाल्याशिवाय रहाणार नाहीं. व्यावहारीक दृष्टीनें कदाचित् फायदा झाला नाहीं, तरी अशा वागण्यानें मनाला जें समाधान प्राप्त होतें, त्यामुळें आयुष्यांत आलेल्या संकटांशीं टक्कर द्यायला मन पूर्ण तयार होतें, वगैरे प्रकारचा उपदेश विनायकाला करून मग ते गजरेकडे वळले. त्यांनीं तिला माहीत अस-

लेली सगळी खरी हकिकत सांगण्यास सांगितलें. विनायकानें व तिनें सांगितलेल्या हकिकतींत मुळींच फरक नाहीं, अशी मनाची खात्री झाल्यामुळें कुमारांना त्याच्या सत्याविषयीं मुळींच संशय उरला नाहीं. नंतर त्यांनीं तिलाही कोर्टापुढें काय काय सांगावयाचें, तें स्पष्ट सांगून त्या दोघांना घरीं जावयास सांगितलें. नंतर कुमार व वसंत बराच वेळपर्यंत या 'केस' विषयीं बोलत बसले होते. शेवटीं कुमार वसंताला म्हणाले—

" बघ वसंत ! या गजरेमुळें हा विनायक आपल्या बापाच्याही विरुद्ध साक्ष द्यायला तयार झाला आहे बरं ! नाहीं तर, तो अशा रीतीनें आणि इतक्या लवकर आपल्या बाजूला वळून, आपल्यासारखें सांगण्यास तयार होईल, असें मला तरी वाटलें नव्हतें. प्रेमाचा प्रभाव हा असा आहे ! प्रेमामुळें जग चाललें आहे ! एक प्रेम तेवढें जगांतून नाहींसें होऊं दे आणि बघ, सुंदर असें वाटणारें हें जग सहारा वाळवंटासारखें रुक्ष आणि भयाण वाटूं लागेल ! प्रेम ही भावना साऱ्या चराचराच्या हृदयांत, दिव्य असें मूकसंगीत गाऊन अवर्णनीय असें वातावरण उत्पन्न करीत असतें. त्यामुळें प्रत्येक माणूस, मग तो लहान असो थोर असो, स्त्री असो अगर पुरुष असो, या प्रेमसंगीतानें भारून जाऊन त्याचा दास बनून राहतो ! ही भावना मानवाबाहेरचे प्राणी जे पशुपक्षी, वनस्पति, नदीनाले, सागर वगैरे निसर्गांतही दृष्टोत्पत्तीस येते ! अशा दिव्य प्रेमाच्या मोहनजादूनें हा सारा विश्वपसारा गुंग होऊन गेल्यामुळें, डोळयाला व अंतःकरणाला कुरूपांतही सौंदर्य दिसूं लागतें, आणि दुःखाच्या भारानें जड झालेल्या मनांत, तात्पुरतें का होईना आनंद, शांति आणि उत्साह यांचें दिव्य तेज खेळूं लागतें. वसंत, तुला मी हें सांगायला नकोच ! प्रेमाचा प्रभाव वर्णन करून सांगण्याची जरुरी नाहीं. प्रत्येकाला आयुष्यात एकदां तरी याचा अनुभव येतोच येतो ! दिव्याच्या नंदनवनांत विहार करण्यासाठीं जगांतला प्रत्येक जीव धडपडत असतो हें सांगण्याची जरुरी नाहीं !

" कुमार ! तूं म्हणतोस तें अगदीं बरोबर आहे ! न सांगतां न शिकवतां ज्या भावभावनांचें अंतःकरणाच्या अंतर्भागाला ज्ञान होतें, त्यांपैकीं प्रेम ही अत्यंत प्रभावशाली, त्याप्रमाणेंच अत्यंत नाजूक व दिव्य अशी

भावना आहे ! ती कोणाला सांगून समजायची नाहीं आणि समजून सांगतांही यावयाची नाहीं. ''

" अनादि अनंत असें जें चराचर सृष्टींत भरून उरलेलें दिव्य चैतन्य, त्या दिव्य चैतन्याच्या अंतःकरणांतून मनाच्या तन्मयतेंत स्रवणारें दिव्य काव्यसंगीत, म्हणजेच या जगांत यच्चयावत् प्राणीमात्राच्या अंतःकरणामधून मनाच्या अंतिम आनंदाच्या अवस्थेंत दृग्गोचर होणारें प्रेम होय, नाहीं का रे वसंत ! '' –

एवढें बोलून कुमारांनीं प्रेमावरचें भाष्य पुरें केलें.

## कुंज १४ वा.

संध्याकाळचा साधारण सहाचा सुमार झाला होता. विमल घरांतल्या कामांत गढून गेली होती. रमावहिनी, त्याच्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें देवळांत कीर्तन ऐकण्यासाठीं गेल्या होत्या. बरोबर याच वेळीं बहुतेक नेहमीं वसंत विमलकडे येत असे. परंतु अजूनही त्याचा पत्ता नाहीं, असें पाहून विमलच्या नाजूक मनाला वाईट वाटलें. तिच्या करपल्या मनाला वसंतच्या प्रेमळ सहवासांत—दुःखी जीवाला गाढ झोपेंत आपल्या दुःखाचा तात्काळ विसर पडतो, तसा—आपल्या दुर्दैवी जीविताचा विसर पडत असे! त्याच्या गोड भाषणानें आणि प्रेमळ व सहानुभूतिपूर्ण वागणुकीनें—कडक उन्हाच्या तापानें सुकून कोमेजून गेलेल्या फुलझाडांच्या पानांना, भरपूर पाणी मिळाल्यामुळें ज्याप्रमाणें नाजूक टवटवीतपणा प्राप्त होतो, तद्वत् तिच्या निष्प्रेम हृदयाला ताजेंतवानें झाल्यासारखें होऊन, आपल्या रुक्ष जीवनाच्या वाळवंटांत नाजूक रमणीयतेची हिरवळ उगवल्यासारखें वाटत असे!

वसंतरावांना यावयाला वेळ लागलेला पाहून, तिच्या हृदयाची तळमळ तळमळ चालली होती; त्यामुळें तिचें कामाकडे लक्ष लागेना. म्हणून ती थोडावेळ हृदयाला विश्रांति मिळावी, या हेतूनें बिछान्यावर जाऊन पडली. तसें पाहिलें तर, ही वेळ कांहीं बिछान्यावर लोळत पडण्याची नव्हती. परंतु प्रेमाचा प्रभावच असा अजब आहे की, अगदीं महत्त्वाच्या कामांत गुंतलेलें मनसुद्धां, प्रेमाच्या नाजूक विचारानें घेतल्या कामाकडे दुर्लक्ष करून, मिनिटभर तरी,—वायुलहरीनें जलवंतीच्या मुखावर प्रीतीचे तरंग उठविले, तरी तिचें अंतर्हृदय ज्याप्रमाणें प्रीतीच्या मोहनजादूनें गुंग होऊन स्तब्ध राहातें, त्याप्रमाणें या नाजूक स्तब्धतेचें सुख अनुभवण्यासाठीं धडपडत असतें!

विमल बिछान्यावर पडली आणि इतक्यांत वसंत तेथें आला. आला तो तडक आंत सैंपाकघरांत गेला. पण विमल तेथें दृष्टीस न पडल्यामुळें,

तो जरा बिचकल्यासारखा झाला ! तरी, ती दुसरीकडे कोठें तरी असेल, या आशेनें तो तिच्या खोलीकडे गेला. दारांतून आंत पहातो, तों विमल बिछान्यावर डोकें टेकून पडली आहे असें पाहून त्याच्या मनाला अतिशय वाईट वाटलें आणि तो तिच्या अगदीं जवळ गेला. जरा वेळ त्यानें वाट पाहिली; परंतु विमल अगदीं स्वस्थ पडलेली पाहून, त्यानें तिच्या हाताला हळूच स्पर्श केला ! दंवबिंदूंचा स्पर्श होताच फुलवेलीला जो आनंद होतो, तसा आनंद तिच्या अंतःकरणाला त्या स्पर्शानें झाला ! तरी तिनें वर डोकें केलें नाहीं. याचें कारण काय तें सांगितलें पाहिजेच का ? — तो स्पर्श आपल्या आवडत्या माणसाच्या हातचा आहे, हें तिला त्या स्पर्शाच्या मधुर संवेदना उत्पन्न करणाऱ्या नाजूक मोहनीमुळें तात्काळ कळून चुकलें ! तरी तें स्पर्शसुख बराच वेळ अनुभवता यावें म्हणून किंवा तशाच प्रकारचें स्पर्शसौख्य आपल्या मुखागालाला मिळावें म्हणून असेल कदाचित्, ती तशीच स्तब्ध पडून राहिली.

ध्वनियंत्राच्या साहाय्यानें दुसऱ्या दोन माणसांचीं संभाषणें, एका बाजूनें मुखाचा व दुसऱ्या बाजूनें कानाचा स्पर्श होताच, अगदीं स्पष्टपणें एकमेकांना ऐकावयाला सापडतात, त्याप्रमाणें प्रीतीच्या ध्वनियंत्रानें जोडलेल्या दोन हृदयांतील नाजूक हालचाली, एकमेकांचा एकमेकांना स्पर्श होतांच, स्पष्टपणें प्रत्येकाला कळून येतात ! वसंताच्या हृदयाला विमलचा हृत्संदेश तात्काळ कळून आला म्हणून कीं काय, त्यानें आपला हात तिच्या सुकुमार गालाला लावला ! फोनोग्राफांतली बांगडी सुईचा स्पर्श होऊन चालू झाली कीं, ज्याप्रमाणें त्यातून शब्दोच्चार होऊं लागतो, त्याप्रमाणें वसंताच्या हाताचा प्रेमळ स्पर्श तिच्या गालाला होऊन तिचें हृदय हालल्यासारखें झाल्यामुळें तिच्या तोंडांतून ' नकोना ! ' असा स्पष्ट व गोड असा शब्दोच्चार बाहेर पडला !

" काय नको ? " वसंतानें प्रेमविव्हल होऊन विचारिलें.

" नको ना ! " तेच दोन शब्द तिच्या तोंडांतून पुन्हां ऐकूनही त्याला वाईट न वाटतां आनंदच झाला.

" विमल, कां ग अशी आज तूं अगदीं स्वस्थ पडून राहिली आहेस ? आजारी बिजारी आहेस का ? "

" आजारी नाहीं न् कांहीं नाहीं; आज यायला आपल्याला उशीर झाला' म्हणून जीव कसा अगदीं गुदमरल्यासारखा झालाय्, म्हणून जरा स्वस्थ पडलें होतें. "

" इतकंच ना ! मला वाटलं आजारी आहेस कीं काय; काय पण भ्यालों मी ! "

" त्यांत काय भ्यायचं ? "

" त्यांत कांहींच का भिण्यासारखं नाहीं ? "

" कांहींच नाहीं ! विधवा आजारी पडली काय अन् मेली काय, जगाला त्याची पर्वा थोडीच आहे ! "

" जगाला पर्वा थोडीच असेल किंवा नसेलही; पण मला आहे कीं नाहीं!"

" खरंच का ? माझ्या आजारीपणामुळं, आपल्या हृदयाला वेदना होणं शक्य आहे का ? "

" विमल ! मी दुःखांत असलों तर तुझ्या मनाला वेदना होतील कीं नाहीं ? "

" नका गडे असला भलता प्रश्न करूं मला ! आपल्याविषयीं मला जिव्हाळा वाटला म्हणून आपल्याला माझ्याविषयीं वाटावा, असं माझ्यांत काय आहे बरं ? "

" तुझ्यांत कांहीं असो अगर नसो, पण मला मात्र तुझ्याविषयीं अत्यंत आपुलकी वाटत आहे यात संशय नाही. तसं नसतं, तर मी रोज इथं कशाला बरं आलों असतों ?"

" आपण येथें येतां ते माझ्यासाठींच का ? खरं का हें ? सांगा ना ! "

असें म्हणून विमलनें प्रेमभरानें आपलें मुख वसंताच्या वक्षस्थलात खुपसलें. वसंतानें अत्यंत नाजूक रीतीनें तिच्या केंसावरून हात फिरविला. तो स्पर्श अंतःकरणांत खोल शिरल्यामुळें, तिनें आपलें मुख वर केलें व ती वसंताच्या तोंडाकडे प्रेमव्याकूळतेनें पाहूं लागली. वसंत हंसला ! विमल ! – हो, तीही हंसली ! परंतु तिची दृष्टि तात्काळ खालीं वळली. तरी वसंतानें तिच्या नाजूक हनुवटीला स्पर्श करून, तिच्या अधराचें चुंबन घेतलें ! जाईजुईचा वास नाकात शिरल्याप्रमाणें तिच्या हृदयाला झालें ! थोडा

वेळ स्तब्ध राहण्याशिवाय त्यांना गत्यंतर नव्हतें ! नंतर थोड्या वेळानें विमल म्हणाली–

" आपण जनदृष्टीनें माझे व्हाल का ? "

" तूं मनानें माझी झाली आहेस ना ? मग जनदृष्टीनें मी तुझा व्हायला, कोणती अडचण आहे बरं ? प्रेमाच्या साम्राज्यांत प्रवेश मिळवायला दोन जीवांची मनमिळणी व्हावी लागते, तशी आपल्या हृदयाची झाली आहे का ?"

" या प्रश्नाचं उत्तर आपणच्च द्यावं गडे ! "

" तुला नाहीं का देतां येणार ? "

" मला देतां येणार नाहीं असं का मी म्हणालें ? पण आपणच्च द्याना गडे याचं उत्तर ! "

" माझ्या प्रश्नाचं उत्तर मी देऊन काय उपयोग बरं ? "

" ज्याला प्रश्न विचारला त्याला त्याचं उत्तर द्यायचं नसलं तर ? "

" का द्यायचं नाहीं बरं ? "

" त्याला द्यायला कसंसंच् होत असलं तर ? "

" कसंसंस् व्हायला त्यात काय आहे एवढं ? "

" त्यांत कांहींच नाहीं का ! आपल्या प्रश्नांत माझ्या एकटीचा संबंध नाहीं, आपलाही त्यात संबंध आहे. आपल्याविषयीं असलेल्या संबंधाचं उत्तर मी कसं देऊं बरं ? अन् मला तें कसं देतां येईल ?"

" कां बरं नाहीं देतां येणार ? विमल, इतक्या दिवसांच्या एक-मेकांच्या सहवासानें, माझ्यासंबंधींचें उत्तर तुला देतां येणं शक्य नाहीं का वाटत ? "

" वाटतं शक्य, पण–पण आपणच्च द्याना गडे त्याचं उत्तर ! "

" मी तुला प्रश्न केला, तेव्हां तूंच त्याचें उत्तर दे. "

" बरं मी देतें उत्तर बरं का ! मग आपल्या मनांचं समाधान होईल ना ?"

" हो ! अगदीं पूर्ण समाधान होईल ! "

" मग पुन्हा विचारायचा तो प्रश्न. "

" पुन्हां विचारूं होय ? बरं बुवा विचारतों–' प्रेमाच्या साम्राज्यांत प्रवेश मिळायला दोन जीवांची मनमिळणी व्हावी लागते, तशी आपल्या हृदयांची झाली आहे का ? "

" होय, झाली आहे! होय ना? आपण सांगा, झाली आहे ना आपल्या हृदयांची मनमिळणी?"

" होय, झाली आहे." वसंतानें एकदम उत्तर दिलें.

" कशावरून बरं?"

" तशी आपल्या हृदयांची मनमिळणी झाली नसती, तर तुला माझा स्पर्श सहन झाला असता का? विजेच्या स्पर्शानें लतेच्या हृदयाची आग होते आणि त्या आगीनेंच ती आपल्या आयुष्याची राखरांगोळी करून घेते! पण वायुस्पर्शानें तिचं हृदय नाचूं बागडूं लागतें होय ना? त्या-प्रमाणें मी तुला स्पर्श केला, त्यावेळीं तुझ्या मनाला राग येऊन, तुझ्या देहामनाची आग न होतां, तुझ्या अंतःकरणांतला अनुराग आनंदानें नाचूं बागडूं लागला, याचें कारण काय? तर प्रेमानें आपलीं हृदयें एकजीव झालीं आहेत हेंच नव्हे का?"

" होय गडे! आपण म्हणतां तें बरोबर आहे. पण नुसती हृदयांची जुळणी होऊन काय उपयोग बरं? मला जनदृष्टीनं आपली करण्याचं आपल्याला मनोधैर्य आहे का?"

" तुला जनदृष्टीनें आपली करण्यांत मनोधैर्य ग कसलं? आपल्या मनाला सुख होतं तें करण्यांत मनोधैर्य लागतें का?"

" पण मी विधवा आहें! विधवेशीं लग्न करणाऱ्या तरुणांत मनोधैर्य तर अवश्यच लागतं, नाहीं का?"

" कलिकेवर असलेल्या गुलाबाच्या फुलाचा वास घेण्यांत किंवा कलि-केवरून तोडलेल्या गुलाबाच्या फुलाचा वास घेण्यांत कांहीं कठीण का आहे? फुलाच्या रूपगुणांत यामुळें कांहींतरी फरक होतो का? हृदयाला आनंद देणें, हें दोन्ही गुलाबांना सारखंच शक्य आहे, नाहीं का?"

" होय, आपण म्हणतां तें खरं आहे! पण हें फुल नुसतं कलिके-वरूनच तुटलं आहे असं नव्हे, तर तें जनदृष्टीनें दुसऱ्याच्या मालकीचं झालेलं आहे, नव्हे होतं. त्याचा मालक नाहींसा झाला, म्हणून वाटेल त्यानं तें घेतलं, तर तो घेणारा जगाच्या दृष्टीनं—निदान समाजाच्या दृष्टीनं—तरी नैतिक चोर ठरत नाहीं काय?"

" पण लग्नासारख्या बंधनांनीं शरीराची मालकी दुसऱ्याकडे जात

असली, तरी मनाची मालकी नेहमींच दुसऱ्याकडे जाते, असें थोडेंच आहे! असें असतें तर तुझं माझ्यावर प्रेम बसणंच शक्य नव्हतें! तुझ्या हृदयाची तळमळ, समाजानें लादलेल्या तुझ्या लग्नबंधनानें शांत झाली होती का? नाहीं ना? मग झालं तर! ज्या लग्नविधीनें अंतःकरणाची दुसऱ्या अंतःकरणासाठीं असलेली नैसर्गिक आवडीची तळमळ शात झाली नाहीं, ज्यामुळें मनाची मालकी दुसऱ्याला काबीज करतां आली नाहीं, तो लग्नविधि कसला? तो लग्नाच्या बाजारांतला एक सौदा होय! तुला नाहीं का असं वाटत?"

"आपण म्हणतां तें बरोबर आहे, पण निर्दय जग, अंध समाज इतक्या चौकशीच्या भानगडीत कुठं पडायला जातोय्? त्याच्या दृष्टीनं लग्न तें लग्न! मग त्यांत मनाची मुस्कटदाबी झालेली असो, अगर नसो! पैशानं शरीरं विकत घेतलेलीं असोत अगर नसोत! लग्न म्हणजे लग्न! लग्न म्हणजे दोन शरीरांचा तिऱ्हाइतांनीं केलेला संयोग! या जुलमाच्या रामरामांत खरा राम काय असायचा? अन् या जुलमाच्या रामरामानं रामसीतेसारखीं जोडपीं जगांत कुठलीं दृष्टीस पडायचीं बरं?"

"खरं ना हें? शिवाय या जुलमाच्या रामरामांतला राम, दुर्दैवानें नामोहरम होऊन जगांतून नाहींसा झाला, तरीही उरल्या सीतेनें वैधव्याच्या जुलमात सीतादेवीसारखें पतिनिष्ठ राहावें, अशी महत्त्वाकांक्षा तरी, मी म्हणतों समाजानें कां धरावी? ज्या लग्नांत खरा राम नव्हता त्या लग्नांतला खोटा रामही जगातून नाहींसा झाल्यावर, उरल्या जीवानें खऱ्या रामासाठीं कां धडपड करूं नये? आणि त्यानें तशी धडपड केली, तर समाजानें त्याच्यावर खवळून जाऊन दांत खाण्यांत काय अर्थ आहे बरं? दुसरें लग्न करून—आपल्या अंतःकरणाचा राम शोधून काढून त्याच्याबरोबर आयुष्य सुखांत घालवून, त्यानें या असल्या निर्दय समाजाचे दात त्याच्याच घशांत अडकवायला नकोत का?"

"आपण लग्नविधीला दोष देऊं नये, गडे! सगळा दोष, हा लग्नविधीचा फार्स ज्यांनीं सुरू केला त्या पुरुषवर्गालाच द्यावा!"

"दुबळ्या स्त्रीजातीला, कोणत्याही रीतीचं स्वातंत्र्य न देतां, निर्दय पुरुषांच्या पाशवी इच्छेला त्या कशा अगदीं सहज रीतीनं बळी पडतील,

हीच एक महत्तम महत्त्वाकांक्षा समाजानं जिथें मनांत बाळगली आहे, तिथें लग्न म्हणजे ज्याप्रमाणें बाजारांत विकावयास आलेल्या जनावरांचे सौदे, त्याप्रमाणें दोन शरीरें पैशाच्या जोरावर एके ठिकाणीं आणण्याचा निर्दय खटाटोपच नाहीं का ? लग्न या पवित्र संस्थेचा अशा प्रकारच्या नीच शारीरिक संयोगासाठीं उपयोग करणें, म्हणजे पवित्र स्त्रीसौंदर्याचा वेश्याव्यवसायासाठीं उपयोग करण्यासारखें अत्यंत निंदास्पद आहे !

लग्न म्हणजे दोन परस्परानुरक्त हृदयांचा मानसिक समागम ! दोन प्रेमळ जीवांचा मानसिक समागम जगाच्या दृष्टीनें शक्य व्हावा, यासाठीं लग्न हा एक निसर्गानें शोधून काढलेला उपाय आहे. लग्न हें अंतिम ध्येय नव्हे, तर मानसिक एकजुळणी झालेल्या दोन प्रेमळ जीवाची शरीरजुळणी व्हावी, हें जें निसर्गाचें ध्येय आहे त्या ध्येयाची पूर्तता करणारें तें एक साधन आहे. ( It is not an end in itself; it is a means to an end ! )

पण ध्येयाकडे पाठ फिरवून आमचा समाज त्या साधनाच्याच पाठीमागें लागलेला पाहून कोणा समंजस माणसाला, ध्येयावादी समाजसुधारकाला चीड येणार नाहीं ? ज्या ठिकाणीं ध्येयाची जाणीव नाही, नव्हे त्याचें अस्तित्वही नाहीं, तेथें त्या ध्येयाची पूर्तता करणाऱ्या साधनाची आवश्यकता तरी कुठें आहे मी म्हणतों ! " वसंत विमलकडे पहात बोलत होता.

" आपण म्हणतां तें अगदीं खरं आहे. माझं लग्न माझ्या वयाच्या अकराव्या किंवा बाराव्या वर्षी झालं असेल; त्यावेळीं मला लग्न म्हणजे काय चीज आहे, हेंही कळण्यासारखं नव्हतं ! अशा वेळीं एका अनोळखी पुरुषाच्या गळ्यांत माझं शरीर जुलमानं बांधून, समाजानं एक लग्न केल्याचा टेंभा मिरविला ! "

"पण जिथं मुळांतच मी मघाशीं म्हणालों त्याप्रमाणें, दोन मनांची मिळणी व्हावी हें ध्येयच नव्हतें, तिथें त्या ध्येयपूर्तीच्या नांवाखाली, हा लग्नाचा बाजार समाजानें कशाला मांडला ? आणि दुर्दैवानें त्या लग्नाच्या बाजाराचा, त्यांतील एका व्यक्तीच्या मरणानें चांगला बोजवारा उडाल्यावर त्या लग्नाचा – नुसत्या साधनाचा – डाग माल दुसऱ्या व्यक्तीच्या–स्त्री-व्यक्तीच्या–जीवितावर, व्रणाचा डाग शरीरावर कायम रहातो त्याप्रमाणें–

क़ायम रहावा आणि तो डाग जगाच्या दृष्टीस नेहमीं पडावा, म्हणून कपाळावरचा मंगल कुंकुमतिलक—निर्दय जगाच्या दृष्टीनें अपवित्र, अमंगल आणि अशुभ अशा विधवेच्या कपाळावर ती पावित्र्याची, मांगल्याची आणि सौभाग्याची ढळढळीत खूण शिल्लक राहूं नये म्हणून—पुसून टाकून, त्या दुर्दैवी व्यक्तीचें जीवित कपाळाप्रमाणेंच पांढरें फटफटीत करण्याचा निर्दय अट्टाहास समाजानें धरावा, म्हणजे एखाद्या वेडसरानें सुंदर फुलांनीं ओथंबलेल्या गुलाबांच्या फुलझाडांना आपल्या वेडाच्या लहरींत, आणि अरेरावी वेडसरपणात उपटून टाकण्यासारखें अत्यंत गर्हणीय नाहीं काय !

एखाद्या साधारण बुद्धीच्या विद्यार्थ्यानें, परीक्षा संपल्यावर आपण पास होणार कीं नापास होणार हें ठरविण्यासाठीं देवाच्या नांवानें चिठ्या टाकाव्या व त्यात पास अशी चिठ्ठी आली, तर आनंद मानून घ्यावा आणि नापास अशी आली तर रडत बसावें, त्याप्रमाणें आईबाप आपल्या मुलांमुलींचीं लग्नें जमवितात ! सुदैवानें मनासारखा पति किंवा पत्नी मिळाली, तर तिनें किंवा त्यानें आनंद मानून सुखी व्हावें आणि दुर्दैवानें पति किंवा पत्नी विजोड, आपल्या मनोभावनांशी विसंगत असलेल्या मनोभावनांचीं मिळालीं तर आयुष्यभर रडत बसावें. पण पुरुष हा स्वतंत्र असल्यामुळें व अनेक लग्नें करण्याची समाजाची त्याला परवानगी असल्यामुळें किंवा वाटेल तसा धांगडधिंगा त्यानें घातला तरी समाजाच्या मनाला तो पचत असल्यामुळें, त्याच्या आयुष्याची तितकी दुर्दशा होत नाहीं ! पण स्त्रीहृदयाची अशा विजोड लग्नामुळें कशी कुचंबणा होते, कांहीं काहीं वेळा तिच्या उभ्या आयुष्याची कशी माती होते, हें आपल्या हिंदुसमाजांतील दुर्दैवी स्त्रीजातीला सांगायला नकोच ! बरं दुर्दैवानें, बिचाऱ्या दुर्भागी स्त्रीजीवाचा पति तिच्या अगोदरच हें जग सोडून गेला, तर सगळाच कारभार आटोपला !

क्षणभंगुर आयुष्याची हमी माणसाला देतां येत नसतांही, त्या आयुष्याच्या अस्तित्वावर अभागी स्त्रीजीवाच्या उभ्या आयुष्याचा बरा वाईट निकाल अवलंबून ठेवून, तिच्या साऱ्या जीविताचा कायमचा निकाल

लावायचा न्यायाधिशाचा पेशा पुरुषानें आपल्या हातांत कां घेतला आहे, ह्या प्रश्नाचें उत्तर ही निष्ठुर पुरुषजात देईल का ? "

"दुसऱ्याच्या सुखदुःखाची, बऱ्यावाईटाची पंचाईत कुणाला कधीं असते का ? आपलं अंग भाजलं तर माणूस त्याच्यावर फुंकर आपण होऊन घालील ! पण दुसऱ्याच्या दुःखावर फुंकर घालण्याची त्याला काय जरूर ?"

" त्याला जरूर नाही, तर दुसऱ्याच्या दुःखावर डागण्या देण्याच्या पंचाईतींत तरी तो का बरे पडतो ? "

" मनुष्यस्वभावच असा आहे ! तो फुलझाडावरचं फूल सहजासहजीं अगदीं मजेंत तोडून काढील ! पण त्याच्या मुळात दोन चिमटी पाणी घालण्याचा विचारसुद्धा त्याच्या मनांत येणार नाही. चुकून आला, तर त्याच्याकडे तो लक्ष देणार नाहीं ! कावळ्याप्रमाणें व्रणावर टोंच मारायला तो तयार, पण शीतल वायुप्रमाणें नाजूक फुंकर घालण्याचें त्याला ठाऊक नाहीं. ठाऊक असलें, तरी असली नसती उठाठेव तो करणार नाहीं ! — त्याच्यानें ती होणार नाही !

अशा प्रकारच्या स्वतःच्या सुखालाच चटावलेल्या आणि परदुःखाकडे कानाडोळा करणाऱ्या, मानवी स्वभावाला ताळ्यावर आणायला आमच्या सारख्या दुर्बल स्त्रीजातीनेंच स्वतः कंबर बांधली पाहिजे. जगांत कोण कुणाचा आहे ? जीव जगात जन्माला येतो तो एकटाच; जग सोडून जातो तोही बिचारा एकटाच ! त्याच्यावर अवलंबून असणारे त्याच्या भोंवतालचे इतर जीव म्हणजे त्याच्यासाठीं मनापासून तळमळणारे जीव नसून, त्याच्या नाशामुळं आपल्या स्वार्थाला धक्का बसणार म्हणून तळमळणारे प्राणी असतात ! पाण्याच्या पृष्ठभागावर दगड फेंकला म्हणजे त्याचा मार पाण्यालाच लागतो, त्यामुळें वर उडणाऱ्या लहरींना त्याचा कांहीं विधिनिषेध नाहीं ! पाण्यावर उठणाऱ्या या लहरी म्हणजे जगांत एका जीवावर अवलंबून असलेले इतर जीव ! त्यांना त्या माराचें ज्ञान होत असेल, पण त्याचा परिणाम त्यांच्यावर कांहींच नाहीं !

तेव्हां मी म्हणतें, स्त्रीजातीला पुरुषाच्या अरेरावी वर्तनानं जें दुःख होत आहे, तें नाहींसं करण्यासाठीं तिनंच स्वतः कंबर बांधून पुढं आलं पाहिजे ! "

" होय ! तूं म्हणतेस तें खरं आहे. आमच्यासारख्या पुरुषांनीं त्यांत हात घातला, तर तो आम्ही आमच्या स्वार्थासाठीं घातला, असेंच सगळें जग म्हणणार ! तेव्हां तुझ्यासारख्या विधवा मुलींनीं स्वतःचीं लग्नं आपण होऊन जमवून आणलीं पाहिजेत; म्हणजे माझ्या म्हणण्याचा अर्थ असा नाहीं कीं, विधवांनीं आपल्या मनाविरुद्ध लग्न केलंच पाहिजे. ज्यांना लग्नाची जरूर वाटत असेल, त्यांनीं समाजाला किंवा रूढ असलेल्या दांभिक नियमतत्त्वांना न जुमानता, अवश्य लग्नें करून घ्यावींत !—कारण—आचारविचाराचें स्वातंत्र्य म्हणजेच मानवी मनाची प्रगति होय ! "

" मग एखाद्या दारूबाजानं दारू पिण्याच्या बाबतींत स्वातंत्र्य दाखविण्याचा प्रयत्न केला आणि तो दिवसाचे चोवीस तास दारू पिण्यांत घालवूं लागला, तर ती त्याच्या मनाची प्रगति झाली असें म्हणतां येईल का ? आणि अशा प्रकारच्या मनाच्या प्रगतीची समाजाला जरूरी आहे का ? "

" चंद्राचें कार्य शीतल प्रकाश देऊन अखिल चराचराला आनंदित करणें हें आहे, त्याप्रमाणें कोणतेंही स्वातंत्र्य असो, त्यापासून मनाला आनंद झालाच पाहिजे ! पण तो आनंद क्षणजीवी नसून अमर, अविनाशी, मनाला शांति प्राप्त करून देणारा, असा असला पाहिजे ! कितीही दुर्व्यसनात मन गुदमरून गेलेलें असो, त्या मनाला तें वाईट असेल, तर चिरकाल आनंद होणें शक्यच नाहीं ! मनाची धडपड चिरकाल आनंदाच्या उपभोगासाठीं असते ! दुबळया व्यसनांत लोळणाऱ्या मनाला वाटतें कीं, दारू पिऊन चिरकाल सुख होईल ! बाहेरख्याली मनाला वाटतें, शारीरिक स्त्रीसौख्याच्या उपभोगांत चिरकालीन आनंद आहे ! पण घाणेरड्या व्यसनापासून उत्पन्न होणारा सुखाचा क्षण नाहींसा होतो न होतो तोच—मृगजळाला पाहून, त्याच्यामागें लागलेल्या भोळ्या मनाला जसा प्रथम आनंद होतो, पण जवळ जातांच तें मृगजळ सुख देऊं शकत नाहीं, अंतःकरणाची तहान भागवूं शकत नाहीं ही जाणीव त्याला होऊन त्याच्या मनाची निराशा होते, तद्वत् तें व्यसनाधीन दुर्बळ मन, अंतःकरणाला पाहिजे असलेल्या अंतिम आनंदपूर्तीच्या अशक्यतेमुळें उत्पन्न झालेल्या निराशेनें निरुत्साही होतें ! आणि त्यामुळेंच असल्या क्षुद्र वासना, घाणे-

रडीं व्यसनें तृप्त करणाऱ्या स्वातंत्र्याची इच्छा धरणारें मन, खऱ्या स्वातंत्र्यालाच, चिरकाल टिकणाऱ्या आनंदालाच कायमचें मुकतें!

मनाला जें पाहिजे तें हें कीं, ज्यामुळें जीवितांत त्याला अंतिम आनंद, चिरकालीन सुख मिळवितां येईल. मिळवितां नाहीं आलें, तरी त्याचा अस्पष्ट अनुभव तरी त्याला घेतां येईल! अशा प्रकारचें स्वातंत्र्य मिळवतां आलें म्हणजे मानवी मनाची प्रगति झालीच, असें म्हणावयास काय हरकत आहे!"

इतक्यात बाहेर कोणाची तरी पावलें वाजल्याचा भास त्यांना झाला; त्यामुळें विमल सैंपाकघरात पळाली; परंतु वसंताच्या मनातून विमलला कुमार-कुसुमच्या एकमेकांच्या प्रेमाबद्दल बरेंच सागावयाचें होतें आणि त्याच हेतूनें मुख्यतः तो तेथें आला होता. पण बोलण्याच्या भरांत तो हें सगळें विसरून गेला.

पावलाचा आवाज ऐकून, रमावहिनी बाहेर आल्या आहेत कीं काय हें पाहण्यासाठीं तो पुढील दारीं आला; पण रमावहिनी अजून आल्याच नव्हत्या. पाऊल वाजल्याचा त्यांना जो भास झाला, तो भासच होता.

रमावहिनी आल्या नाहींत, हें पाहून वसंत आत विमलकडे गेला व त्यानें तिला कुमार-कुसुमविषयीं सर्व माहिती सांगितली. ती ऐकून विमल आश्चर्यानें म्हणाली—

"हें आपल्याला पसंत आहे का?"

"खुद्द इन्दुताईचीच जिथें मनापासून कबुली आहे, तिथं तुम्ही आम्ही काय करणार ग?"

"होय, पण तसं म्हटलं, तर कुसुम पोर आहेच तशी अगदीं! तिच्या नशिबानं कुमारांसारखा अष्टपैलु हिरा तिला लाभत आहे, हें यथायोग्यच झालं नाहीं का? पण कुमाराना दोन बायकाना सुख देतां येणं शक्य आहे का?"

"विमल! कुमार, इन्दु, कुसुम हीं आपल्यासारखीं साधारण माणसं आहेत का? मग त्याना सर्वसाधारण माणसांचे नियम लावण्यांत अर्थ काय बरं? जिथें इन्दुताईनींच त्यांच्या लग्नाला आपण होऊन आनंदानें कबुली दिली आहे, जिथें इन्दुताईसारखी सर्वगुणसंपन्न स्त्री, पत्नीच्या

नात्यानें संसार चालवीत असतांनाही, कुमारांचें कुसुमसारख्या अद्वितीय अशा स्त्रीरत्नावर मन आकर्षित झालें, इतकें कीं, तिच्याशीं लग्न करायलाही ते आनंदानें तयार झाले आणि जिथें कुसुमसारख्या स्त्रीहृदयानेंही एक बायको -त्यांतून सुशील, सुंदर अशी बायको-जिवंत असलेल्या कुमारांबरोबर, पत्नीच्या नात्यानें बद्ध होण्यासाठीं धडपड केली, तिथें आपल्या सारख्या माणसांनीं बोलायचं काय आणि करायचं काय ? मी मघांच तुला सांगितलंना कीं अंतिम आनंद, चिरकालीन सुख देणाऱ्या स्वातंत्र्यासाठीं प्रत्येक जीव धडपडत आहे; त्याप्रमाणें हे तीन जीव, एके ठिकाणीं राहून अशा प्रकारचें दिव्य, कल्पनामय स्वातंत्र्य मिळवणार असतील, दिव्याचें नंदनवन् निर्माण करणार असतील ! नाहीं कोणीं म्हणावें ? मला तर असें वाटतें कीं, हे तीन जीव अशा प्रकारच्या जिव्हाळ्याच्या नाजूक बंधनांनीं एके ठिकाणीं आणण्यांत, चिरकाल टिकणाऱ्या, अक्षयात निवास करून राहिलेल्या अविनाशी अशा सुखानंदाचा, दिव्याच्या नंदनवनाचा, लाभ करून देणारें चिरस्वातंत्र्यसुख स्वतः उपभोगून, इतर मनुष्यप्राण्यांना त्याची जाणीव आपल्या उदाहरणानें त्यांनीं आणून द्यावी, असाही त्या सर्वशक्तिमान् ईश्वराचा हेतु असेल ! नाहीं कशावरून ? ”

याचें उत्तर द्यावयाला विमल तेथें होतीच कोठें ? रमावहिनींना दुरून येतांना पाहून, तिनें एकदम सैंपाकघर गाठलें होतें !



## कुंज १५ वा.

डेक्कन जिमखान्याच्या बाजूला असलेल्या एका दुकानांत कुमार आणि इन्दु ' शॉपिंग 'साठीं आलीं होतीं. साधारण संध्याकाळचा चार पांच वाजण्याचा सुमार झाला होता. त्यांना येऊन थोडा वेळ झाला नाहीं तोंच कुसुमही त्याच दुकानांत आलेली पाहून, कुमाराचा चेहरा आनंदित झाला; व त्या दिव्य आनंदाच्या तेजानें, शुभ्र चादण्याचा प्रकाशानें आकाशाचें बहिरंग उजळून जावें त्याप्रमाणें त्यांचें तेजस्वी मुखकमल प्रसन्न दिसूं लागलें ! कुसुमच्या अंतःकरणात तर शीतल वायूच्या नाजूक स्पर्शानें सुंदर कुरळे केस भुर्र् भुर्र् उडत मुखाला चोरटा स्पर्श करीत चाटून जावे, तद्वत् कुमाराच्या दर्शनानें, प्रीतीच्या नाजूक भावना उद्दीपित होऊन, तिच्या हृदयाला सुखाची कल्पना आणून देऊं लागल्या ! परंतु कुमारांबरोबर दुसरी स्त्री पाहून, मेघमाला आड आल्यामुळें चादण्याची शोभा डोळ्यांना स्पष्ट दिसूं नये, त्याप्रमाणें तिच्या अंतःकरणांत उत्पन्न झालेल्या गोड भावना तिच्या मुखावर स्पष्ट दिसणे अशक्य झाले ! इन्दु तर, कवीचें रसिक हृदय दिव्य सौंदर्याच्या मोहिनीनें आकृष्ट होऊन, त्याच्याकडे अनिमिष नेत्रांनीं पहात रहातें, त्याप्रमाणें तिच्या सुंदर मुखाकडे पाहूं लागली !

महत्त्वाकांक्षि मानवी मन ज्याप्रमाणें आपल्या गुणाकडे डोळेझाक करून, आपल्यात नसलेल्या दुसऱ्याच्या उच्च गुणांकडे दृष्टि लाऊन रहाते, त्याप्रमाणे कुसुम ही कुमारइन्दूंकडे; कुमार हे इन्दुकुसुमकडे; आणि इन्दु ही कुसुमकुमाराकडे न्याहाळून पाहूं लागली ! अद्वितीय अशा गुणसमूहाकडे पाहून गुणग्राहि मन गुंग होऊन अबोल व्हावे, तद्वत् त्यावेळीं तिघींही, दुसऱ्याच्या दिव्यत्वानें गुंग होऊन, चकार शब्द न काढता स्तब्ध राहिली.

आपलें काम झालें तशी कुसुम दुकानाबाहेर गेली; परंतु समुद्रात नांगर टाकलेली होडी, वाऱ्यानें कितीही हालली तरी जागची हालत नाही, त्याप्रमाणें कुसुम बाहेर जाऊन चालण्याचा कितीही प्रयत्न करीत होती, तरी पुढें पुढें न जातां कुमारांची वाट पहात रस्त्यावर घुटमळूं लागली !

इतक्यांत कुमार आणि इन्दु हीं बाहेर आलीं. समोर कुसुमला पुन्हां पाहून इन्दु म्हणाली—

" पाहिलं का तिकडे किती सुंदर मुलगी आहेत ती ! "

" होय, पाहिली. सौंदर्याच्या बागेंत विकसणारें गुलाबाचं फूल आहे तें ! आकाशाच्या पुष्पोद्यानांत विहार करण्यासाठीं जमलेल्या तारकासुंदरींच्या समूहांत अद्वितीय तेजानं चमकणारी शुक्राची चांदणी आहे ती ! ती माझी कुसुम आहे ! किती सद्गुणी आणि सुंदर आहे, पाहिलीस ना ! "

" खरंच का ! आपली का कुसुम ती ! मग द्याना गडे माझी तिची ओळख करून. जड देहाच्या रानांत भटकणारा व्याकूळ जीव चैतन्य-जलाच्या एका थेंबासाठीं जसा धडपडत असतो, त्याप्रमाणें तिच्या दिव्यत्वानें आकर्षित झालेलें माझं मन तिच्या दिव्य सहवासाठीं अगदीं कसं आतुर झालंय् ! "

" माझी कुसुम जगाच्या दृष्टीनें माझी झाल्यावरही, तुझी ही तिच्या सहवासाबद्दलची आकर्षक आतुरता कायम राहील ना ! कीं जमिनीचा स्पर्श होतांच तेजस्वी ताऱ्याची माती व्हावी, त्याप्रमाणें कुसुम लग्नानें माझी झाल्यावर, तुझी तिच्याबद्दलची आतुर सहवासप्रियता एकदम नाहींशी तर नाहीं ना होणार ? "

" देवाघरची दिव्य तारका जमिनीवर आली, म्हणजे तिची माती होते !– होय, होते खरी माती ! पण एवढ्यावरनं तिच्या आयुष्याची माती झाली, असं आपण कसं म्हणायचं ! ज्या जगाच्या प्रेमानें आकर्षण पावून, ती त्याच्या दिव्य सहवासासाठीं एवढा हजारों लाखों कोस लांबीचा प्रवास, अवकाशाच्या रानावनांतनं धडपड करीत येते, त्या जगाशी काया-वाचामनसानं तत्स्वरूप बनावं, म्हणून ती आपल्या दिव्य स्वरूपाचा त्याग करते आणि त्याच्याशीं सर्व दृष्टींनी समरस होण्यासाठीं मृत्तिकास्वरूप बनते ! हें ती करतें तें केवळ आपल्या प्रेमाच्या जीवासाठीं तत्स्वरूप बनण्यासाठी ! तिला खालीं जगांत येऊनही, आपलं दिव्यरूप धारण करतां येईल ! मुलगी नवऱ्याच्या घरीं लग्न होऊन गेली म्हणजे जशी आपलें माहेरचं – व माहेराचं – नांव टाकून, नवऱ्याच्या नांवासाठीं नवऱ्याचंच नाव धारण करते, त्याप्रमाणें आकाशींची दिव्य अप्सरा, आपल्या प्रेमी

जीवाच्या नांवासाठीं, प्रत्येक बाबतींत त्याच्यासारखी होण्यासाठीं धडपडत असते! सुमनसुंदरीच्या दिव्यत्त्वानं भारून जाऊन, आकाशाच्या राज-रस्त्यावरचा देवदूत अरुण तिच्या प्रेमासाठीं व तिच्या हृदयांत स्थान मिळावं म्हणून, दंवबिंदूचें रूप घेऊन तिच्यापेक्षां किंवा तिच्यासारखा नाजूक बनतो! याचं कारण, आपल्या प्रीतिविषयासारखं आपलं सर्व स्वरूप बनावं, अशी प्रेम करणाऱ्या मनाची प्रवृत्ति असते, हें होय!

तेव्हां, आपलं जसं कुसुमवर अत्यंत प्रेम जडलं आहे, तसं माझंही तिच्यावर अलिकडे निरपेक्ष प्रेम जडूं पाहात आहे; अन् म्हणून माझ्या या कुसुमवरच्या प्रेमामुळं, कदाचित् माझ्या देहामनाचं स्वरूप बदलेल; पण तें आपण व कुसुम याच्या मनःस्वरूपाशीं विरोधक न होतां, त्याच्याशीं समरस होण्यासाठीं बदलेल,याबद्दल आपल्या मनाला खात्री असूं द्यायची!"

"पण तूं कुसुमशीं समरस होण्यासाठीं कितीही प्रयत्न केलास, पण तिच्या मनाची घडण तुझ्या मनाशीं जुळली नाहीं तर? दंवबिंदु, तूं म्हणतेस त्याप्रमाणें प्रेमासाठीं तत्स्वरूप बनतो; परंतु फुलानेंही आपल्या हृदयाचा त्याचें प्रेम स्वीकारण्याइतका विकास केला पाहिजे, तरच त्यांच्या मनाची एकजुळणी होणें शक्य आहे. त्याऐवजीं त्या फुलानें दंवाच्या प्रेमाचा स्वीकार केला नाहीं किंवा दगडासारखं मन घट्ट करून, आपलं हृदय उघडून दाखवलं नाहीं; उलट कलिकेसारखं पाकळ्या मिटून, निस्तब्ध राहून त्याच्या निःस्वार्थि प्रेमाला हृदयांत स्थान न देतां, त्या प्रेमाचा अव्हेर केला तर तुला माहित आहे ना, इतका प्रेमासाठीं स्वार्थ-त्याग करूनही त्याच्या आयुष्याची प्रेमनिराशेनें कशी माती होती ती! प्रेम हें दंवबिंदूसारखें आहे! उत्तेजन मिळून त्याचा स्वीकार झाला, तर दंवबिंदु पाकळ्यांवर मोत्याप्रमाणं चमकतो, त्याप्रमाणें तें आनंदाच्या पावित्र्यानें चमकून भोंवतालचें वातावरण सुप्रसन्न करून टाकतें! आणि उलट त्याचा अव्हेर झाला, तर मिटल्या कलिकेवर पडून जमिनीवर सांडणाऱ्या दंवबिंदूप्रमाणें, त्याच्या आयुष्याची एका क्षणांत माती होते!

उत्तेजन आणि स्वीकार हा प्रेमाचा आत्मा आहे! त्याच्यावांचून प्रेम म्हणजे वासावांचून गुलाब, समाधानावांचून ऐहिक ऐश्वर्य, आशेवांचून आयुष्य सर्व निरर्थक होय!

तेव्हां तूं माझ्या प्रेमामुळें कुसुमवर प्रेम करणार कीं कुसुम या व्यक्ती-वर, तिच्या व्यक्तित्वानें भारून जाऊन प्रेम करणार, याचें अगोदर उत्तर दे! तिच्या शारीरिक आणि मानसिक व्यक्तित्वाच्या सानिध्यांत तुझ्या देहाच्या अंधारकोठडींत कोंडल्या गेलेल्या आत्म्याच्या अंतःकरणाला लागलेली दिव्य चैतन्यस्वातंत्र्याची ओढ थोडीफार शात होईल, किंवा तुझ्यातिच्या जीवजीविताच्या अंतर्मीलनामुळें चराचर भरून उरलेल्या प्रेमब्रह्माची अस्पष्ट अशी ओळख मनाला होईल असें तुझ्या अंतःकरणाला वाटतें का ? ”

“ नाथ ! आपण कुसुमला आपली करण्यासाठीं आपल्या देहामनाची एवढी जी आटाआट करताहात ती कशासाठीं बरं ? आपल्या तळमळत्या हृदयाचे अस्पष्ट बोल मंजूळ संगीतात स्पष्ट करण्यासाठींच ना ? आपण पुरुष आहांत मी स्त्री आहे ! पण हा भेद देहाचा आहे ! अंतःकरणाला भेद असतो का ? एका मनाला वाटतं, तें दुसऱ्या मनाला वाटणं अशक्य आहे का ? आपलं मन कुसुमच्या ‘ दिव्यत्त्वानं ’ आकर्षून गेलं आहे, तसं माझंही मन, त्याच ‘ दिव्यत्त्वानं ’ का बरं आकर्षून जाऊं नये ? आपण कुसुमवर प्रेम करता मीही पण तिच्यावर प्रेम का करूं नये ? अन् तसं मी तिच्यावर प्रेम केलं, तर तें मी आपल्या प्रेमामुळं केलं, असंच का आपल्या मनाला वाटावं बरं ?

कंदीलाचा प्रकाश अन् पणतीचा प्रकाश याच्या प्रकाश देणाऱ्या साधनात फरक असला, तरी प्रकाशात फरक आहे का ? सूर्याच्या प्रकाशानं पुरुषाचं शरीर प्रकाशित होतं ! स्त्रियाचं होत नाहीं का ? सुस्वर संगीतानं पुरुषी मन आनंदित होतं ! स्त्रीमन आनंदित होत नाही का ? सौंदर्याच्या दिव्यत्त्वानं पुरुषहृदय वेडं होतं ! रमणीहृदय वेडं होणं शक्य नाही का ? मग माझं मन कुसुमनं आकर्षण करून घेऊन, तिनं मला आपल्या चिर-सहवासाचं वेड लावलं, असं मी म्हटलं तर त्यात आपल्याला इतकं आश्चर्य का अन् कसलं वाटलं बरं ? ”

“ इन्दु ! माझ्या बोलण्याचा भलताच अर्थ तूं करते आहेस ! मी स्त्री-पुरुषांच्या मनोभावनांत मुळींच फरक करीत नाहीं. पुरुष मनाला आनंद तसा स्त्रीमनालाही आनंद वाटणें शक्य आहे. नव्हे वाटतोच ! ज्या भावना, विकार, विचार पुरुषहृदयांत प्रादुर्भूत होणें शक्य आहेत, त्याच

भावना, विकार, विचार स्त्रीहृदयांतही प्रादुर्भूत होणं शक्य आहेत ! पण त्या त्या भावनांत थोडातरी फरक असणं शक्य आहे; आणि तो फरक म्हणजे, शुद्धस्वरूप सूर्यप्रकाश आणि कांचेतून पडलेला सूर्यप्रकाश, यांमधें असलेला फरक होय ? एखाद्या वस्तूवर पडलेला सूर्यप्रकाश, आणि त्याच वस्तूवर कांचेतून पाडलेला सूर्यप्रकाश, या मधला फरक तुला मला कळला नाही, तरी तज्ज्ञ लोकांना कळल्याशिवाय राहात नाहीं !

पुरुषाच्या शारीरिक सौंदर्याला पाहून ज्या भावना स्त्रीहृदयांत, किंवा स्त्रीच्या शारीरिक सौंदर्याला पाहून ज्या भावना पुरुषहृदयांत उत्पन्न होतात, त्या भावना, आणि पुरुषाच्या सौंदर्याला पाहून पुरुषहृदयांत किंवा स्त्री-सौंदर्याला पाहून स्त्रीहृदयात उत्पन्न होणाऱ्या भावना, यांत केव्हांही फरक आहे आणि तो फरक म्हणजे रम्य चादणें आणि त्याच चांदण्याचें जलाशयात पडलेलें प्रतिबिंबित चांदणें, यांमधला फरक होय !

'पॉझिटिव्ह' आणि 'निगेटिव्ह' 'करंट्स्' एके ठिकाणीं येतांच अत्यंत तेजस्वी अशी विद्युत् उत्पन्न होते ! आणि त्या अद्भुत विद्युच्छक्तीनें जगात अतर्क्य असे शोध लागून, जगावर अत्यंत मोठे उपकार झाले आहेत ! त्याप्रमाणें स्त्रीपुरुषहृदयें आकर्षण पावून एके ठिकाणीं आल्यावर जी प्रेमविद्युत् उत्पन्न होते, त्यामुळें जगात अपूर्व अशी वाङ्मयनिष्पत्ति होऊन, जगाच्या कल्पना-विचारांत अतर्क्य अशी क्रांति होत आहे !

विजेच्या साहाय्यानें मानवी मनाला शारीरिक सुखाची जोड मिळत आहे, तर प्रेमाच्या प्रभावानें मानवी मनाच्या हृदयाची आतरिक तळमळ शात होत आहे ! स्त्रियांस्त्रियांच्या प्रेमाला किंवा पुरुषांपुरुषाच्या प्रेमाला अशा प्रकारच्या दिव्य जगाची उभारणी करता येणं शक्य नाहीं ! दोन्ही 'पॉझिटिव्ह,' किंवा दोन्ही 'निगेटिव्ह' 'करंट्स्' एकेठिकाणीं जोडून, वीज उत्पन्न होणें शक्यच नाहीं ! हा निसर्गाचा नियम आहे !"

"आपण सागता तें बरोबर आहे; पण माझं मन जें कुसुमवर आकर्षित झालं आहे, तें कांहीं खोटं नाहीं. आपण मला तिची ओळख करून द्या गडे ! आपली तिची ओळख झाली असेलच ना ?"

"होय झाली आहे." असें म्हणून कुमारांनीं तिला त्या दिवशीं कुसुमशीं झालेल्या ओळखीची सर्व माहिती सांगितली.

इतक्या वेळामध्यें खरें म्हटलें तर कुसुम केव्हांच 'रेसिडेन्सीं'त पोहों-चली पाहिजे होती; परंतु कुमारांशीं बोलण्यासाठीं उत्सुक झाल्यामुळें, दोऱ्यानें बांधून ठेवलेला पतंग आकाशात तेथल्या तेथेंच भटकत असतो, त्याप्रमाणे तिचें कुमारांच्या प्रेमरज्जूनें बद्ध झालेलें अंतःकरण व शरीर रस्त्यावर तेथल्या तेथेच रेंगाळत होतें !

इतक्यांत कुमार आणि इन्दु कुसुमच्या जवळ आलीं; कुसुम हंसली. आकाशांत अगोदर एक तारका उगवते आणि त्यानंतर दुसरी, तिसरी त्याप्रमाणें कुसुम हंसल्यावर कुमार व इन्दु हीं दोघेंही हसली ! !

"ही माझी इन्दु !"– कुमार इन्दूकडे बोट दाखवून, हंसत हंसत कुसुमला म्हणाले.

"मला वाटलंच तें ! सद्‌गुणी माणसाचं तेज, सुवासिक फुलांचा वास किंवा निःसीम प्रेमाच्या हालचाली कधींही लपून राहात नाहींत; त्याप्रमाणं या आपल्या पत्नी आहेत, ही गोष्टही याना पाहिल्याबरोबर लपून राहाणं शक्य नाहीं ! आकाश आणि निलिमा ! सूर्य आणि प्रभा ! चराचर आणि चिच्छक्ति, हीं जशीं तुल्यगुण जोडी आहे, त्याप्रमाणं आपण आणि आपल्या इन्दुताई अगदीं तुल्यगुण आहात !"

"ही स्तुति आहे कीं सत्य आहे बरं ?" इन्दु म्हणाली.

"ही स्तुति आहे, अन् सत्यही आहे ! मला माहीत आहे की, स्तुतीच्या डोळ्यांत सत्याचं तेज झळकत नाहीं ! पण जगात ज्याप्रमाणं कांहीं काहीं वेळा अतर्क्य अन् अकल्पनीय अशा गोष्टी घडून येतात त्या-प्रमाणं कधीं कधीं, पण बहुतेक क्वचित्‌च, खऱ्या स्तुतीच्या कोंदणांत सत्याची हिरकणी चमकतांना दृष्टीस पडते ! पाषाणहृदयांतूनही दिव्य निर्झरसंगीताचे नाद बाहेर पडून, नाजूक हिरवळींचीं भानें हरपून जातात, त्याप्रमाणं असत्याचा कठोर डाग लागलेल्या स्तुतीच्या हृदयांत-नंही सत्याचं संगीत बाहेर पडून श्रोतृवर्गाला आनंद होतो ! अन् त्याच सत्याच्या संगीतानं बेभान होऊन मन स्तुतीचे गोडवे गाऊं लागतं ! अन् म्हणूनच मी म्हणत्यें कीं, मी म्हणत्यें ती स्तुतीही आहे, अन् सत्यही

आहे ! ऊन व पाऊस यांच्या 'सोन्याहून पिवळ्या' संगमासारखा क्वचित्च दृष्टीस पडणारा, स्तुति व सत्य यांचा दिव्य संगम दुर्लभ आहे ! अन् तो दुर्लभ आहे म्हणून मनाला शब्दांनीं व्यक्त करावासा वाटतो !"

एवढें भाषण होईपर्यंत, तीं 'लेडीज रेसिडेन्सी' कडे आलीं; तेव्हां इन्दु कुसुमला म्हणाली–

"आमच्याकडे चला कीं जरा; थोडा वेळ बोलत बसूं"

कुसुमलाही इन्दूची ओळख–जन्माची ओळख ! – करून घ्यावयाची होती, त्यामुळें इन्दूच्या म्हणण्याला ती कबूल झाली.

थोडयाच वेळांत तीं कुमारांच्या घरीं आलीं.

इन्दु, कुसुम, कुमार ! – या तीन जीवांना एके ठिकाणीं पाहून, जणूं काय विश्वोद्यानात विकसित होऊन, आपल्या दिव्य परिमळानें दशदिशा दरवळून टाकणारीं 'जाई, जुई, मोगरा' मानवदेहात या जगात वावरत आहेत, किंवा दिव्याच्या नंदनवनाची या जगांत उभारणी करणारें हें विश्वाचें त्रिविध स्वरूप आहे, असा भास कोणाही रसिक हृदयाला झाला असता !

कुमारांची खोली म्हणजे सत्य, कला, सौंदर्य यांची मूर्तिमंत प्रतिमाच होती ! या तीन दिव्यत्त्वांचा त्यांच्या खोलींत त्रिवेणी संगम झाला होता ! एका बाजूला अत्यंत सुंदर अशी स्वतः कुमारानीं काढलेलीं तैलचित्रें टांगलेलीं दिसत होतीं. त्या चित्राच्या सौंदर्यावरून, चित्रकाराची काव्यमय कलाकुसर चटकन् रसिक डोळ्यांना भुरळ पाडीत होती ! एका कोपऱ्यांत सुंदर बाजाची पेटी होती. दिलरुबा, सतार, सारंगी व फिड्ल हीं वर खुंटयाना टागून ठेवलेलीं होतीं. दुसऱ्या एका कोपऱ्यात एका सुंदर कांचेच्या कपाटांत, अंतःकरणांत दिव्य कल्पना सांठवून ठेवाव्या, त्याप्रमाणें अत्युत्तम आणि दुर्मिळ अशीं सुंदर पुस्तकें व्यवस्थेशीर माडलेलीं दिसत होतीं.

गूढ, काव्यमय विचार वाचून, ऐकून किंवा दिव्य सौंदर्य पाहून अगर अत्यंत सुस्वर आलाप ऐकून, भावनाप्रधान मन ज्याप्रमाणें भावनावश होऊन पर्युत्सुक होतें, तद्वत् कुमारांच्या खोलींत पाय टाकल्याबरोबर, कुसुमचें काव्यमय, भावनाकुल हृदय आकर्षित झालें !

एखाद्या चित्रांच्या पुस्तकांतलीं चित्रें पाहून लहान मूल आनंदून जातें, परंतु त्या पुस्तकांतलें भडक रंगात असलेलें चित्र पाहून, ज्याप्रमाणें त्या रंगीत चित्रावर त्याचें मन आणि डोळे घटका घटका स्थिर होऊन आकर्षिले जातात, तद्वत् बाजाची पेटी, सतार वगैरे वाद्यें पाहून, ती त्यांच्याकडे एकसारखी न्याहाळून पाहूं लागली ! आणि शेवटीं तिनें बाजाची पेटी हातांत घेतली आणि त्याच्यावर स्वर काढण्यासाठीं ती भाता हालवूं लागली.

शांत जलाशयावर नाजूक वायुलहर नाचूं लागली म्हणजे निरनिराळे तरंग उत्पन्न होऊन त्याचा पृष्ठभाग कंपित करतात, तद्वत् निर्जीव पट्टयांवर तिचीं नाजूक बोटें फिरूं लागल्याबरोबर, निरनिराळे मधुर स्वर उत्पन्न होऊन, वातावरण निनादित करूं लागले !

सा रि म् प नि सां । सां नि् प म् रि सा.

या पट्टयांवरून तिचीं बोटे नाचूं लागली आणि बटन् खाली करतांच अंधाराच्या खोलीत विजेचा प्रकाश पडावा किंवा प्रियकराने आपल्या 'लाडकीचे' गुलाबी गाल आपल्या मुखानें प्रेमानें दाबताच, तिच्या मुखावर गुलाबाची लाली उमटली जावी, तद्वत् 'सारंग' राग दशदिशा निनादित करूं लागला ! लगेच तिच्या मुखातून 'जमुना तट राम खेले होरी' हें पद बाहेर पडलें ! दोन जीवाची प्रेमाच्या निःसीमतेमुळें एकजुळणी व्हावी त्याप्रमाणें बाजाच्या पेटीचा स्वर आणि तिच्या गळ्याचा स्वर, यांचा पूर्ण मिलाफ होऊन त्या स्वरमिळणीमुळें एक अद्वितीय, दिव्य आणि अवर्णनीय असें सुस्वर नादब्रह्म उत्पन्न झालें ! दोन जीव एकजीव होऊन, परस्परांच्या स्पर्शसुखाने अद्भुत झालेला अंतिम आनंद त्यांचीं अंतःकरणें तल्लीन करून टाकतो, त्याप्रमाणें पेटीचा व गाण्याचा आवाज एकजीव झाल्यामुळें, अत्यंत सुस्वर असें स्वरमिश्रण वातावरण हालवूं डोलवूं लागलें !

कुसुमचा आवाज अत्यंत मधुर होता, हें कुमारांना विमलकडून कळलें होतें. परंतु प्रत्यक्ष तिचें गायन ऐकून, त्याच्या मनाची स्थिति कादंबरींत प्रेमाचें वर्णन प्रथम वाचून, नंतर तोच अनुभव स्वतः प्रत्यक्ष जगात अनुभवणाऱ्या प्रेमळ हृदयासारखी झाली !

कुमार व इन्दु हीं दोघेंही उत्कृष्ट गाणारीं होतीं. दोघांचा आवाजही अत्यंत सुरेल होता. त्यांनीं शिक्षणही घेतलेलें होतें. तरी कुसुमच्या दिव्य गायनानें तीं दोघेंही मोहित होऊन गेलीं.

थोड्या वेळानें इन्दु 'कालिंगडा' राग तोंडानें म्हणूं लागली. कुमारांनीं दिलरुब्यावर—सा रि् ग म् प ध् नि सां । सां नि ध् प म् ग रि् सा हे कालिंगड्याचे आरोह, अवरोह काढून 'मोहे पिया मिलनको' हें पद वाजविण्यास सुरवात केली. कुमाराच्या हस्तकौशल्यानें उत्पन्न झालेलें अद्वितीय माधुर्य श्रवण करून, कुसुम मनात लाजल्यासारखी झाली ! म्हणून तिनें कुमाराना गाण्याचा आग्रह केला. कुमारांनी 'भैरवी' गाण्यास सुरवात केली.

नि् सा ग् म् प ध् नि् सां । सां नि् ध् प म् ग् रि् सा

या पट्ट्यांवर कुमारांचीं बोटें नाचूं लागलीं आणि त्यांच्या मुखांतून 'भैरवी' चे स्वर बाहेर पडले.

"मोरी नाहीं चले । पियारे" हें 'भैरवी' रागांतलें पद कुमाराच्या मुखांतून ऐकून कुसुम कुमाराकडे अनिमिष नेत्रानीं पाहूं लागली ! कुसुमचा आवाज वर सागितल्याप्रमाणें अत्यंत गोड होता. तिला शास्त्राची विशेष माहिती नव्हती, परंतु कुमाराच्या ठिकाणी ईश्वरदत्त गोड आवाजाची देणगी व प्रयत्नसाध्य शिक्षणाची जोड, यांची मिळणी झाल्यामुळें त्याचें गायन, वादन अत्यंत आकर्षक आणि श्रवणीय होत असे ! शिवाय काव्यमय अंतःकरणाची काव्यमयता गाण्यात प्रकट होण्यासाठी धडपड करीत असल्यामुळें, त्यांच्या गायनवादनात सुरेलता, शास्त्र आणि काव्य याचा मधुर त्रिवेणीसंगम होत असे ! या कारणानें श्रोतृवर्गाला त्या दिव्य स्वरसंगमात यथेच्छ अवगाहन करून, अंतिम आनंदाचा अनुभव घेतां येत असे !

नंतर कुमार, इन्दु यांनी भीमपलास, भैरव, पूर्वी, भूप, पिलु, दुर्गा, खमाज, बिहाग, देस, तिलककामोद, बागेश्री वगैरे बहुतेक रागांत गाणीं म्हटलीं. त्यांपैकीं कुमारांनीं तोंडानें कांहीं म्हटलीं, काहीं त्यांनीं बाजाच्या

पेटीवर, सारंगीवर, फिड्लवर हातानें काढलीं. कांहीं पदें इन्दु तोंडानें म्हणाली.

एवढें झाल्यावर कुमारांनीं एक शेवटचें पद म्हणण्यास कुसुमला आग्रह केला. त्या ' खास ' आग्रहास्तव कुसुमनें 'गिरिधर झुलत राधे' हें 'काफी' रागांतलें पद अत्यंत सुंदर रीतीनें म्हटलें, त्यावेळीं कुमार तिला आपल्या मुरलीची साथ करीत होते.

अशा तऱ्हेनें हा गायनवादनाचा कार्यक्रम संपला.

कुसुमचें तें दिव्य गायन ऐकून, कुमारांना अत्यंत अभिमान आणि आनंद वाटला ! त्या आनंदी अभिमानांत ते म्हणाले—

" सौंदर्य आणि संगीत या दोन दिव्य डोळ्यांचें तेज अखिल चराचराला दिपवून टाकून आपल्या अंकित करण्यास समर्थ आहे ! नाहीं का?"

"आपलं दर्शन होण्यापूर्वी, हे दोन्ही डोळे असून मी आधळी होतें; पण आपल्या दिव्य दर्शनाचं अंजन माझ्या डोळ्यात पडतांच माझे डोळे उघडले ! आणि ते ज्यावेळीं उघडले, त्यावेळीं माझ्या अंतःकरणात स्पष्ट प्रकाश पडला कीं, मला जर आपलं अंतःकरण प्रेमाच्या मोहनीनें काबीज करतां आलं—तर, तर— मी साऱ्या चराचराला माझ्या चरणाचा दास करून, माझ्या अंतःकरणावर प्रेम करायला लावीन ! आपलं हृदय मला काबीज करतां आलं आहे कीं नाहीं, याची माझ्या मनाला अजून पुरी खात्री नाहीं. पण आपण म्हणतां त्याप्रमाणं, आपलं अंतःकरण माझ्यावर आकृष्ट झालं आहे असं मानलं, तर आपल्याला मी असं विचारतें कीं, माझ्या सौंदर्यानं आपलं मन आकर्षण पावलं असंच मी समजावं का ? "

" कुसुम ! तुझं सौंदर्य अद्वितीय आहे, यात मुळीच संशय नाहीं ! पण तुझं म्हणणं असं आहे का, कीं नुसत्या सौंदर्यानं किंवा संगीतासारख्या एखाद्या कलेनं मन आकर्षून जाऊन, प्रेम करायला लागतं म्हणून ! मग तुझ्या सौंदर्यावर आणि संगीतावर सारं ब्रह्मांड कां ग प्रेम करीत असलेलं दिसत नाहीं ! तूं म्हणशील आकृष्ट होणं आणि प्रेम जडणं यांत फरक आहे. आकर्षणाची पराकाष्ठा म्हणजे प्रेम असं का तुझं म्हणणं आहे ? इतर जगाचं तुझ्या सौंदर्य-संगीतानं उत्पन्न केलेलं आंतरिक आकर्षण, प्रेमाच्या पायरीला पोंचण्याइतकं दिव्य नसेल, असंच ना तुझं म्हणणं ? "

"असं कुठं मी म्हणतेय् पण? आकर्षण व्हायला किंवा प्रेम उत्पन्न व्हायला मनाची पात्रता नको का? शरीरांत गुरफटलेल्या आत्म्याची प्रगति ज्या स्वरूपाची असेल, त्यावर त्याच्या हृदयाची आकर्षण पावून प्रेम करण्याची पात्रता अवलंबून असते. लहान मुलाला काव्य ऐकून, कोंबड्याला रत्न पाहून किंवा गाढवाला गायन ऐकून, कसलं बरं आकर्षण होणार आहे?" कुसुमनें उत्तर दिलें.

"आकर्षण होण्याला, प्रेम उत्पन्न होण्याला ज्या हृदयांत त्या भावना उत्पन्न व्हावयाच्या असतात, त्या हृदयाला तितकी पात्रता आली पाहिजे हें तुझं म्हणणें मला कबूल आहे. माझं प्रेम तुझ्यावर आहे, म्हणजे तुझ्यात असलेल्या सद्‌गुण, सौंदर्य व कला या त्रिगुणात्मक सद्‌गुणमूर्तीची खरी किंमत जाणण्याची माझ्या अंतःकरणाची पात्रता आहे, हेंच होय! म्हणूनच माणसावर एकापेक्षा अधिक हृदयांवर प्रेम करण्याचा प्रसंग, या गुणज्ञ पात्रतेमुळें येतो! खरं ना हें?

हृदय हृदयानें ओळखलें, जाणलें आणि त्याची त्याला किंमत कळून आली म्हणजे कोणत्याही मनुष्यनिर्मित अडथळ्यांच्या खडकाना न जुमानतां हा प्रेमाचा प्रवाह सुरू होतो! सौंदर्यप्रचीति, त्या सौंदर्यप्रचीतीची किंमत जाणण्याची रसिक गुणज्ञता आणि त्यामुळें उत्पन्न होणारें आतरिक आकर्षण, या त्रिपदीवर प्रेममूर्तीची स्थापना होते! प्रेमोद्भव व्हावयाला सौंदर्याच्या अस्तित्वाची आवश्यकता आहेच! मग हें सौंदर्य मानसिक असो, शारीरिक असो; पण या मर्त्य जगांत ज्याप्रमाणें आत्म्याला आपली प्रगति करून घ्यावयाला जड शरीराचा आश्रय करावा लागतो, तद्वत् या मर्त्य जगातल्या माणसांच्या मनांत प्रेम उत्पन्न व्हावयाला शरीरस्थ सौंदर्याची जरूरी असते! बरें नुसतें सौंदर्य असूनही भागत नाहीं, तर त्या सौंदर्याची किंमत जाणण्याची पात्रता अंगात पाहिजे आणि नंतर तें सौंदर्य मनावर दुर्दमनीय असें आंतरिक आकर्षण उत्पन्न करण्याइतकें दिव्य असलें पाहिजे, किंवा तितकें तें दिव्य आहे अशी मनाची खरी खोटी समजूत तरी झाली पाहिजे! प्रीतीच्या ताजमहालाचा सौंदर्यदर्शन हा पाया! सौंदर्यगुणग्रहण हा गाभा! आणि सौंदर्यजन्य आतरिक आकर्षण हा कळस होय!! या तीन भावना एकत्र आल्यावांचून हृदयांत

प्रेमोद्भव होणेंच शक्य नाहीं. एखादा सौंदर्यानें मोहून जाईल, पण या तीन स्थितींचा अनुभव त्याच्या मनाला आल्यावाचून त्याचें दुसऱ्या व्यक्तीवर प्रेम जडणें शक्य नाहीं !"

"मग सुंदर नसलेल्या माणसावर कुणाचं प्रेमच जडणार नाहीं तर ?" इन्दूनें विचारिलें.

"सुंदर म्हणजे काय ? जें ज्याला आवडतें तें त्याला सुंदर होय ! सागराला किंवा आकाशाला ज्याप्रमाणें मर्यादा नाहीं, तद्वत् सौंदर्यालाही मर्यादा नाहीं ! पूर्वजन्मांतल्या आणि या जन्मीच्या परिस्थितीच्या शिक्षणाच्या संस्कारांमुळें आत्म्याचा ज्या प्रमाणात बुद्धिविकास झाला असेल, त्या प्रमाणावर त्याची सौंदर्याची कल्पना अवलंबून असणार. म्हणूनच एकाला सुंदर तें दुसऱ्याला सुंदर वाटेलच, असें खात्रीनें सागतां येणार नाहीं. सौंदर्याची व्याख्या प्रत्येक व्यक्तीच्या आत्मिक प्रगतीप्रमाणें बदलत जाणारी आहे. परंतु ज्या व्यक्तीचें दुसऱ्यावर प्रेम जडतें, त्या व्यक्तीला त्या दुसऱ्यांत असलेल्या सौंदर्याचा, स्वतः ते सौंदर्य जाणण्याचा आणि त्या जाणण्यामुळें उत्पन्न होणाऱ्या आंतरिक आकर्षणाचा अनुभव आलेलाच असला पाहिजे ! मग तो त्याचा अनुभव इतराच्या मानानें कमी अधिक प्रतीचा असो.

पुरुषमनाला स्त्रीच्या मुखात, तर स्त्रीहृदयाला पुरुषाच्या हृदयांत सौंदर्य दिसेल ! एखाद्याला शरीरात आणि हृदयांतही सौंदर्य आढळून येईल. ज्याला तसा दुहेरी अनुभव येईल तो भाग्यवान् ! मनाला आनंद देणे हें सौंदर्याचे कार्य ! आपल्या मनाला जें सुंदर वाटतें, ते हें आनंद देण्याचें कार्य करतेच करतें !

अंतःकरणांत अशी एक तळमळ आयुष्यात एकदां तरी उत्पन्न होते कीं, जी ठराविक बंधनानीं मरून जात नाही किंवा जगातल्या ईश्वरानिर्मित नात्यांनीं शात होत नाही ! ही आंतरिक तळमळ शांत व्हावयाला, प्रेमाच्या अमृताची आवश्यकता आहे. हा प्रेमामृताचा प्याला मुखाला लावायला, पूर्वसंचितानुसार ईश्वरनिर्मित नात्यांचा हात उपयोगी पडत नाहीं ! तर कल्पनेच्या स्वर्गांत भिरीभिरी भटकणाऱ्या हृदयानेंच त्याच्या कल्पनासृष्टींत मनाच्या तन्मयतेच्या दिव्य क्षणांत भासमान होणाऱ्या अंतःकरणाला जगांतल्या

लपंडावामधून शोधून काढून, त्याच्या प्रेमळ हातानेंच तो अमृताचा प्याला ओंठाला लावून घेतला पाहिजे ! असें झालें तरच मनाची तळमळ शांत होईल, एरवीं होणार नाहीं ! सगळ्यांनाच हा हात लाभत नाहीं, ज्यांना लाभतो त्यांना तो आपल्या मालकीचा करतां येत नाही. कांहींना मालकीचा झाल्यासारखा भास होतो, पण तो भासच असतो, असा हा मर्त्य जगाचा न्याय आहे !

फुलपांखरासाठीं लहान मुलाची धडपड आणि या दिव्य अशा प्रेमासाठीं भावनाप्रधान मनाची धडपड, दोन्ही अगदीं सारख्याच आहेत ! फुलझाडावर फुलपांखरूं स्तब्ध बसलेलें पाहून, बालमनाला वाटतें कीं, आतां पांखरूं सापडलं म्हणून ! या भावी आनंदात तो त्याला पकडण्यासाठीं हात वर करतो, पण हाताचा स्पर्श होतो न होतो तोंच, ते भुर्रदिशीं उडून जातें ! प्रेमाच्या फुलपाखरासाठी असंच मन तळमळत असतं ! एखादे वेळी जगाच्या बागेत देहाच्या फुलझाडावर फुललेल्या हृदयाच्या फुलावर बसलेलें तें आढळते ! तळमळतं मन त्याला पकडून ठेवण्यासाठीं हात उचलतें, पण त्याला हात लागतो न लागतो तोंच समुद्रात असलेल्या बेटावर भटकणारा पक्षी दूर अंतराळांत उडून कायमचा दृष्टीआड व्हावा, त्याप्रमाणे ते दूरवर उडून जातें आणि घोर निराशेने मनाची केविलवाणी स्थिति होते ! ”

कुसुम आणि इन्दु, सूर्यकिरण दुसरीकडे कोठेही लक्ष न देता पृथ्वीकडे ज्या एकाग्रतेनें धावत येतात, त्या एकाग्रतेने कुमाराचें भाषण ऐकत होत्या. दोघींनाही कुमाराचा अभिमान वाटत होता ! एक प्रेमानें आणि जगाच्या दृष्टीनेंही त्याची झाली होती ! दुसरी मनाने त्याची झाली होती ! जगाच्या दृष्टीनें त्याची व्हावयाची होती ! इतक्यात कुमार पुढें बोलूं लागले—

“ आयुष्याच्या सागरातून अंतःकरणाची नौका वहात जात असतां विरुद्ध परिस्थिति, निंदा, अपमान, निराशा या भयंकर खडकावर दुर्दैवानें आपटून तिला भेग पडली म्हणजे ती नौका समुद्रांत बुडून जाऊं नये म्हणून ती भेग बुजविण्यासाठी हृदयनौकेवरचा नावाडी—जीवात्मा—तिला प्रीतीचें पाचर लावण्यासाठी धडपडत असतो ! पण दुर्दैवानें त्यात त्याला

यश आलें नाहीं, तर त्या नौकेसकट तो त्या समुद्रतळाशीं जाऊन बुडून मरतो ! असे किती तरी दुर्दैवी जीव जगांत मेल्याप्रमाणें जगत आहेत !

सामाजिक बंधनें, रूढ नीतिनियम, ठराविकाचे अडथळे यांच्या वादळी तुफानाला न जुमानणारा भावनाप्रेरित महत्तम आकांक्षांचा तेजस्वी, दैदिप्यमान सूर्य हृदयाकाशात तळपत असतो ! त्या महत्त्वाकांक्षास्वरूप सूर्यनारायणाला पकडण्यासाठीं जीवाची या जड जगतांत आटाआट चालू असते ! अशा या दैदिप्यमान सूर्याच्या प्रखर तेजापुढें कृत्रिम बंधनाचा काळोख पार नाहींसा होऊन जात असला तर त्यांत मुळींच नवल नाहीं !

अंग भाजलें म्हणजे अंगावर शीतल पाण्याची कारंजीं कोणींतरी मृदु हातानीं सोडावीं, जीभ कडु किराइतानें कडवट झाली कीं, खडीसाखरेचा खडा कोणीतरी प्रेमानें तोंडांत घालावा, भूक लागली कीं, कोणीतरी पोटभर जेवावयाला घालून आपणाला तें प्रेमानें भरवावें असें मनाला वाटतें, त्याप्रमाणे या व्यावहारिक जगात निराशा, दुःख, अपूर्णता, अज्ञान या काळसर्पांचा दंश होऊन मन उद्विग्न होऊं लागलें म्हणजे त्याच्या सांत्वनाला, त्याच्या तीव्र वेदना नाहींशा व्हायला, प्रेमाच्या रामबाण औषधाची जीवाला जरूरी लागते ! प्रेम म्हणजे अशा वेदनांनीं तळमळणाऱ्या मनाला एक प्रेमळ आसराच आहे ! परंतु मनाची विपण्णता, मनाच्या तीव्र वेदना नाहींशा करणारें प्रेमळ हृदय या मर्त्य जगांत मिळविणें सोपी गोष्ट नव्हे ! आयुष्याच्या ऐन उमेदीत असा एक ठराविक काळ येतो कीं, त्यावेळीं नियमबंधनांच्या अटकेपार असलेल्या शब्दातीत दिव्यत्त्वाकडे मन आकर्षण पावतें ! हें आकर्षण म्हणजे प्रेम व दिव्यत्त्व म्हणजे हृदयाची प्रणयप्रतिमा होय ! हें प्रेम आणि प्रणयप्रतिमा ज्या जीवाला सापडतात तो जीव या जड जगांतही दिव्याचें नंदनवन निर्माण करतो ! सत्यसृष्टींत ही प्रतिमा त्याला लाभली नाहीं, तरी त्याच्या कल्पनासृष्टीत नेहमीं ती दृश्यरूप घेऊन त्याच्या निराश मनाला प्रीतीच्या नाजूक विलासांनीं आनंदसागरांत पोहवीत असते ! आणि त्याच्या सुदैवानें त्याला त्याची ही प्रणयप्रतिमा सत्यसृष्टींत दृष्टीस पडली, तर ती आपल्या मालकीची करण्यासाठीं चाललेली त्याची धडपड, जगाच्या साऱ्या धडपडींत अत्यंत उच्च स्वरूपाची, अतएव स्तुत्य आहे ! पण ही त्याची धडपड बहुतेक निरुपयोगी ठरते आणि जग म्हणजे निरा-

शेचा बाजार, सहारा वाळवंट, मृगजळ अशी बिचाऱ्या दुर्दैवी जीवाची दृढ समजूत होऊन, एकांताच्या संगतींत निराशेचीं रडगाणीं गात गात बिचारा या जगाच्या जंगलांतली पायपीट पुरी करून अखेरीस आपल्या जड जीविताचा शेवट करतो ! बिचाऱ्याचें हृदय म्हणजे काजळी ढगांनीं व्यापलेलें आकाश ! निराशेची रखरखीत रेती पसरलेलें सहारा वाळवंट, क्रूर श्वापदांनीं व्यापलेलें निर्जन अरण्य ! तें आकाश शुक्राच्या चांदणीसाठीं ! तें वाळवंट गोड जलाच्या थेंबासाठीं, आणि तें अरण्य पुष्पविकसित लतांसाठीं धडपडत असतें ! ज्याला हीं सर्व लाभतात तो दैववान् ! देवाचा आणि दैवाचा दोस्त होय ! ज्याला लाभत नाहींत तो दुर्दैवी ! देवाचा आणि दैवाचा दुष्मान होय !!

माझ्या अपरिमित भाग्यामुळें माझ्या अंतःकरणाचें निरभ्र आकाश इन्दुसारखी तेजस्वी तारका सुप्रकाशित करत असतां, तिच्या जोडीला त्या आकाशाला दिव्य उजाळा देण्याकरतांच कीं काय, त्यांत कुसुमच्या रूपानें शुक्राची चादणी चमकत आहे ! माझ्या हृदयोद्यानांत इन्दुसारखी पुष्करणी प्रीतीचें गुलाबपाणी फुलझाडांना पुरवीत असतां, तिच्या जोडीला कुसुमच्या रूपानें जिवंत झऱ्यांची निर्झरिणी मंजूळ झुळझुळ गीत गात आहे !! माझ्या हृदयनगरींत इन्दूच्या रूपात तापल्या रस्त्यावर पावसाचें थंडगार पाणी पडत असतांही त्याला मदत म्हणून कुसुमच्या रूपानें वाळामिश्रित शीतल पाण्याचीं कारंजीं उडत आहेत !! या राजैश्वर्यापुढें ब्रह्मांडाचें स्वामित्वही तुच्छ आहे !!!—

असें म्हणून कुमारांनीं, आकाश कधीं कधीं सूर्यकलेला आणि चंद्रकलेला एकदम एकाच वेळीं हृदयाजवळ धरतें, त्याप्रमाणें इन्दूला आणि कुसुमला आपल्या आकाशासारख्या विशाल हृदयाजवळ एकदम एकाच वेळी भिडविलें ! !

त्या दोघी लाजल्या ! पण ती लाज सांध्यछटेसारखी क्षणिक होती ! प्रीतीच्या ऐक्यात, दिव्याच्या नंदनवनांत इतर दुसऱ्या भावना सूर्याच्या तेजात चंद्रप्रकाश नाहींसा व्हावा, त्याप्रमाणे नष्ट झाल्या ! आणि ते तीन जीव या मर्त्य जगात दुर्मिळ असलेल्या अक्षय् अशा ब्रह्मानंदाचा अनुभव घेऊं लागले !

## कुंज १६ वा

कुसुम आपल्या खोलींत आली तेव्हां तिला रोशननें तिच्या मांवाचें एक पाकीट आणून दिलें. कुसुमनें लागलीच तें वाचण्यास सुरवात केली; तें तिच्या वडिलांकडून नगरहून आलें होतें.

'कांही महत्त्वाच्या कामाकरिता ताबडतोब इकडे निघून ये'–असा त्या पत्रांतला मजकूर वाचून कुसुमचा जीव घाबरा झाला! सुंदर गुलाबाचें फूल हातात बराच वेळ दाबून धरल्यामुळें मलूल दिसावें, तद्वत् इतका वेळपर्यंत आनंदी दिसत असलेलें तिचें सुंदर मुखकमल भलभलत्या विचारांनीं निस्तेज दिसूं लागले! रोशनच्या मनाला हा फरक जाणवला! म्हणून ती तिला म्हणाली "काय ग! कुणी आजारी बिजारी आहे का तुझ्या घरीं?"

"काय की बाई! पण तसं कुणी आजारी असतं, तर मला बापूंनी कळवलं असतं कीं!"

"इतके दिवस तूं इकडे राहीलीस म्हणूनही कदाचित् तुझ्या आईनीं तसं लिहायला सागितलं असेल त्याना; मला तर असंच वाटतं बरं का."

"तसंही असेल, नाहीं असं नाही; मी घरीं लवकर यावं म्हणून ताईनंच असं कांहीं तरी त्याना सागितलं असेल लिहायला. तसं असलं तर कांही हरकत नाही. आता मला उद्या गेलंच पाहिजे बरं का नगरला. रोशन! तूं येतेस काग माझ्याबरोबर नगरला?

"हो, तूं ये म्हणत असलीस तर येते की मी. पण तुझ्या घरीं आवडेल ना ग मी आलें तर?"

"रोशन! काय विचारतेस ग, हें तूं? आमच्या घरीं कुणीही 'ऑर्थाडॉक्स' 'मेन्टॅलिटी'चे नाहींत बरं का!"

"मग तुझ्याबरोबर यायला मी एका पायावर तयार आहें. आतां सुद्धां मी येतें पाहिजे तर!"

"तूं यायला तयार असलीस तर नवल काय?"

" का बरं ? "

" मला काय ग, विचारतेस ' कां बरं ' म्हणून ? आपल्या मनालाच विचार कीं ! "

रोशनला याचा कांहीं अर्थ कळेना ! म्हणून ती जरा बिचकल्यासारखी झाली !

" आतां कशाला माहीत असलं तरी माहित असल्यासारखं दाखवशील तूं ? " रोशन गप्प बसलेली पाहून कुसुम म्हणाली.

" कुसुम ! भलती थट्टा नको गडे ! काय तें अगदीं स्पष्ट बोल, बोल ना ग. "

" बोलूंच का ? रागवायची नाहींस ना ? "

" नाहीं रागवायची, बोल ना तूं "

" अग तुला बॅरिस्टरसाहेबाना भेटायचं असेल; होय ना ग ? "

दिवा पेटवल्यावर प्रकाश पडावा त्याप्रमाणें आतां कोठें तिच्या अंतः-करणांत कुसुमच्या बोलण्याचा प्रकाश पडला ! तिला त्या दिवसाची—कुसुमच्या बोलण्याची—आठवण झाली ! त्या आठवणीनें, हाताचा स्पर्श होताच लाजरीचें पान पटकन् मिटतें, त्याप्रमाणें ती एकदम लाजल्यासारखी झाली !

हें पाहून कुसुम म्हणाली, "अजून त्यांचं दर्शनही झालं नाहीं, तर इतकी लाज ! मग त्याचं दर्शन होऊन बोलण्याचा प्रसंग आला म्हणजे किती ग लाजशील कुणाला ठाऊक ! "

हें ऐकून रोशन म्हणाली—

" थट्टा नको गडे आता ! आपल्याला उद्यां जायचंय् ना ? चल तर सामानसुमान बांधून ठेऊं या. उद्यां मग घाई होईल. "

असें म्हणून रोशन सामानाची व्यवस्था करण्यासाठीं आपल्या खोलींत गेली.

* * * *

कुसुम, रोशन नगरला येऊन आजचा हा तिसरा दिवस. कुसुम आली त्याच दिवशीं बॅरिस्टर विश्वासराव तिच्या घरीं आले होते. कुसुमनें त्यांची व रोशनची ओळख करून दिली. बॅरिस्टरसाहेब त्या दोघींशीं अत्यंत सभ्य

रीतीनें वागले; त्यामुळें कुसुमही त्याच्याशीं, पूर्वीचें सर्व पार विसरून जाऊन अगदीं सौजन्यानें वागली.

बॅरिस्टरसाहेबांच्या वागणुकींतल्या ह्या फरकाचें कारण बापूसाहेबांनीं कुसुमला सविस्तर सांगून टाकलें तें असें—

कुसुम आपली पत्नी होणें अगदीं अशक्य गोष्ट आहे, हें विश्वासरावांना बापूसाहेब आणि त्यांच्या पत्नी ताई यांच्या वागणुकीवरून पूर्णपणें समजून चुकलें ! शिवाय त्यामुळें त्यांच्या मनालाही आतां असें वाटूं लागलें कीं, आपण आपलें आयुष्य चैनींत, व्यसनांत फुकट न घालवितां कांहींतरी सत्कार्य करण्यामध्यें खर्च केलें असतें, तर कुसुमच्या आईवडिलांनीं आपल्या म्हणण्याचा –कुसुमला आपली पत्नी करण्याचा– निदान विचार तरी केला असता; पण तो विचारसुद्धां हल्लींच्या आपल्या परिस्थितींत त्यांना करतां येणं शक्य नाहीं ! त्यामुळें आपल्याला यापुढें तरी आपलें आयुष्य सुधारतां येणें शक्य आहे कीं नाहीं, हा एकच विचार एकसारखा त्यांच्या मनांत येऊन त्याना काहीं सुचेनासें झालें ! विचार करता करतां एक गोष्ट प्रामुख्यानें त्यांच्या मनासमोर उभी राहिली ती ही कीं, आपण कुसुमसारख्या सर्वगुणसंपन्न मुलीचा नाद सोडला तरच बापूसाहेब आपल्याला आपल्या पायासमोर उभे करतील, एरवीं नाहीं ! हा नाद सोडणें आपणाला अशक्य आहे असें प्रथम त्यांना वाटलें; पण बरेच दिवस त्याच्यावर विचार केल्यावर त्यांच्या मनाला असें वाटूं लागलें कीं, आपण जर कुसुमशीं आपल्या बहिणीप्रमाणें वागण्याचा प्रयत्न केला, आणि तिची आपल्याविषयींची गैरसमजूत दूर केली, तर ती आपल्याशीं बोलण्याचालण्याला टाळाटाळ करणार नाही. कुसुम येईपर्यंत हाच विचार त्याच्या मनात एकसारखा येत होता. शेवटी त्यानीं असा निश्चय केला कीं, आपण एखाद्या दुसऱ्या मुलीबरोबर विवाह करावा आणि नंतर कुसुमशीं ओळख करून घ्यावी. असें केल्यावर खात्रीनें कुसुम आपल्याला टाळण्याचा प्रयत्न करणार नाहीं. या विचारानें त्याच्या मनाला थोडासा आनंद झाला !

एके दिवशीं बापूंजवळ विश्वासरावानीं आपलें अंतःकरण उघडें केलें आणि कुसुमसारख्या मुलीला आपली पत्नी करून घेण्याचा आपण भलताच नाद धरला होता वगैरे गोष्टी त्याना स्पष्टपणें सागून, त्यानीं त्यांची

अंतःकरणपूर्वक क्षमा मागितली ! बापूसाहेबांनीं त्यांचें चार गोड शब्दांनीं शातवन करून आपलें आयुष्य सुधारण्याचा उपदेश केला. त्या दिवसापासून विश्वासरावांना आपला पुनर्जन्म झाल्यासारखें वाटूं लागलें ! आणि त्यामुळें बापूसाहेबांकडे ते नेहमीं येऊं जाऊं लागले.

कुसुम आल्यावर बापूसाहेबांनीं ही सर्व हकिकत तिला कळवून त्यांच्या स्वभावात, वर्तणुकींत कसा फरक पडत चालला आहे तें सांगितलें. ही हकिकत ऐकून कुसुमला आनंद झाला. कारण विश्वासराव चांगले सुधारले तर रोशन त्यांच्याशीं विवाहाला कबूल होईल. एरवीं होणें शक्य नाहीं; आणि तशा न सुधारल्या स्थितींत तिनें त्यांच्याशीं लग्न करणे आत्मघातकीपणाचें होईल, हें कुसुमला चांगलें माहीत होतें. त्यामुळें विश्वासरावांच्या मनोवृत्तींत आपल्यामुळें असा बदल झाला, हें ऐकून तिला थोडा अभिमानही वाटला.

ही सर्व हकिकत कुसुमनें रोशनला कळविली. रोशन ही कुसुमप्रमाणें भावनाप्रधान मुलगी नव्हती. ती इतर शंभरजणींप्रमाणें व्यावहारिक मनोवृत्तीची सालस, सद्गुणी मुलगी असल्यामुळें विश्वासरावासारख्या तरुणाशीं लग्न करावयाला ती कबूल झाली, यांत काहीं आश्चर्य करण्यासारखें नाहीं !

संध्याकाळी पांच वाजतां बॅरिस्टर बापूसाहेबांकडे आले. ते लागलीच रोशन, कुसुम याना घेऊन विशेष रहदारी नसलेल्या बाजूला बरेच दूरपर्यंत फिरावयास गेले. या दीड, दोन तासाच्या सहवासांत कुसुमला स्पष्टपणें कळून आलें कीं, विश्वासराव आणि रोशन यांचें आयुष्य एकमेकांच्या संगतींत पूर्णपणें सुखांत जाईल, इतकेंच नव्हे तर विश्वासराव रोशनच्या सहवासात चांगले सुधारतीलही !

संध्याकाळीं परत आल्यावर बॅरिस्टरसाहेब बापूसाहेबाकडेच जेवावयाला राहिले. कुसुम, रोशन, बापूसाहेब आणि विश्वासराव ही सर्व मंडळी एकदम एके ठिकाणींच जेवावयास बसली. जेवतांना कुसुमनें आपल्या कॉलेजातल्या मौजा सांगून प्रत्येकाला हंसावयास लाविलें. यावेळी बॅरिस्टरसाहेबांची पूर्ण खात्री झाली कीं, शिक्षणाच्या मानानें कुसुम फारच बहुश्रुत, विद्वान् असूनही तिला आपल्या ज्ञानाचा, सद्गुणाचा, सौंदर्याचा कसला

म्हटल्या कसलाही गर्व नाहीं ! यामुळें विश्वासरावांना तिच्याबद्दल कौतुक आणि अभिमानही वाटला !

रोशनही मधून मधून बोलत होती. रोशनविषयीं बापूसाहेब, वसुमति-ताई वगैरे मंडळीचे चागलें मत झालें आणि तीही त्यांच्याशीं गप्पागोष्टी करूं लागली.

जेवण झाल्यावर विश्वासराव आपल्या घरीं गेले.

* * * *

दुसऱ्या दिवशीं जेवण आटोपल्यावर बापूसाहेबांनी कुसुमला आपल्या खोलींत बोलावून नेलें आणि आपण 'ताबडतोब निघून ये' असें पत्रात कां लिहीलें तें सर्व सविस्तर सागण्यास सुरवात केली. त्याचा सारांश असा—

नागपूरचे दिवाणबहाद्दूर राजवाडे, शिक्षण खात्याचे मंत्री, यानीं आपल्या आय्. सी. एस्. मुलासाठीं कुसुमबद्दल बापूसाहेबाकडे मागणी घातली होती. दिवाणबहाद्दूर राजवाडे यांचे घराणें पिढिजात श्रीमंतीचें असून, त्या घराण्याचा लौकिक संपत्ति आणि विद्वत्ता या दोन परस्परविरोधी दैवी देणग्यांच्या दुर्मिळ संयोगामुळें फारच वाढला होता ! स्वतः दिवाणबहाद्दूर एम्. ए., एल्एल्. बी., बॅरिस्टर असून त्यांनीं वर सागितल्याप्रमाणे, शिक्षणखात्याचें मंत्रिपद मंडित केले होतें. त्याचा एकूलता एक मुलगा प्रभाकर हा अत्यंत सद्गुणी, बुद्धिमान् असून नुकताच आय्. सी. एस्. परीक्षा पास झाला होता. रूपानेंही तो फार सुंदर होता. अशा प्रकारें सर्व-गुणसंपन्न तरुण आढळणें अत्यंत बिकट होतें ! त्यामुळें या स्थळाकडे सर्वांचे डोळे लागून राहिले होते ! अशी वस्तुस्थिति असता, प्रत्यक्ष मुलाच्या बापाकडून कुसुमला मागणी आलेली पाहून, बापूसाहेब आणि वसुमतिताई यांना आपल्या मुलीचा अत्यंत अभिमान वाटला असल्यास त्यांत काहीं नवल नाहीं ! कुसुमला योग्य पति म्हणजे राजवाड्याचा प्रभाकरच असें त्यांना वाटूं लागले; आणि या कल्पनेनें त्याना अतिशय आनंद झाला.

मुलाला कुसुमशिवाय सर्वांनीं पाहिलें होतें ! पण त्यावेळीं तो लहान होता. तरी त्यावेळच्या त्याच्या एकंदर आगलटीवरून तो पुढे अत्यंत सुंदर तरुण होईल ही त्याना खात्री होती. शिवाय तो आतां विलायतेहून आय्. सी. एस्. होऊन आला होता, त्यामुळें दुधांत साखरच पडली होती.

ताईंना तर कुसुम कधीं एकदां येते आणि या लग्नाला कबूल होते असें झाले होतें. परंतु बापूसाहेबांनीं सागितल्यावरून त्यांनीं या बाबतींत कुसुमशीं मौनव्रत धरिलें होतें. कुसुमला मात्र याचा नुसता संशयही आला नाहीं! आपण बी. ए. झाल्याशिवाय आपला विवाह करण्याचा विचार आपल्या आईबापांच्या मनात येईल, ही कल्पनाच मुळीं तिला झाली नाहीं! त्यामुळें बापूसाहेबांनीं तिला ही सर्व हकिकत सांगितली, तेव्हां तिला फार आश्चर्य वाटलें! आणि ती लागलीच त्याना म्हणाली—

" मला मुळीं बी. ए. झाल्याशिवाय लग्नच करायचं नाहीं! "

" बी. ए. होईपर्यंत नको करूं लग्न, तुला तसं करायचं नसलं तर! आपण त्याना तसं कळवूं म्हणजे झालं कीं नाहीं? आतां बी. ए. व्हायला वेळ का आहे? एका वर्षाचा अवधि. बी. ए. झाल्यावर तरी लग्न करणार की नाहीं ग कुसुम? आय्. सी. एस्. नवरा म्हटल्यावर इतर दुसऱ्या मुली लग्नाला अगदी उतावीळ होऊन गेल्या असत्या! पण मला माहीत आहे कीं, इतर मुली व तूं यात जमीनअस्मानाचा फरक आहे! बाहेरच्या भपक्याला भुलण्याइतकं तुझं मन चंचल नाहीं. तें सगळ्या गोष्टींचा पूर्ण विचार करणारं मन आहे! पण मुलगा नुसता आय्. सी. एस्. आहे असं नाहीं, इतरही सर्व गुण त्याच्यात परिपूर्ण आहेत. तो स्वभावानं अत्यंत सालस, मोकळ्या मनाचा आणि निगर्वी तरुण आहे; त्यामुळें आमच्याप्रमाणें तुलाही तो पसंत पडेल अशी आमची खात्री आहे. "

" बापू! तुम्ही काय सांगतां तें खोटं असं का म्हणतें मी? सुशील, सद्गुणी, त्यातनं आय्. सी. एस्.! असा माणूस लाखांत एकही सांपडणं शक्य नाही! पण एवढ्याच गोष्टी विवाह करायला पुरेशा आहेत का? "

"याच्यापेक्षां आणखी ग काय पाहिजे तुला कुसुम?" बापूसाहेबांनीं आश्चर्यानें विचारिलें.

" त्याना मी पाहिलं सुद्धा नाहीं! मला तरी त्यांनीं कुठं पाहिलंय्? नुसत्या ऐकीव गोष्टींवर विश्वास टेवून लग्नासारखा महत्त्वाचा प्रसंग जुळविण्याचा प्रयत्न करणं, म्हणजे बाजारांत एक उत्तम जिन्नस विकायला आलाय् असं ऐकून, तो विकत घेण्याचा प्रयत्न करण्याप्रमाणं एक क्षुल्लक गोष्ट करण्यासारखं होणार आहे! विवाह ही चुटकीसरशी करण्यासारखी

क्षुल्लक गोष्ट नाहीं आहे ! ज्या दोन जीवांचा विवाह व्हावयाचा असतो, त्या दोघांना एकमेकांविषयीं आपलेपणा वाटायला नको का ? त्यांना एकमेकांचा स्वभाव कळायला नको का ? एकमेकांविषयीं माहिती नसलेल्या दोन जीवांना त्यांच्या सांपत्तिक स्थितीकडे नुसतं लक्ष देऊन, लग्नबंधनानं एकेठिकाणीं आणणं म्हणजे दोन जनावरं पैशानं विकत घेऊन एकेठिकाणीं गोठ्यांत बांधण्यासारखं होणार आहे !

जगाच्या दृष्टीनं प्रभाकर आय्. सी. एस्. आहेत, विद्वान् आहेत, सुशील आहेत ! पण विद्वत्ता डिग्रीवर अवलंबून असते का ? तसं असतं तर सर्व आय्. सी. एस्. लोक शेक्सपियर, कालीदास, व्यास, वाल्मिकी यांच्यासारखे जगप्रसिद्ध झाले असते ! आय्. सी. एस्. ची किंमत माझ्या दृष्टीनं पैसे मिळविण्याचं एक सुशिक्षित साधन एवढीच ! एखादा व्यापारांत पैसा मिळवितो, एखादी वेश्या आपल्या सौंदर्याच्या जोरावर लाखाची धनीण होते ! त्याप्रमाणं—होय त्याप्रमाणंच—आय्. सी. एस्. या डिग्रीच्या जोरावर एखादा मान, पैसा व नाव मिळवतो एवढंच ! बाकी वर सांगितलेल्या दोन धंद्यांत अन् आय्. सी. एस्. या आधुनिक 'पॉलिश्ड' धंद्यांत मी म्हणतें काय फरक आहे ?

एखाद्या आय्. सी. एस्. ची बायको होऊन मिरवण्यापेक्षा, जगाशीं सहानुभूतीनं वागणाऱ्या, आपल्या बुद्धिसामर्थ्याच्या जोरावर जगाच्या विचारपद्धतींत क्रांति घडवून आणणाऱ्या एखाद्या प्रतिभावान् आणि लहानथोरांशीं समदृष्टीची वागणूक ठेवणाऱ्या तेजस्वी तरुणाशीं विवाह करून, अंतिम आनंदाचा अनुभव घेणं माझ्या दृष्टीनं तर जास्त अभिमानास्पद आहे !

"पण आधीं तूं त्याला पहा तरी, आणि मग बोल तुला काय बोलायचं आहे तें. प्रभाकर तूं म्हणतेस त्या प्रकारचा तरुण नसेल कशावरून ?"

"ते माझ्या म्हणण्याप्रमाणं असोत किंवा नसोत ! मी बापू, तुम्हांला अखेरचं अन् स्पष्टच सांगतें कीं, मला एव्हां लग्नच करायचं नाहीं ! लग्न करण्याची मला इच्छाच नाहीं ! मला लग्न करावंसं वाटूं लागलं, अन् माझ्या इच्छेप्रमाणं तरुण मला आढळून आला, तर त्याच्याशीं लग्न करायला मी आनंदानं कबूल होईन !"

"मग मी त्यांना काय कळवूं तर ?"

"तुम्ही त्यांना स्पष्ट कळवा कीं, आमची कुसुम लग्नाला तयार नाहीं ! तिला एव्हां लग्नच करायचं नाहीं, अगदीं अस्सं स्पष्ट तुम्ही त्यांना कळवा ! लग्नासारख्या महत्त्वाच्या बाबतींत भीडभाड हवीच कशाला मी म्हणतें !"

"पण या वर्षे दीडवर्षांत तूं लग्न नाहीं केलंस, तर हें स्थळ हातचं जाईल."

"गेलं तर फार छान होईल !"

"तुला पण या स्थळाविषयी इतका राग कां वाटावा ?"

"बापू ! मी तुम्हाला स्पष्टच सांगू का ? मी सांगितलं, तर मला तुम्ही क्षमा कराल ना ? कराल ना बापू मला क्षमा ?"

"कुसुम ! असं काय बरं करतेस तूं ? तुझी इच्छा नसली, तर नको करूं तूं त्याच्याशीं लग्न ! तुला काय सांगायचं आहे मला तें अगदीं न भितां न डगमगतां सांगून टाक, टाक बाळ ! तुझ्या सुखापुढं आम्हांला दुसरं कांहीं मोठं का आहे ? कुसुम ! तूं सुखी तर आम्ही सुखी ! बोल ना बाळ तुला काय सांगायूसवरायचं आहे तें !"

"बापू ! मी स्पष्ट बोलतें त्याची मला क्षमा करा ! माझ्या मनावर माझी मालकी नाहीं आहे ! तसं नसतं, तर मी या लग्नाला आपल्याला त्यांत सुख होणार आहे, या जाणीवेनं अगदीं आनंदानं तयार झालें असतें ! पण माझ्या मनावरच जिथं माझा ताबा नाहीं, तिथं मला तें दुसऱ्याच्या ताब्यांत कसं देता येईल बरं ?"

"कुसुम ! काय ग म्हणतेस तूं हें ? तुझं कोणावर प्रेमबीम तर बसलंय् नाहीं ना ?"

कुसुम बराच वेळ मुळींच बोलेना ! त्यामुळें बापूसाहेबाना वाईट वाटलें, आणि ते म्हणाले—

"कुसुम ! तुला जें सांगायचं आहे, तें मला स्पष्ट सागून टाक ! असल्या कामांत लाजबीज काय कामाची बरं ?"

"बापू ! सागूंच का ? तुम्ही रागवायचे नाहींत ना ? बापू ! माझे

प्राण मी त्यांना केव्हांच अर्पण केले आहेत ! त्यांचंही माझ्यावर प्रेम आहे ! "

" हे ते कोण ग ? " बापूसाहेबांनीं आश्चर्यानें विचारिलें.

" नंदकुमार ! " एवढे शब्द तोंडांतून बाहेर काढावयाला कुसुमला किती तरी वेळ लागला !

" ज्यांचं नांव आज संबंध महाराष्ट्रांत गाजत आहे, तेच का हे नंदकुमार ? ' रत्नकंकण ' नाटक लिहून त्यांनी आपलं नाव जगाच्या वाङ्मयांत अजरामर करून ठेवलं आहे ! "

" होय, बापू ! पण त्याच्या नाटकावरून दिसून येणाऱ्या प्रतिभावान् बुद्धिवैभवापेक्षां खरोखरच ते अत्यंत तेजस्वी गृहस्थ आहेत ! सूर्यासारखं त्यांचं तेज आहे ! पण वृत्ति फुलासारखी नाजूक अन् निर्मळ ! "

" मग त्यांच्याशीं तूं लग्न करायला तयार आहेस का ? "

" मी आहें तयार ! तेही पण आहेत माझ्याशीं लग्न करायला तयार !—पण !—

" पण—पण काय कुसुम ? बोल ना काय तें ! "

" बापू ! त्यांचं पहिलं लग्न झालं असून त्यांची पत्नी जिवंत आहे ! तिच्यावर त्यांचं जीवापलीकडे प्रेम आहे ! "

"मग त्यांना तुला आपली पत्नी कशी करून घेता येणार ग ? "

" त्याचा सर्व विचार आम्ही तिघांनीं केला आहे. माझ्या त्यांच्याशीं लग्नाला त्याच्या पत्नीची—इन्दुताईची—अगदीं मनापासनं कबुली आहे ! "

" पण कुसुम ! सवत जिवंत असतां तुला खरं सुख मिळणं शक्य आहे का ग ? "

"बापू ! सुख हें बाह्य परिस्थितीवरच अवलंबून असतं का ? खरं सुख मनावर अवलंबून असतं ! होय ना ? मग माझ्या मनाला या परिस्थितींतही सुख होईल अशी मला खात्री वाटत असली तर ! "

" माझी कांही हरकत नाही ! पण तिला तूं विचार. तिची अनुमती घे. तिनं तुला तशी अनुमति दिली तर छानच झालं ! पण मला नाहीं वाटत ती अशा परिस्थितींत तुला नंदकुमारांशीं लग्न करायला परवानगी देईलशी ! "

" बापू ! मी तुम्हांला वचन देतें कीं, मला आईनं हें लग्न करायला

कबुली दिली नाहीं, तर मी त्याच्याशी लग्नच करणार नाहीं ! माझ्या आईच्या सुखासाठीं एवढा स्वार्थत्याग मला करतां आला, तरच मी एवढं शिक्षण घेऊन सज्ञान झाल्याचा फायदा ! पण याचवेळीं मी तुम्हांला अगदीं स्पष्टच सागतें कीं, मला कुमारांशीं लग्न करतां नाहीं आलं, तर मी दुसऱ्या कुणाशींही लग्न करायला तयार होणार नाहीं ! त्यासाठीं मी आमरण अविवाहित राहीन ! तेवढं करायला वरीक तुम्ही सगळींजणं मला आपली अनुज्ञा द्या ! ''

एवढें बोलून कुसुमचा भावनावेग अत्यंत तीव्र झाल्यामुळें, ती रडकुंडीस आली ! बापूंच्या डोळ्यांना तें पहावेना ! म्हणून त्यांनीं तिला जवळ घेऊन तिचे डोळे पुसले ! आणि शेवटी ते तिला म्हणाले—

" कुसुम, बाळ तूं अत्यंत शहाणी मुलगी आहेस ! माझं भाग्य थोर म्हणून तर तुझ्यासारखं सद्‌गुणी कन्यारत्न माझ्या पोटीं जन्माला आलं ! नाही तर तुझा बाप म्हणवून घेण्याची माझी मुळींच पात्रता नाहीं ! तूं करशील तें सर्व विचार करून करशील याबद्दल मला कधींच संशय आला नाहीं ! पण तिची मात्र तूं कशी ती समजूत घाल एवढंच माझं तुला सांगणं आहे ! ''

असें बोलून बापूसाहेब एकदम खोलीबाहेर गेले.

त्याच दिवशीं दुपारीं चहाचे वेळीं नेहमींप्रमाणें कुसुम कोठें दिसेना म्हणून ताईचा जीव जरा घुटमळल्यासारखा झाला ! रोजचा क्रम म्हणजे कुसुम ही आपण होऊन न बोलावता, न सांगतां, प्रथम अगदीं चहाचे जागीं तयार असावयाची. परंतु आज चहा कपांत ओतला तरी ती कोठें दिसेना. यामुळें ताईची अगदीं धांदल उडाली ! थोडा वेळ त्यांनी तिची वाट पाहिली. परंतु ती अजूनही येत नाहीं असें पाहून, त्या कुसुमच्या खोलींत तिला पहावयास गेल्या. खोलींत येऊन पहातात तों कुसुम बिछान्यावर खालीं मान घालून रडत बसली आहे. ताईना हें डोळ्यांनीं बघवेना ! आपल्या उभ्या आयुष्यात कुसुमला कधीं म्हटल्या कधींच रडतांना त्यांनीं पाहिलें नव्हतें ! नेहमीं स्वछंदी फुलपांखरांसारखा तिचा आनंदी जीव, कसल्यातरी उद्योगांत गढून गेलेला असावयाचा ! ताईना विशेष वाईट वाटण्याचें कारण म्हणजे आपल्या प्रिय कन्येला प्रभाकरा-

सारख्या आय्. सी. एस्. तरुणानें मागणी घातली असतांही, ती अशी दुर्मुखली कां असावी याचा त्यांना उमज पडेना! कदाचित् तिला यांतली कांहीं माहिती नसावी असेंही त्यांना वाटलें. म्हणून त्या अगदीं तिच्याजवळ जाऊन म्हणाल्या—

"बाळ! काय झालं ग रडायला तुला? कपाळ का दुखतंय् तुझं?"

"आई! माझं कपाळ नाहीं ग दुखत! तुम्हां सगळ्यांना मी अगदीं नकोशी झालेंय्, होय ना ग आई? इतकं दिवस माझं प्रेमानं कौतुक करणारीं तुम्ही याचवेळीं कशीं ग अगदीं वैऱ्यासारखीं वागयला लागलांत? आई! मला माझ्या मनाविरुद्ध दुसऱ्याच्या ताब्यांत देऊं नका ग! यापेक्षां मी आपली आई! तुझ्याकडेच जन्मभर राहीन बरं!"

"कुसुम! काय बाळ बोलत्येस ग तूं हें? तुला आम्ही दुसऱ्याला देऊन टाकतों हें कुणी ग सांगितलं तुला? ते तसं बोलले काय? कुसुम सारं कळलं ना बाळ? तुला तें स्थळ पसंत आहे ना ग? मुलगा चांगला आय्. सी. एस्. आहे बरं! अन् शिवाय सुशील, तुला अभिमान वाटेल असा आहे अगदीं! मी पाहिलाय् बरं का त्याला लहानपणीं! कसा अगदी चित्रांतल्यासारखा दिसत असे! तूं पाहिलास आपल्या डोळ्यांनीं मग म्हणशील सारा जलम् याच्याच संगतीसोबतींत काढावा म्हणून! बाळ! तुझं भाग्य थोर—तुझं कसलं? आमचंच भाग्य थोर, म्हणून तर तुला अशांचा आसरा मिळतोय् बरं? उगाच रडूं नये बाळ हं!"

"आई! या शब्दानीं माझं शांतवन कसं ग होणार? जें मनातसुद्धा कधीं आलं नाहीं तेंच—अगदीं तेंच—तुम्ही सारींजणं मला करायला सांगताहांत! आई! दुसरं कांहीं मला सांग—साग आई!—पण या ठिकाणीं मला नको ग देऊं!

आई! मी मुलगी आहें, मला कळतंय् हें!—हिंदुघराण्यांतली मी गोगलगाय बनलेली मुलगी आहें मी! आईबाप देतील त्या ठिकाणीं आनंदानं जायला तयार होणं हा मुलीचा धर्म आहे, हेंही मला कळतं बरं आई! पण—आई मला इतकी शिकवलीस, सज्ञान केलीस, ती असा माझ्या मनाचा कोंडमारा करण्यासाठींच का ग?"

"तुझा कोंडमारा? आम्ही तुझा कोंडमारा केला? कुसुम यांत तुझा

कोंडमारा कसा केला ग आम्ही ? चांगली आय्. सी. एस्. ची बायको होणार आहेस अन् आम्ही ग तुझा कोंडमारा कसा केला? बरं तो नुसताच आय्. सी. एस्. आहे का? किती सद्गुणी, सुशील आहे ग तो! त्याच्यासारखं स्थळ शोधूनही मिळायचं नाहीं बरं, कुसुम! यांत तुझं आम्ही कल्याण करीत आहोंत का कोंडमारा करीत आहोंत, याचा तूंच विचार कर बाळ!"

"आई! तुमच्या दृष्टीनं माझं कल्याण होणार असेल ग! नव्हे तुमची तशी खात्रीही असेल, पण माझ्या—माझ्या दृष्टीनं आई—तुम्ही सारींजणं माझी मान कापत आहात ग! आई, गुलाबाचं फूल झाडावरनं तोडून काढून एखादा रसिक फुलदाणीत आणून त्याच्यावर पाणी शिंपडील, अन् तें जास्त चित्ताकर्षक करण्याचा प्रयत्न करील! पण त्या थाटमाटांत त्या फुलाला सुख आहे का ग? तें फूल झाडावर असताना जितकं टवटवीत, आनंदी अन् चित्ताकर्षक दिसतं, तितकं या बादशाही थाटांत दिसणं शक्य आहे का? सुख हें परक्याच्या डोळ्यांनीं पाह्यचं नसतं! तें स्वतःच्या हृदयानं भोगायचं असतं हो आई! तसं त्याला भोगायला मिळालं तरच तें खरं सुख, नाहीं का ग आई?"

"मग तुझं काय म्हणणं, की या घरी तुला सुख व्हायचं नाहीं, होय ना? असं का बाळ? असं का बरं वाटतं तुला?"

"आई! असं मला कां वाटतं तें मी तोंडानंच बोलून दाखवलं पाहिजे का ग? या स्थळांत मी मुळींच दोष काढत नाहीं बरं, आई! पण माझं मनच जिथं माझ्या स्वाधीन नाहीं, तिथं मी काय करूं ग आई?"

ताईना कुसुमच्या या बोलण्याचा अर्थच कळला नाहीं! म्हणून त्या कुसुमकडे आश्चर्यानें पाहूं लागल्या!

"आई! अशी आश्चर्याच्या परकीपणानं माझ्याकडे—या तुझ्या लाडक्या कुसुमकडे—पाहूं नको ग! आईच्या दृष्टींत आपुलकीचा प्रेमळपणा असायचा तो आज कसा ग तुझ्या दृष्टींत मला दिसत नाहीं बरं? आई! मी तुला परकी वाटतेंय् का ग? नाहीं ना?—नाहीं ना ग आई? मग माझं मन कसं ग तुला अजून अजूनीही कळत नाहीं आई?"

"कुसुम! तुला काय सांगायचं आहे तें उघड सांगून टाक बाळ!

तुझी इच्छा नसली या घरीं जायची, तर नाहीं बरं माझ्या बाळीला आम्ही दुःखाच्या खाईत लोटणार !"

"आई ! मला एव्हां लग्नच करायचं नाहीं ग !"

"एव्हां म्हणजे बी. ए. होइपर्यंत का ग ? मग तरी करणार ना बाळ ?"

"माझं मन जिथं जायला धडपडतंय् आई ! तिथं मला देशील तर—तर मोठ्या आनंदानं—मोठ्या उत्साहानं मी लग्न करायला तयार होईन ! नाहींतर—आई सांगूंच का ग तुला ?—मी मुळीं लग्नच करणार नाहीं ! हा माझा निश्चय मी मघांच बापूंना सांगूनदिखील टाकला ग !"

"तुझ्या मनाला भुरळ पाडणारा कोण ग हा माणूस ?"

"आई सांगूं का ? मला हंसायची नाहींस ना ? नाहीं ना हंसायचीस आई ?"

"कुसुम ? बाळ ! मुलीच्या मनाला आईच्या हृदयाविण अन्य आसरा आहे का ग ? मग आताच का बरं तुला इतका संकोच वाटला ? नेहमीं पुऱ्या भरवंशानं माझ्या—या आपल्या आईच्या कुशींत—मान ठेवून तूं आपलं हितगुज मला सांगत होतीस ना बाळ ? मग आतांच कसा ग तुला या तुझ्या आईच्या हृदयांत परकीपणा दिसूं लागला ? काय ग ? बोलत कां नाहींस ?"

"आई ! मातृहृदयाची थोरवी मी कशाला वर्णूं ? अन् वर्णीन म्हटलं तरी मला ते जमायचंही नाहीं ! आईचं अंतःकरण म्हणजे बालमनाच्या अखिल चराचर सृष्टीवर मायेचं पांघरूण घालणारं अनंत आकाश आहे ! जिथं जावं तिथं आकाश आपल्याबरोबर असतं नाही का ग आई ? शरीर सुखांत असो नाहींतर दुःखात असो, ज्याप्रमाणं आकाश त्याला कधींही सोडून जात नाहीं, त्याप्रमाणं मातृहृदयाच्या आकाशांत सुखदुःखाच्या ऊन-सावलीचा फरक पडत नाहीं ! सृष्टिमाता आपल्या निसर्गसोनुल्यांना, अंगाईगीत गाऊन प्रेमानं ज्याप्रमाणं आपल्या प्रेमळ हवारूप हातांनीं गोंजारीत असते, त्याप्रमाणं माताही आपल्या लाडक्या अर्भकांना आपल्या प्रेमळ हातांनीं थोपटून हंसवीत खेळवीत असते ! होय ना ग आई ? मग तुझ्याजवळ—या माझ्या आईजवळ—आपलं हृदय उघडं करायला मी कशी बरं लाजेन ग ?

तुझी अमर्याद माया माझ्या अंतःकरणपृथ्वीला अनंत आकाश आहे! तुझा प्रेमळ हात मला सृष्टींत भरून उरलेल्या हवेसारखा आहे ! तुझ्या डोळ्यांतलं वत्सलतेचें तेज हें मला माझ्या अंतःकरणाची तहान भागविणारं निर्मळ जळ आहे! अशा रीतीनं मला आकाश, हवा व पाणी हीं एकदम एका मातृहृदयांत सांपडत असताना माझं आनंदानं नाचणारं हृदय अबोल कां बरं राहील आई ? ''

" मग सांग बाळ! तुला काय सांगायच्‌बोलायचं आहे तुझ्या आईला, तें सांग बाळ साग !''

" आई! माझे पति मी तुझ्याआधी–तुम्हां सर्वांआधीं शोधून काढलेत ग! याबद्दल मला तुम्ही दोप देऊं नका ग! मी त्यांची परमेश्वरासारखी पूजा करीत आलें आहें! अशा प्रेमाच्या परमेश्वराला पायानं लाथाडून दौलतीच्या दगडाला देवासारखा मानून त्याच्या पायाचा आसरा घ्यायला तुम्ही मला कां ग आग्रह करताहात?

अमर्याद आकाश मर्यादित होण्यासाठीं क्षितिजाच्या संकेतस्थळीं येऊन, अवकाशाच्या उद्यानात विहरणाऱ्या वसुंधरेजवळ प्रेमाची याचना करितें, तद्वत्‌ त्याच्या अंतरींच्या अखंड अनुरागाचं अनंत आकाश, आपल्या अनंतत्त्वाचा अंत करण्याच्या इराद्यानं जगत्क्षितिजाच्या संकेतस्थळीं येऊन माझ्या जडदेहाच्या देवळांतल्या, त्यांच्या प्रीतीच्या पुण्याईनें पावन झालेल्या, पंचप्राण्यांच्या परमेश्वराजवळ अणुरेणूंचा आश्रय करणाऱ्या प्रेमचैतन्याची याचना करूं लागलें. अभाग्याच्या दारीं गंगा आली! पण मी भाग्याची मोठी ! होय ना ग आई ? म्हणून, शंकरानं गंगेला मस्तकात स्थान दिलं, तसा माझ्या अंतःकरणांतील शंकरानें त्या परमपावन प्रेमगंगेला आपल्या हृदयांत कायमचा आसरा दिला आहे.''

"कुसुम ! असलं काहीं बडबडूं नको बाई ! मला यांतलं अक्षरसुद्धां कळलं नाहीं बरं! गाढवापुढं गीता वाचून काय ग उपयोग?''

तात्काळ कुसुमच्या ध्यानांत आलें की, प्रेमाच्या प्रभावानें आपल्याला स्थळकाळमाणसाचा विसर पडून, आपल्या दृष्टीनें अत्यंत अर्थपूर्ण, पण आपल्या आईच्या दृष्टीनें अगदीं अर्थशून्य, बडबड इतका वेळ आपण चालविली होती! त्यामुळें ती आपल्या आईला म्हणाली–

"आई ! माझ्या बडबडीकडे लक्ष देऊं नको ग तूं ! माझ्या म्हणण्याचा अर्थ इतकाच कीं, त्यांनीं माझ्याजवळ प्रेमयाचना केली, अन् मी त्यांना माझें प्रेमसर्वस्व माझ्या देहामनासकट अर्पण केलं ! "

" हे ते कोण ग कुसुम !" ताईनीं कौतुकानें आणि आश्चर्यानें कुसुमला विचारिलें.

"ते माझे नंदकुमार ! – आई ! माझेच–ग ते बरं ! माझ्या अंतः-करणांतल्या अमर्याद अनुरागाच्या अणुरेणूला आनंदविणारे आदिनारायण ! माझ्या आयुष्याच्या अनंत आकांक्षांच्या अंतराळाचं अनादिअनंततत्त्व ! माझ्या देहाच्या देव्हाऱ्यांत दडलेल्या दगडाला दिव्यत्त्वाचा देवमार्ग दाख-विणारे देवदूत ! माझ्या पंचप्राणांतल्या पवित्र प्रीतितत्त्वाला पूर्णत्त्वास पोहोंचविणारे परमेश्वर ! माझ्या चित्तसृष्टींतल्या चैतन्याचें चालतं बोलतं चित्र आहेत ते ! "

" कुसुम ! पुन्हा तूं पूर्वपदावर आलीस कीं ग ! भाटासारखी काय बडबडते आहेस ? तुझ्यापुढं बसून ऐकणारी ही तुझी अडाणी आई आहे बरं का ग ! तिला तुझं तत्त्वज्ञान अन् शब्दपांडित्य काय समजायचंय ? तुझ्या भाषणांतलं ' ते नंदकुमार आहेत ' एवढंच काय तें मला कळलं ! हे नंदकुमार कोण ग ? ज्यानीं म्हणे एक अत्यंत सुंदर नाटक लिहीलंय् तेच का ग हे तुझे नंदकुमार ! मग छान माणूस शोधून काढलास अगदीं ! मग दोघेजणं बसा आयुष्यभर अशीं सारखी भाटासारखीं बडबडत ! मग तुला आमची आठवण तरी येईल का ग ? ते काय करतात ग, कुसुम ? "

" ते काय करीत नाहींत तेंच मला विचार तूं आई ? त्याच्या अंतः-करणांत थारा नाहीं, अन् जें ते आचरणांत आणत नाहींत, असा एकही विषय तुलाआम्हाला शोधून सापडायचा नाहीं ! पण तसं तुला सांगाय-चंच म्हणजे या व्यावहारिक जगात ते वकील म्हणून प्रसिद्ध आहेत बरं आई ! "

" मग त्याच्याबरोबर लग्न करायला तूं अगदीं तयार आहेस तर ! होय ना ग कुसुम ? "

" आई मी आहें त्यांच्याशीं लग्न करायला तयार ! अन्–अन् तेही

आहेत ग आई माझ्याशीं लग्न करायला तयार! पण आई! या लग्नाला तुझा मला शुभाशीर्वाद पाहिजेय् ग !"

"माझ्या बाळीला या लग्नाला माझा अगदीं अंतःकरणापासूनचा आशीर्वाद आहे बरं! पण तुला ते पसंत आहेत ना ग? त्यांच्या सहवासांत तुला सुख होईल असं वाटतं ना?"

"होय वाटतं आई? वाटतं कां? माझी पुरी खात्री आहे तशी, आई!"

"मग तुझ्या मनाला आशीर्वाद द्यायला मी बरी नाहीं तयार होणार ग? बेशक् कर तूं त्यांच्याशी लग्न; पण ते कोणत्या जातीचे आहेत ग?"

"हवेला ज्याप्रमाणं रंग, रूप नाही, त्याप्रमाणं ते जात, धर्म काहींही मानीत नाहींत! मानव्य ही त्याची जात! अन् सत्य हा त्यांचा धर्म आहे! कळलं ना आई तुला?"

"कुसुम! काय ग बोलत्येस तूं हें?"

"आई! मी खरं तेंच बोलत आहें ग; यात एकही शब्द खोटा नाहीं बरं का!"

"तुला बरं दिसेल तें तूं कर बाळ! आम्ही तुला आणखी काय बरं सागणार?"

"पण–पण–आई त्यांचं–त्यांचं........."

पुढचा शब्द कुसुमच्या तोंडातून बाहेर पडत नाहींसा पाहून ताई म्हणाल्या–

"काय ग! मधेंच का ग थांबलीस अशी? त्यांचं काय झालं?"

"आई सांगूं का ग? रागावणार नाहींस ना? नाहीं ना रागावणार आई? खरं साग ग! माझी शपथ आहे तुला नाहीना रागावणार तूं– नाही ना ग?"

असें म्हणून कुसुमनें एकदम आपल्या आईच्या कुशीचा आश्रय केला! ताईनी तिला अत्यंत प्रेमानें आपल्या हृदयाजवळ धरिली! आणि त्या तिला म्हणाल्या–

"कुसुम बोल ना बाळ? असं काय ग करत्येस बरं–सांग ना तुला काय सांगायचं बोलायचं आहे तें; टाक ना सागून! असं अगदीं वेडया-

सारखं काय करावं बरं ? मी का कुणी परकी का आहे ! मी तुझी आई ना? आईला मूल घाबरतं कां? भितं का बाळ? मग मला सांगायला कां बरं एवढी तूं घाबरल्यासारखी झालीस अगदीं? सांग बाळ! तुला काय सांगायचंय् तें! मुळीं भिऊं नको अगदीं!"

या मायेच्या शब्दानीं कुसुमच्या मनाला धीर आला आणि ती एकदम म्हणाली—

"आई! त्यांचं—माझ्या कुमारांचं—लग्न झालंय् ग!"

विजेचा कड्कडाट होताच लहान मूल भयभीत व्हावें, तद्वत् कुसुमच्या या शब्दांनीं ताईच्या मनाची स्थिति झाली! बराच वेळपर्यंत ती स्तब्ध—अगदी स्तब्ध बसून राहिली! एवढया वेळात कोण कोणाशीं बोललें नाहीं! कुसुम आईच्या कुशीत तशीच मान ठेवून पडली होती! दोन पानवेली एकमेकाच्या अंगाभोंवतीं विळखा घालून रहाव्या, तशीं ती एकमेकांना घट्ट धरून बसलीं होती!

थोडया वेळानें ताईनींच बोलावयास सुरवात केली—

"कुसुम! कसं ग हें विष तूं माझ्या हृदयावर ओतलंस? एक बायको जिवंत असलेल्या माणसाशीं लग्न करायला मी—ही तुझी आई—तुला अनुमति देईन, असं तुला वाटलं तरी कसं ग? त्याचं—तुझ्या कुमारांचं—लग्न झालं नसतं किंवा त्याची बायको जिवंत नसती, तर मोठ्या आनंदानं मी तुझ्या लग्नाला कबुली दिली असती! पण या परिस्थितींत मी तुला लग्न लाव, म्हणून सागणं म्हणजे तुझ्या नेसत्या पातळाला काडी पेटवून लावण्यासारखं आहे ग कुसुम! मी या लग्नाला परवानगी देणं कालत्रयींही शक्य नाहीं! माझ्या परवानगीवाचून, माझ्या इच्छेवांचून अन् माझ्या आशीर्वादावांचून, तुला त्यांच्याशीं लग्न लावायचं असलं तर लाव; माझी कांहीं हरकत नाहीं! पण एवढं बरीक लक्षांत ठेव कीं, आपल्या स्वतःच्या सुखासाठीं दुसऱ्याच्या—या तुझ्या आईच्या—मनाचं सुख तूं काढून घेत आहेस, बरं का."

"आई! तुझ्या आशीर्वादाशिवाय, तुझ्या अनुज्ञेशिवाय मी त्यांच्याशीं प्राण गेले तरी लग्न करणार नाहीं, याची तुला खात्री असूं दे! तुझ्या

मनाला दुःख देऊन मला सुख भोगायची कधींच इच्छा झाली नाहीं! पुढेंही होणार नाहीं!

आई! पण एक मात्र मी तुला अखेरचं सांगतें कीं, या माझ्या लग्नाला कबुली दिली असतीस, तर तुझ्या, माझ्या, सर्वांच्या आयुष्याचं सोनं झालं असतं! पण मी तेवढ्या स्वार्थी मोबदल्यासाठीं तुझी विनवणी करणार नाहीं! ज्या दिवशीं आपण होऊन तूं या लग्नाला आपली अनुमति देशील त्याच दिवशीं, या जगांत मी जिवंत असलें तर, त्यांच्याशीं—होय! त्यांच्याशींच! माझ्या कुमारांशीं—लग्न लावायला मी तयार होईन! तोंपर्यंत अविवाहित राहण्याचा माझा निश्चय काळालाही बदलतां येणार नाहीं! हें मी तुला—आई तुला बरं! अगदीं शेवटचं सांगत आहें! एवढं बरीक करण्याची मला तूं परवानगी दिलीच पाहिजे!"

"कुसुम! मला नाहीं वाटत कीं, मी जिवंत असेपर्यंत तुला त्यांच्याशीं—त्यांची पहिली बायको जिवंत असतांना, लग्न करायला मी आपखुशीनें परवानगी देईन असं! पण तुझ्या इच्छेसाठीं तुला अविवाहित राहायला अगदीं नाइलाज म्हणून मी कबुली देतें!"

असें म्हणून कुसुमला दूर लोटून ताई घरांत निघून गेल्या! कुसुमला ब्रह्मांड आठवलें! डोळ्यापुढें आणि अंतःकरणांत काळोखाचें आकाश पसरल्यासारखा तिला भास झाला!! आणि ती तेथेंच जमिनीवर, एखादी केळ झंझावातानें कोलमडून पडावी, त्याप्रमाणें निश्चेष्ट पडली!!!



## कुंज १७ वा

आज कुमाराचा आनंद गगनात मावेना! आकाशाच्या अंतरंगांतील ध्येयसौंदर्याकडे आज अनंत काळ टक लावून पाहणाऱ्या विशाल गिरिशिखरांप्रमाणें, त्याच्या विशाल हृदयाचें गिरिशिखर आजवर नुसतें आपल्या उच्च ध्येयाच्या आकाशाकडे एकाग्रदृष्टीनें पहात होतें! परंतु आज त्या शिखराचा आणि आकाशाचा हृदयंगम संगम झाला होता!

आकाशांत सूर्यतेज चमकावें, तद्वत् त्याच्या अंतःकरणांत ध्येयाचें तेज चमकत होतें! व्यावहारिकतेच्या धुक्यामुळें त्याचें स्पष्ट तेज जगाच्या डोळ्यांना दिसलें नाहीं, तरी माध्यान्हीच्या सूर्याच्या तेजानें धुकें पार नाहींसें व्हावें त्याप्रमाणें त्याच्या ध्येयपूर्तीच्या उज्ज्वलतेनें व्यावहारिकतेच्या धुक्याचें पटल विरल होऊन आज त्याचें हृदयाकाश उच्च ध्येयतत्त्वांच्या तेजानें प्रकाशित झालें!

आज त्यांनीं कायद्याच्या कोर्टात अपूर्व विजय मिळविला होता! आपल्या अपार बुद्धिवैभवानें, कायद्याच्या ज्ञानानें आणि तेजस्वी, मुद्देसूद वक्तृत्वानें वसंतची केस जिंकून कायद्याच्या कोर्टाला त्यांनीं 'न्यायाचें कोर्ट' बनविलें, आणि तेथें हजर असलेल्या सर्व लोकाकडून—इतकेंच काय! पण स्वतः न्यायाधिशाकडूनही "कायदेशीर न्यायाला कायद्याच्या कचाटींतून सोडवून, न्यायनीतीच्या सिंहासनावर बसविणारा विजयी वीर!" असा किताब मिळविला.

ज्या ध्येयासाठीं त्यानी वकिलीच्या कामात हात घातला होता, तें ध्येय एका 'केस'मध्ये तरी, आपल्याला पुरें करता आलें, या सुखकर जाणीवेने त्याचें अंतःकरण अगदी आनंदून गेले!

न्यायाधिशाचा निकाल ऐकून, जगात ज्याप्रमाणें सत्याला मरण नाहीं त्याप्रमाणें योग्य मेहनत आणि प्रयत्नाची शिकस्त केली, तर कायद्याच्या कोर्टातही सत्याला मरण नाही हे तत्त्व अबाधित चालूं ठेवणें, खरोखरच

बुद्धिमान आणि प्रामाणिक वकिलाच्या हातांतली गोष्ट आहे, हें अगदीं स्पष्टपणें वकीलवर्गाला त्यांनीं सिद्ध करून दाखविलें !

या कामांत विनायक गजरेचा त्यांना फारच उपयोग झाला ! विनायकची जबानी इतकी मुद्देसूद, सडेतोड आणि खरीखुरी झाली कीं, त्या एका व्यक्तीनें आपल्या जबानींत दिलेल्या तेजस्वी उत्तरांनीं सर्वांचे डोळे आपणांकडे वेधून घेतले ! गजरेनेंही आपली कामगिरी योग्य रीतीनें बजाविली !

कुमारांनीं विनायक गजरेचें अंतःकरणपूर्वक अभिनंदन करून, ज्या त्यांच्या साहचर्याच्या जोरावर त्यांनीं त्याना कोर्टाच्या कामांत विजय मिळवून दिला, त्याच साहचर्याच्या जोरावर तुम्ही मला इतरही बाबतींत यश मिळवून द्या, असा त्याना कळकळीचा उपदेश केला ! विनायक गजरेला अगदीं धन्य धन्य झालें. वसंत तर आज अतिशय आनंदांत होता, हें सांगण्याची जरूरी आहे असें नाहीं ! त्याच्या शीलावर पडूं पहात असलेला डाग पार नाहींसा झाला होता !

शाळेंतल्या चालकानीं त्याना पुन्हां आपल्यांत घेण्याचा विचार त्यांना कळविला. परंतु त्यांनीं तें स्पष्टपणें नाकारिलें ! दुसरी एखादी आपल्या ध्येयाला धरून असलेली शिक्षणसंस्था स्थापन करून, त्या संस्थेंकरितां शिक्षक आणि मुलें आपल्या मतांना धरून चालतील अशीं मिळवावयाचीं असें त्यांनी तेथल्या तेथेंच ठरविलें !

या कामीं त्यांना विमल, इन्दू वगैरे मंडळी मदत करावयाला एका पायावर तयार झाली.

एके दिवशीं कुमारांनीं सर्वांना आपल्या घरीं चहाला बोलावून, त्या ठिकाणी या योजनेला मूर्त स्वरूप दिलें ! या समारंभाला उमाकाकू, रमावहिनी वगैरे मंडळीही हजर होती.

या गोष्टीला चार पाच दिवस झाल्यावर कुमाराना एक दिवस इन्दु म्हणाली—

" या सुटींत आपण कोंकणात जाऊंया गडे "

" जाऊं कीं ! आपल्याला तिकडे जाऊन बरींच वर्षे झालीं. तेव्हां

या सुटींत आपण अवश्य तिकडे जाऊंच. तुझेही दिवस आतां भरत आले आहेत!"

हें ऐकून इन्दू अगदीं लाजली! आणि लाजत लाजतच म्हणाली–

"माझ्यासाठीं नको कांहीं जायला!"

"इन्दु! तुझ्यासाठीं काय अन् माझ्यासाठीं काय एकूण एकच नाहीं का?"

"खरं ना हें?" असें म्हणून इन्दु कुमारांकडे अत्यंत प्रेमानें पाहूं लागली!

"असं काय अगदीं टक लावून पहात्येस ग?"

"काय म्हणजे? आपण खरं बोलतां कीं खोटं बोलता तें पहाण्या-साठीं पहात्येंय् अशी टक लावून बरं का!"

"इन्दु! तुझ्याजवळ मी कधी तरी खोटं बोललोंय् का ग?"

"नाथ! माझ्याजवळच काय, आपण कुणाशींही खोटं बोलत नाहीं याची मला पुरी खात्री आहे बरं! खोटं बोलणाऱ्या माणसाच्या तोंडावर आपल्या मुखावर चमकतं त्या प्रकारचं तेज चमकणंच शक्य नाहीं! आपल्या कुसुमच्या मुखावरही अगदीं असंच तेज चमकतं बरं!"

"खरंच का ग लाडके? कुसुमच्या–माझ्या लाडक्या कुसुमच्या–मुखा-वर जसं दिव्य तेज चमकत असतं तसंच–अगदीं हुबेहूब तसंच–माझ्या मुखावर चमकतं का ग?"

"होय गडे! मुख हा अंतःकरणाचं प्रतिबिंब दाखवणारा आरसा आहे हें जर खरं असेल, तर दोघांच्या मुखावरच्या तेजसादृश्यामुळं आपलीं अंतःकरणंही अगदीं एकाच सांच्याचीं बनविलीं आहेत असें म्हणायला कांहीं हरकत नाहीं! आपल्या मुखाकडे पाहून जो दिव्य आनंद माझ्या मनाला होतो, तसाच आनंद कुसुमच्या मुखाकडे पाहूनही होतो! याचं कारण काय बरं?"

"इन्दु! याचं कारण तुझं मन! तुझ्या मनाला कुसुमच्या मुखांत माझं मन दिसत असतं! हेंच त्याचं कारण! माझ्या प्रेमामुळं मला आवडणाऱ्या प्रत्येक गोष्टींत तुला मी दिसतों, आणि मी दिसतों म्हणून तुला ती गोष्ट आवडूं लागते, होय ना ग?"

" मला यांत कांहीं कळत नाहीं ! आपल्या दर्शनामुळं माझ्या मनाला जो आनंद होतो, अगदीं एकजात तसा आनंद, आपल्या कुसुमच्या दर्शनानं होतो ! "

" कुसुम ! माझी लाडकी कुसुम ! ! किती गुणी आणि गरीब पोर आहे ती ! नाहीं का ग ? "

" होय गडे ! फारच गुणी आहे ती ! "

" माझी कुसुम ! माझं नाजूक फूल ! "

असें म्हणून कुमारांनीं अत्यंत प्रेमभरानें इन्दूलाच हृदयाजवळ धरिली ! कुमाराचा यावेळचा प्रेमावेग इतका तीव्र होता कीं, त्या दृढालिंगनानें बिचाऱ्या इन्दूचा नाजूक जीव, शीतल पण जोरदार अशा वायुलहरींनीं गुलाबाच्या नाजूक पाकळ्या गुदमराव्या, तद्वत् गुदमरून गेला ! ' कुसुम ! लाडके ! काय ग कुसुम ? ' असा, त्या प्रेमाच्या उन्मादलहरींत सारखा जप करीत कुमारांनीं चंद्र आपल्या किरणांचा वर्षाव जलाशयावर करतो, तद्वत्, इन्दूच्या मुखावर चुंबनांचा वर्षाव केला ! !

* * * *

कोंकणात जाण्याचा कुमारांचा बेत नक्की झाला. सामान बाधलें गेलें; आणि कुमार व इन्दु दुपारच्या ' एक्स्प्रेस'नें मुंबईला आलीं. ती रात्र मुंबईला काढून कुमारांनीं दुसऱ्या दिवशीं सकाळीं साधारण नऊ, दहाच्या सुमारास आगबोटींत पाय ठेवला !

' टॅं, टॅं ' असा आवाज काढून अजाण अर्भक आपल्या आयुष्याची आगबोट जगाच्या समुद्रांतून चालू करतें, तद्वत् एक कर्णकर्कश किंकाळी फोडून कप्तानानें आगबोट समुद्रातून चालू केली !

कुमार, इन्दु 'डेक'वर जवळजवळ उभीं राहून अथांग सागराकडे, वृक्ष-लता आकाशाकडे पहातात, त्याप्रमाणें गूढ एकाग्रतेनें पहात होतीं ! आग-बोटीच्या हालचालीनें, वातावरणांत उत्पन्न झालेल्या वाऱ्याच्या झोतामुळें आनंदानें अंतःकरण नाचावें, तद्वत् त्याच्या डोक्यावरचे काळे कुरळे केंस हवेंत भुर्भुर् उडत होते ! अचपळ आणि आडदांड अर्भकाला आवरतां आवरतां आईच्या अंगामनाची अगदीं तिरपीट उडते, त्याप्रमाणें वाऱ्याच्या जोरदार झोतामुळें आपले केंस व पातळ आवरतां आवरतां इन्दूची उडा-

लेली धांदल पाहून, कुमारांना हसूं आलें आणि ते तिला हंसत हंसत म्हणाले—

" वाऱ्याच्या झोतानं उडणारें स्वतःचं पातळ आणि केंससुद्धां तुला आवरतां येत नाहींत, तर पुढें लहान मुलांना कशी ग तूं सांभाळणार, इन्दु ? "

" अंतःकरणांतल्या मायेच्या पांघरूणाखालीं त्यांना लपवून ठेवीन मी, मग झालं ना ! पण इतक्यांतच त्याची काळजी कशाला बरं ! "

" पुढें घडणाऱ्या गोष्टींची माणसानें अगोदर तजवीज केलेली बरी, नाहीं का ? "

इतक्यांत एक जोराची वाऱ्याची झुळूक आली, आणि कुमारांचें मन आनंदून गेलें ! त्या आनंदांत ते म्हणाले—

" आगबोटींतल्या प्रवासाला सुरवात करण्यापूर्वी, आनंददायक वायुलहरींनीं मनाला ज्याप्रमाणें उत्तेजन आणि उत्साह यांचा लाभ प्राप्त होतो, त्याप्रमाणें आयुष्याच्या आरंभाआरंभास मन मोठमोठ्या महत्त्वाकांक्षांच्या, मनोरम मनोराज्यांच्या मोहनीनें मोहीत होतें ! पण आगबोट भर समुद्रांत आल्यावर हालूं लागली म्हणजे सारा उत्साह पार नाहींसा होऊन खालीं डोकें टेकावें असें वाटूं लागतें, त्याप्रमाणें मनांत बाळगलेल्या महत्त्वाकांक्षा आणि मनोराज्यांचे मनोरे दुष्ट परिस्थितीच्या वणव्यांत जळून खाक होऊन मुळासकट मोडून पडल्यामुळें डोळ्यापुढें अंधारी आली, कीं मनाचा पहिला आनंदी उत्साह पार नाहींसा होऊन, मन कुठेंतरी डोकें टेंकण्यासाठीं धडपड करीत असतें !

आगबोट आपलीं ठराविक बंदरें गांठून शेवटीं आपला प्रवास संपविते ! परंतु माणसाच्या जीवितनौकेला ध्येयाचीं बंदरें नेहमींच गाठतां येतात असें नाहीं ! बहुतेक तुफानी वादळामुळं बंदर सोडून आगबोट कुठेंतरी भरकटत असावी, तद्वत् आयुष्यनौका जगाच्या समुद्रांत निराशेच्या वादळी तुफानामुळें ध्येयांच्या बंदरांना टाकून कुठें तरी भरकटत असते ! आणि अशा भरकटल्या स्थितीतच ती आपला मार्ग संपवीत असते ! "

" पण मी म्हणतें ध्येयाला बंदर न समजतां खडक असें मानून तें

टाळण्याचा प्रयत्न केला तर मनाला आपली जीवितनौका योग्य रीतीनें चालू करतां येणारच नाहीं का ?"

" ऊन असलें म्हणजे आकृतीची छाया पडायचीच ! त्याप्रमाणें भावना आकांक्षांच्या ऊनांत हिंडणाऱ्या अंतःकरणाकृतीची ध्येयरूप छाया पडायचीच ! ऊनाच्या पटांगणांत आकृति आणि छाया संवगड्याप्रमाणें खेळ खेळत असतात, तद्वत् विचारविकारांच्या मैदानांत मन आणि ध्येय दोन जिवलग मित्रांप्रमाणें मजेमजेचे खेळ खेळत असतात ! पण क्षुल्लक कारणावरूनही दोन खेळाडू भांडून परस्परांना सोडून जावे, तद्वत् क्षुल्लक अशा विरुद्ध परिस्थितीमुळें मन आणि ध्येय यांचें आपसांत जमेनासें होऊन तीं एकमेकांना सोडून दूरदूर जातात !

प्रीतीच्या मुग्ध मोहनीनें मन आकृष्ट व्हावें, त्याप्रमाणें ध्येयाच्या चंद्रप्रकाशानें जीव आकृष्ट होतो आणि फुलामागें फुलपांखरूं त्याप्रमाणें ध्येयामागें जीव भिरीभिरी हिंडत असतो ! या हिंडण्याचा त्याला त्रास होत नाहीं ! सरितेला समुद्राच्या हृदयाचा अंत पाहण्याचा त्रास होतो का ? नाहीं ना ? तसंच आहे हें ! अनंतत्त्वांत विलीन होण्याच्या महत्त्वाकांक्षेला मोहून, ज्याप्रमाणें वास वायूच्या विमानांतून वातावरणांत विहरत असतो, तसा ध्येयाच्या मोहनीला आकृष्ट होऊन, जीव जगाच्या जंगलांत भटक भटक भटकत असतो !

ध्येयाविण आयुष्य म्हणजे पाकळ्या विसकळलेलें गुलाबाचें फूल ! पाकळ्या हातांत घेऊन त्याचा वास घेतां येईल ! पण त्यांत अविसकळीत गुलाबाच्या फुलाचें आनंद देण्याचें सामर्थ्य नाहीं ! मोहनमाळ जो मनाला आनंद देईल, तसा आनंद माळेंतल्या सुट्या मण्याला देतां येणं शक्य नाहीं ! ध्येय आणि जीवित यांचा संगम म्हणजे उषारवीचा संगम ! भावना व वायु यांचा हृदयंगम संयोग होय ! कविहृदय कल्पनेच्या तेजांत चमकावें, त्याप्रमाणें ध्येयाच्या तेजांत जीवितमन चमकतें !

आकांक्षेविण आयुष्य म्हणजे चमकेविण चांदणी ! आशेविण उत्साह ! आनंदाविण अनुराग ! पाकळ्याविण पुष्प ! पावित्र्याविण पुण्य होय ! पृथ्वी आणि अवकाश यांमध्यें ज्याप्रमाणें हवा खेळत असते, त्याप्रमाणें देह आणि मन यांच्यामध्यें ध्येयतत्त्वांच्या वायुलहरी झुळझुळत असतात !

सूर्यप्रकाशामुळें दिवसाला शोभा यावी, तद्वत् ध्येयतेजामुळें मानवी जीविताला शोभा येते ! ”

कुमार इतकें बोलत आहेत इतक्यांत एक कोंकणी माणूस कुमारांकडे पहात म्हणाला– “काय मामा ! अजून किति घटका उभेच्या उभे रवतलास ? बरोबरीच्या बाइल माणसाक तरी निजाक सांगा ! यदवळ् मी बघतंय् ती बापडी खालतीं बसाक बघता हा ! मगे मगे बोट अधिक हालतली; पहिल्यान् मजा दिसता खरी; पण मग डोक्यां दुखांक लागान् वांती होइत तवां समजात् ! ”

कुमार कौतुकानें त्याच्याकडे पहात म्हणाले—

“अजोबा ! आपलं नाव काय बरं ! ”

“माझा नांव किरिष्णा; मी देवगडाक उतरतलंय; तुमी खंयचे ! मुंबइचे ! खंय उतरतलास ! ”

कुमारांना ही कोंकणी भाषा चांगली बोलतां नाहीं आली तरी चांगली समजत होती. म्हणून ते म्हणाले—“मी तुमच्याच बाजूचा आहें बरं, अजोबा. मी वेंगुर्ल्याला उतरणार; तिथून मला पुढें खानोलीला माझ्या घरीं जायचं आहे. ”

“मग तुमी आमच्यांतलेच तर ! माकां बरां वाटलां हां; मी म्हटलंय् तुमी कुठले देशावरचे असशात् ! ह्यां बाईल माणूस तुमचां कोण ! ”

“ही माझी बायको, आजोबा ! ”

“काय जोडो पण लक्षुमीनारायणासारखो दिसता ! तिकां निजाक सांगा; आणिक तुमीही निजा परते; तुमका आलां होयां तर ह्यां घेवा नाकापुढें धरूक; तिकांय् देवा. ”

“कांहीं नको बरं ! माझ्याजवळ आहेत हे सर्व जिन्नस. मी इकडचाच राहणारा आहें; मला इकडची सगळी माहिती आहे अगदीं. ”

“मग तुमीं आमची बोली कित्याक नाय् बोलणास हो ! ”

“मला तुमची ही भाषा चागलीशी बोलता येत नाहीं, माझी धेडगुजरी भाषा ऐकून हंसाल तुम्ही, आजोबा ! ”

“मी कित्याक हंसतलंय् ! ”

इतकें भाषण होत आहे तों रत्नागिरी बंदर आलें; आणि बोट बंदरांत

उभी राहिली. बोटीवर दिवे लागले होते ते, आकाशांत चांदण्या चमकाव्या, त्याप्रमाणें बोटीवर प्रकाशत होते! अंतराळांत पांखरें भटकत राहावीं, त्याप्रमाणें 'पडांव' (उतारूंना उतरण्यासाठीं उपयोगांत आणतात त्या लहान होड्या) समुद्रांत डुंबत होते! कांहीं हळुहळू किनाऱ्याकडून येत होते.

इन्दु, कुमार हीं बंदरांतली मौज पहाण्यासाठीं बोटीच्या कठड्याला टेंकून उभीं राहिलीं. तो म्हातारा त्यांच्याकडे अजून कौतुकानें पहात होता. जरा वेळानें तो त्यांना म्हणाला "ह्या शेळा घ्येवा होयां तर; त्याचां पाणी कसा अगदीं दुधासारख्या सुरेख लागता."

कुमार आणि इन्दु यांनीं त्या म्हाताऱ्यानें दिलेला कोंवळा नारळ फोडून खाल्ला आणि त्यांतलें पाणी प्यावयाला घेतलें. त्यांच्या मनाला छान वाटलें. नंतर त्यानीं आपण आणलेल्या फराळांतलें कांहीं जिन्नस त्याला खावयाला दिले. म्हातारा अगदीं आनंदून गेला.

थोड्या वेळानें उतारू उतरले आणि आगबोट चालू झाली.

नंतर दोन बंदरें येऊन गेल्यावर देवगड बंदर आलें. म्हातारा जाण्यासाठीं उठला. इन्दु कुमाराना त्यानें अगदी लवून नमस्कार केला आणि म्हटलें "मामानूं! मी येतंय् हा, ओळखदेख ठेवा गरीबाची."

असें बोलता बोलतां म्हाताऱ्याच्या डोळ्यातून दोन अश्रू खालीं पडले! कुमाराचें हृदय गहिंवरलें!! इन्दूचेही डोळे पाण्यानें भरले!!!

"या बरं, आजोबा" कुमार आणि इन्दु एकदमच म्हणालीं.

समुद्राच्या किनाऱ्यावर भटकणारा एखादा प्राणी भुर्र्दिशीं उडून समुद्रांतल्या खडकावर जाऊन बसावा, त्याप्रमाणें तो म्हातारा माणूस त्यांच्या दृष्टिआड होऊन बंदरांत जाऊन उतरला.

हें पाहून इन्दु म्हणाली—"आयुष्यांत अशीं किती माणसं भेटतात अन् पट्कन् नाहींशीं होतात! परत त्यांची भेट होईल कीं नाहीं, हा संशयच असतो!"

"इन्दु! आयुष्य हें असंच आहे! सहजासहजीं दोन माणसं भेटतात आणि एकदम दृष्टिआड होतात! समुद्रकिनाऱ्यावर किती तरी पांखरें एकेठिकाणीं जमतात आणि थोड्या वेळानें दूर आकाशांत उडून जातात, पुन्हां

त्यांचा एकमेकांना थांगपत्ताही नसतो! त्याप्रमाणेंच आम्हां माणसांची या जगांत गत आहे! एखाद्याची मैत्री जमून परत त्याची दृष्टिभेट होण्याचा संभव असतो; पण पुष्कळांची गांठ पुन्हां कधींच पडत नाहीं! तुझी माझी भेट झाली ती कायमची झाली! आता मरणाशिवाय आपण एकमेकांपासून वेगळे होणार नाहीं!"

"असलं अमंगळ कांहीं तरी बोलूं नये गडे या आशा वेळीं! वेळा काळाचा कांहीं नेम नसतो!"

'इन्दु मरणाला इतकी भ्यालीस का ग?"

"मी मरणाला नाहीं भ्याले बरं! आपल्या तोंडून असले मरणाचे शब्द ऐकून भ्यालें!"

"बरं, मी तो विषयच सोडून देतों."

असें म्हणून कुमार आणि इन्दु खाली विश्रांतिसाठीं बसलीं.



## कुंज १८ वा.

पहांटे पांच वाजण्याच्या सुमारास वेंगुर्ले बंदरांत आगबोट येऊन पोहों-चली. कुमारांनीं सामान गुंडाळलें आणि ते 'पडांवा'ची वाट पाहूं लागले. थोडयाच वेळांत 'पडांव' आले. कुमार आणि इन्दु एका खलाशाकडे आपलें सामान देऊन बोटीचा जिना उतरूं लागलीं. वरच्या वर्गांतून खालच्या वर्गांत आल्यावर 'पडाव' थांबलेल्या दाराजवळ तीं आलीं आणि तेथून पडावाला लागलेल्या लोखंडी जिन्यावरून तीं 'पडांवां'त उतरलीं. खलाशानें सामान नेऊन पडावांत ठेवलें.

एखादें लहान पांखरूं झाडावरून दुसरीकडे भुर्कन् उडून जावें, तसा तो 'पडांव' आगबोटीकडून बंदराकडे जोरात निघाला! बंदराच्या धक्क्याला 'पडांव' लागले आणि कुमार आणि इन्दु वेंगुर्ले बंदराच्या धक्क्यावर उतरलीं.

इतक्यांत एक 'किरिस्ताविण' (ख्रिश्चन बाई) त्याच्याजवळ आली आणि त्यांना विचारूं लागली-" ओझीं होरुंचीं आसत?"

कुमारांनीं 'होय' असें म्हणतांच तिनें त्यांचें सर्व सामान डोक्यावर घेतलें व ती पुढें चालूं लागली. बंदरावर असलेल्या एका हॉटेलांत कुमार-इन्दूंनीं तोंड धुवून चहा घेतला. त्या ख्रिश्चन बाईलाही त्यांनीं पेलाभर चहा दिला. तिच्या गरीब मनाला मोठा आनंद झाला!

शुभ्र चांदण्यामुळें भोंवतालची डोंगरांतली वनराई, रुपेरी वर्खांत तांबडया पांढऱ्या फुलांचा तुरा मढवल्यासारखी मनाला आल्हाद देत होती! कुमारांचें घर समुद्राच्या कांठाला लागून होतें. वेंगुर्लें बंदरावरून त्यांच्या खानोली गांवांत जावयाला 'लाइट हाऊस'ची टेंकडी चढून खालीं उतरून जावें लागे. साधारण दीडदोन तासांचा प्रवास होता. टेंक-डीच्या एका बाजूला लहानशी पाऊलवाट होती. त्याच्यावरून तीं तिघें हळुहळू चालूं लागलीं.

डाव्या हाताला खालीं अथांग समुद्र अपरिमित भूतकाळाप्रमाणें पसरला

होता! आणि डोक्यावर अनंत आकाश अस्पष्ट भविष्यकाळाप्रमाणें मति गुंग करून टाकीत होतें!! उजव्या हाताला असलेला लांबचलांब पसरलेला भूप्रदेश, वर्तमानकाळासारखा, आपल्या ओळखीचा वाटत होता! आणि अनंतत्त्वातून आलेले व अखेरीस अनंतत्त्वांत मिसळण्यासाठीं जाणारे इतर अखिल स्थिरचर वस्तूंप्रमाणें हे तीन जीव—त्यांतले दोन जगांतल्या एका लहानशा टेंकडीवरून इहलोकच्या आपल्या धर्मशाळेंत उतरण्यास आणि तिसरा त्याना सोबत म्हणून - जात होते! ती ख्रिश्चन बाई त्या दोघांना मधून मधून म्हणतच होती – "दादानुं! जरा नीट बघान् चला; जरा जर पाऊल चुकात, तर खालतीं कोसळून पडशात्! आमच्या सरावाची वाट ही; म्हणून आमकां नाय भय गमणां हैंसर; पण तुमच्यासारख्या नवख्यांक अगदीं भय आसा हैं! जपान् चला जरा!" त्या बाईच्या सूचनेंत बराच अर्थ होता. कुमार एका हातानें इन्दूला धरून हळुहळू डोंगर उतरत होते. एखादे वेळीं भीतीनें इन्दु त्यांना एकदम बिलगत असे! त्यामुळें कुमाराना त्या स्थितींतही आनंद वाटत होता आणि हंसू येत होतें! थोडया वेळानें तीं डोंगराच्या पायथ्याशीं आलीं. पायथ्याला लागून एक नदी समुद्राला मिळत होती; ती उतरून त्यांना पलीकडे जावयाचें होतें; ती ख्रिश्चन बाई त्यांच्या पुढें नदी उतरून केव्हांच गेली आणि तेथून त्यांना म्हणाली—

"तुमी उतरां नकात् पाण्यांत हां; पाण्याक् ओढ आसा फार, मी होडी हाडूंक सागतंय् कोणाक तरी."

थोडा वेळ कुमार व इन्दु होडीची वाट पाहूं लागले; पाचच मिनिटांत 'गाबितांचीं पोरें' (कोळी लोकांचीं पोरें) होडी घेऊन आलीं; कुमार आणि इन्दु त्यांत बसलीं, आणि नदीच्या दुसऱ्या तीराला उतरलीं. सकाळच्या शात वेळीं एका बाजूला अथांग समुद्र, मध्यें पांढऱ्या शुभ्र रेतीचा लाबच लांब पट्टा आणि पलीकडे नारळीचीं हिरवीगार झाडें पाहून कुमार आणि इन्दु याच्या मनाला अत्यंत आनंद झाला!

मासळीची खारट घाण नाकांत शिरत होती! कोळी लोकांनीं समुद्रांतून 'रापण' (कोळ्यांचें मासळी धरण्याचें मोठें जाळें) ओढून काढून 'वेळे'वर (समुद्राचा वाळूनें भरलेला किनारा) पसरली होती; आंत

निरनिराळ्या जातीचे मासे – जगांत दुर्दैवी जीव तडफडतात त्याप्रमाणें – तडफडत होते !

आपलें काम टाकून सगळे लोक कुमारइन्दूंकडे आश्चर्यानें पहात होते ! कुमार त्यांना कांहीं माहिती विचारीत होते, त्यामुळें त्यांच्याबद्दल त्या गरीब अडाणी लोकांना आपलेपणा वाटावयाला लागला.

अशा रीतीनें अर्धापाऊण तास त्या रेतींतून चालल्यावर कुमारांचें घर आलें. आजुबाजूला हिरवींगार माडांचीं ( नारळीचीं ) झाडें वाऱ्यानें हालत होतीं. त्यांमधून अस्पष्ट दिसणारें त्यांचें कौलारू घर, केळीच्या हिरव्यागार पानांतून केळफूल दिसावें, त्याप्रमाणें भासत होतें ! त्यांच्या घरांतून समुद्र अगदीं स्पष्ट दिसत होता.

अहोरात्र चाललेली समुद्राची गर्जना, मुंबईकडच्या लोकांना ट्रॅमगाड्यांच्या खडखडाटासारखी, एखाद्या जंगली जनावराच्या मालकाला वाघ–सिंहाच्या डुरकावणीसारखी, लहान मुलांना पावसाळ्यांत ओरडणाऱ्या बेडकांच्या ओरडीसारखी, एखाद्या कविहृदयाला, पिंजऱ्यांत पकडून ठेवलेला हिंस्र प्राणी, बाहेर पडण्यासाठीं आरडाओरड करतो त्याप्रमाणें,– अनंतकाळ पार-तंत्र्याच्या खोल गर्तेत डांबून ठेवणाऱ्या जुलमी राजाला शिव्याशाप देत, बाहेर पडण्यासाठीं तळमळणाऱ्या, स्वातंत्र्यासाठीं धडपडणाऱ्या, दीन दुबळ्या बंदीवानाच्या हृदयविदारक आक्रोशासारखी, आणि एखाद्या तत्त्ववेत्त्याला जड जगाच्या मोहपाशांत गुरफटलेल्या अखिल मानवजातीला चिरशां-तीचा लाभ कोठें मिळेल, हें स्पष्ट रीतीनें समजावून सांगणाऱ्या तपस्व्याच्या धीरगंभीर वाणीसारखी भासली असती ! कुमारांच्या मनाला मात्र त्या गर्जनेत आपल्या विरहानें व्याकूळ झालेल्या आपल्या लाडक्या कुसुमच्या नाजूक अंतःकरणाच्या तळमळीचा भास झाला ! त्यामुळें थोडा वेळ त्यांचें मन कुसुमच्या विचारांनीं, गंभीर विचार अबोल व्हावा, त्याप्रमाणें स्तब्ध झालें.

* * * *

दहा पंधरा दिवसांनीं कुमार व इन्दु गांवच्या ‘ रवळनाथा ’च्या देवा-लयांत जाऊन आलीं. हें देवालय ते राहात त्या ठिकाणापासून दोन, चार मैल लांब असल्यामुळें इन्दु डोलींतून ( पालखीसारखें वाहन ) आणि कुमार चालत गेले. संध्याकाळीं तेथें पोहोंचल्यावर नवस वगैरे काय फेडावयाचे

होते ते फेडून, देवदर्शन घेऊन दुसऱ्या दिवशीं सकाळीं सात, आठ वाजण्याचे सुमारास, वाटेवर लागणाऱ्या काजूच्या झाडाला लागलेलें बोंडू, रतांबे, करवंदीवरचीं करवंदें, हिरवे आंबे यथेच्छ खात खात, उंच पोफळींना लागलेले बेडे ( साल न काढतां असलेल्या सुपाऱ्या ) आपल्या 'भागेल्यां' कडून ( कुळांकडून ) काढून घेत, ओळखींच्या माणसांबरोवर गप्पा मारीत, तीं आपल्या घरीं येऊन पोहोंचलीं.

संध्याकाळचे पांच सहाचे सुमारास तीं समुद्राच्या 'वेळे'वर फिरावयाला जात असत; वर अनंत आकाश पसरलें होतें ! खालीं अथांग सागर मोठमोठ्यानें गर्जना करीत होता ! खिडकींतून येऊन एखाद्या युवतीनें बाहेर डोंकावून पहावें, तद्वत् समुद्राच्या लाटा किनाऱ्यावर येऊन बाहेरच्या जगाची मौज पहात असल्याचा भास होत होता ! समुद्राच्या पृष्ठभागावर एकामागून एक उसळणाऱ्या लाटा, शेतातलीं भाताचीं हिरवीगार लोंबरें वाऱ्याच्या झोतानें हालावीं, त्याप्रमाणें भासत होत्या !

समुद्राच्या किनाऱ्याला लागून असणाऱ्या शुभ्र रेतीच्या पट्टयांच्या दोन्ही बाजूंना, समुद्रकिनाऱ्याला काटकोन करून दोन नद्या दोन बाजूंना वहात वहात शेवटी समुद्राला मिळत होत्या. समुद्रकिनाऱ्याला व वाळूच्या मैदानाला समांतर आणि वाळूच्या मैदानाच्या पलीकडे, खानोली गांव व डोंगर, या दोन नद्यांच्या मध्यभागी वसले होते.

अशा रीतीनें एका बाजूला समुद्र, दुसऱ्या बाजूला खानोलीचा डोंगर आणि यांना काटकोन करून असलेल्या दोन बाजूंच्या दोन नद्या, अशा चारी बाजूंनीं वेढलेल्या पांढऱ्या स्वच्छ रेतीच्या समुद्रकिनाऱ्यावर संध्याकाळच्या शांत व रमणीय वेळीं फिरताना कुमारइन्दूंना जगाचा विसर पडत असे !

त्यांचें घर या दोन नद्यांच्या मध्यभागीं होतें; त्यामुळें कोणत्याही बाजूला फिरावयास गेले तरी त्याना सारखेंच अंतर चालून जावें लागे. घराकडून एका नदीकडून दुसऱ्या नदीकडे जाऊन परत घराजवळच असलेल्या रेतीच्या ढीगावर चांदण्यात पत्नीबरोबर गप्पागोष्टी करीत कुमार घटका घटका बसत असत. आकाशांत रात्रीच्या वेळीं चांदण्या चमकत असत, त्याप्रमाणें वाळूच्या 'वेळे'वर अत्यंत शुभ्र असे पांढरे रेतीचे कण इतर काळसर

रेतींत चमकतांना पाहून, त्यांच्या मनाला चांदण्याची आणि त्या शुभ्र रेतीकणांची तुलना करावीशी वाटे !

इन्दु ज्या ठिकाणीं बसे त्याच ठिकाणीं तिला भिडून बसून तिला बोलण्याच्या नादांत सोडून, एका हातानें तिच्या ढुंगणाजवळची रेती हळूच काढून घेऊन ते तिला कितीकदा तरी त्या रेतींत उताणी पाडत असत ! पतीच्या त्या प्रेमळ पण लहान मुलांना शोभण्यासारख्या लीला पाहून इन्दु उसन्या रागानें दोन पसा रेती हातांत घेऊन त्याच्या धोतरावर फेंकीत असे; नाहींतर एखादे वेळीं तीही त्यांना तशीच पाठीमागची रेती काढून खालीं पाडीत असे; पण कुमार एकदा त्या रेतींत पडले म्हणजे घटका घटका उठतच नसत !

त्या रेतींत चांदण्यांत असे घटकाघटका पत्नीबरोबर गुजगोष्टी करीत पडून राहणें, त्यांना राजमहालांतल्या मखमाली गालीच्यावर लोळण्यापेक्षां अतिशय सुखदायक वाटत असे ! खेडेगावांतील निसर्गाचें नैसर्गिक सौंदर्य शहरांतील कृत्रिम सौंदर्यापेक्षा कितीतरी अधिक आल्हादक कसें असतें याचा अनुभव कुमार इन्दु यांना या रेतीवर चादण्यांत चार घटका बसलें म्हणजे सहज येत असे !

अशा प्रकारच्या निसर्गाच्या अकृत्रिम आनंदांत बराच वेळ घालवून तीं उभयतां घरीं येत, आणि जेवण झाल्यावर परत अर्धा पाऊण तास तसाच त्या वेळेवर मजेंत घालवून रात्रीच्या नवाच्या सुमारास ते घरी येऊन झोपीं जात.

त्या भागातलें हवापाणी अत्यंत सुरेख असल्यामुळें कुमारइन्दूंची शरीरप्रकृति अगदीं बघण्यासारखी झाली होती.

अशा तऱ्हेनें आणखी दहा, पंधरा दिवस त्यांनीं मजेंत घालविले.

*　　*　　*　　*

आज इन्दूच्या आनंदाला सीमा नव्हती ! ती सुखरूपपणें प्रसूत होऊन तिला अत्यंत सुंदर असें पुत्ररत्न झालें होतें. पुत्रमुखदर्शनासाठीं हपापलेल्या तिच्या मनाच्या आनंदाचें वर्णन करणें अशक्य गोष्ट आहे ! कुमारांनाही आनंद झाला हें सांगणें जरूर आहे असे नाहीं. त्याच्या विशुद्ध प्रेमाचें दृश्य स्वरूपच असें तें बालक अत्यंत तेजस्वी व सुंदर होतें ! गुलामानें आईची आंगलट आणि बापाचा तोंडवळा जशाचा तसा उचलला होता !

बाराव्या दिवशीं मुलाचें बारसें झालें. आणि मुलाचें नाव 'शेखर' असें ठेविलें.

इन्दु तर त्याला दिवसांतून अर्धी घटकासुद्धां खालीं ठेवत नसे. कुमारांना त्याला घेतां येत नसे म्हणून इन्दूनें त्याला घेतला कीं, उभे राहून, ते तिलाच आपल्या हृदयाजवळ धरीत, आणि त्याच्याकडे पहात राहात ! एका हातानें इन्दूला हृदयाला भिडवावें आणि दुसऱ्या हातानें आपल्या 'जीवाच्या कलिज्याचें' एकाग्रतेनें चुंबन घेत असलेल्या तिच्या मुखाला आपल्या तोंडाजवळ ओढून त्याच्या दुसऱ्या गालाचें चुंबन घ्यावें हा त्यांचा दिवसातला नित्यक्रमच ठरून गेला होता. असें करतेवेळीं त्यांचे ओंठ मात्र चुकून – चुकून कीं मुद्दाम काही कळत नाहीं–इन्दूच्या मुखालाही स्पर्श करीत असत. त्यावेळीं इन्दूचें तोंड पहाण्यासारखें होत असे ! अशा स्थितींत मिनिटेंच्या मिनिटें घालविलीं तरी त्यांच्या प्रेमळ अंत:करणाची तृप्ति होत नसे !

* * *

दिवसामागून रात्र, त्याप्रमाणें सुखामागून दुःख हें असावयाचेंच ! या न्यायाला अनुसरूनच कीं काय, इन्दूला बारीकबारीक ताप येऊं लागला. असेल साधा कसला तरी ताप असें समजून कुमारानीं तिकडे विशेष लक्ष दिलें नाहीं. परंतु चार पांच दिवस झाले तरी ताप उतरेना ! तेव्हां मात्र ते घाबरून गेले ! त्यांना घरगुती औषधाची साधारण माहिती होती. खेडेगांवांत असलीं औषधें पाहिजे तेव्हां आणि पाहिजे तितकीं मिळण्यासारखीं असतात. तेव्हां त्यातलीं थोडीशीं औषधें त्यांनीं तिला सुरू करून पाहिलीं तरी तिला गुण येईना ! म्हणून त्यांनीं दुसरे दिवशीं वेंगुर्ल्याहून डॉक्टर आणला. त्यानें येऊन परीक्षा केली व 'विशेष काळजी घेणें जरूर आहे, मी औषध पाठवून देतों; त्यानें गुण येईल असें वाटतें,' असें सांगून तो निघून गेला. डॉक्टराचें औषध सुरू करून पांच सहा दिवस झाले तरी तिच्या प्रकृतीला गुण येईना; म्हणून पुन्हां त्या डॉक्टरला कुमारानीं बोलावून आणलें. डॉक्टर आले. त्यानीं तिला बराच वेळपर्यंत तपासली. आणि शेवटीं 'आपल्या हातानें ही 'केस' बरी होणार नाहीं. आपण दुसरा

डॉक्टर बघा ' असा अभिप्राय देऊन डॉक्टरची स्वारी तडक वेंगुर्ल्याला निघून गेली !

कुमारांच्या डोळ्यांपुढें अंधार दिसूं लागला ! ' खानोली ' सारखें खेडेगांव ! त्या ठिकाणीं हवा तो औषधोपचार पैसे खर्च करूनही होण्या-सारखा नव्हता ! यामुळें तर त्यांची कंबरच खचली ! एवढ्या उत्साहानें आपण येथें आलों आणि आतां कोणता प्रसंग आपल्यावर आला, याची जाणीव होऊन त्यांना अपरिमित दुःख झालें ! ते अहोरात्र तिच्या उशा-जवळ बसून तिची सुश्रूषा करीत होते; अशा स्थितींत डॉक्टरांचा तो अभिप्राय ऐकून त्यांची स्थिति काय झाली असेल, त्याची कल्पना त्या स्थितीचा ज्यांना अनुभव आला असेल त्यानाच् येईल, इतरांना येणार नाहीं !

इन्दूलाही आपण आतां थोडे दिवसांचेच सोबती आहोंत हें कळून चुकलें ! एक दिवस इन्दूनें खालच्या स्वरांत कुमारांना हांक मारून जवळ येण्यास सांगितलें. कुमार ताबडतोब तिच्याजवळ जाऊन बसले; ती त्यांच्याकडे सारखी टक लावून पाहूं लागली ! हळुहळू बोलण्याचा ती प्रयत्न करीत होती. पण शद्बोच्चार स्पष्ट होईना ! म्हणून कुमार तिला म्हणाले—

" इन्दु ! तूं स्वस्थ पडून राहा. अगदीं बोलूं नकोस. तुला बोलण्याचे श्रम तोलायचे नाहींत ! "

" नाथ ! बोलूं नको म्हणून कसं बरं मला सांगतां ? हीच वेळ बोलण्याची आहे ! उद्यां मी हें जग सोडून, आपल्या पायांचा आसरा टाकून गेलें म्हणजे मला पुन्हा कधीं तरी आपल्याशीं बोलतां येणार आहे का ? यावेळीं जितकं म्हणून मी बोलेन तितकं कमी आहे, नाहीं का गडे ? नाथ ! आतां मी जाणारच ! पण माझ्या बाळाला मात्र विसरूं नका बरं ! माझा बाळ अगदीं म्हटल्या अगदींच लहान आहे हो ! त्याला जपायचा बरं, आपल्या पंचप्राणाचा ' जिता पहारा ' ठेवून जपायचा बरं नाथ !

आपण तिच्याशीं – आपल्या कुसमशीं – लग्न करणारच ! आपण नाहीं म्हटलें तरी मी आपल्याला अखेरची विनंति करतें कीं, आपण तिच्याशीं जरूर लग्न करा गडे ! आपल्याला तिच्याशिवाय जगांत राहणं शक्य होणार नाहीं, म्हणून मी आपल्याला परत परत तसं सांगतेंय् ! पण नाथ ! आपलं

तिच्याशीं लग्न झालें तरी माझ्या बाळाला मात्र उघडयावर टाकूं नका! अन् अन् मला—या आपल्या इन्दूलाही विसरूं नका गडे! नाहीं विसरायचं ना? नाहीं ना गडे?"— असें म्हणून इन्दूनें कुमारांना घट्ट मिठी मारली! कुमारांनीं इन्दूचें डोकें मांडीवर घेतलें व ते लहान मुलासारखे रडूं लागले!

"नाथ! कशाला बरं रडायचं! माझं सोन्याहूनही पिवळं होणाराय्! आपल्या देखत, माझं डोक आपल्या मांडीवर असतांना, भरल्या कुंकवानीं मी आपल्या पायांना सोडून जाणार आहें ना? यांतच मला मरतांना समाधान आहे! सतीचं मरण साऱ्यांनाच लाभत नाहीं बरं! त्याला पूर्वपुण्याईच लागते नाहीं का गडे?"

पुढें तिला बोलवेना! ती कुमारांच्या मांडीवर स्वस्थ पडून राहिली. कुमारांनीं तिचें सांत्वन करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला! काय असेल तें असो पण कुमारांच्या मनाला पूर्ण खात्री वाटत होती कीं, आपली इन्दू हें जग सोडून जाणें शक्य नाहीं! त्यांना असें कां वाटावें तें सांगणें कठीण आहे! तरी ती रात्र मात्र त्यांनीं अतिशय काळजींत काढली!

दुसऱ्या दिवशीं त्यांनीं तिथल्या एका इसमाला पाठवून वेंगुर्ल्याच्या 'गोऱ्या' डॉक्टरला बोलावून आणलें. त्यानें तिची अगदीं काळजीपूर्वक कसून तपासणी केली; आणि बऱ्याच वेळानें तो म्हणाला—

"Mr. Kumar! no cause for anxiety! It is due entirely to the wrong diagnosis of the case!"

(मिस्टर कुमार! भिण्याचं कारण नाहीं! ही इतकी स्थिति होण्याचं कारण दुसरं कांहीं नसून रोगाची परीक्षाच मुळीं बरोबर झालेली नाहीं!)

हें डॉक्टरांचें मत ऐकून कुमारांचा आनंद काय वर्णावा! इन्दुही हें सारें ऐकत होती; तिचें मुख आनंदानें फुललें होतें! त्या आनंदांत ती कुमारांना म्हणाली,

"माझ्या बाळाला जरा इकडे आणायचा गडे!"

कुमारांनीं तात्काळ त्याला तिच्याजवळ दिला. इन्दूनें त्याला—आपल्या 'जीवाच्या जीवाला' पोटाशीं कवटाळला; आणि त्याचे इतक्या जोरानें मुके घेतले कीं कुमार तिला म्हणाले—

"पोराचा जीव गुदमरेल त्या! असं काय बरं करतेस ग?"

डॉक्टरांना हा देखावा पाहून आनंद वाटला ! आणि ते म्हणाले—

“ ईन्डूटाई ! भिण्याचा कारण नाहीं हाय ! टुम्मी लवकर चांगला होईल; आमी औषध देतों तों घेत जावा;म्हणजे चार दिवसांमदी टुम्मी चांगला होईल ! ” असें म्हणून डॉक्टर हंसले.

नंतर त्यांनीं कुमारांना विचारलें—

“ Under whose treatment had she been before I took up the case ?” ( माझ्यापूर्वी कोणाकडे ‘ केस ’ दिली होती ? )

कुमारांनीं त्या डॉक्टरांचें नांव सागितलें; तें ऐकून डॉक्टर म्हणाले —

“ It's good luck that he himself stopped his treatment, otherwise the case would have been fatal. ” ( त्यांनीं आपली ‘ ट्रीटमेंट ’ बंद केली ही फार चागली गोष्ट झाली; नाहीं तर रोगी दगावला असता ! )

इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलत बोलत शेवटी डॉक्टर निघून गेले. या डॉक्टरांच्या औषधानें इन्दूला गुण येऊं लागला; आणि दहा, बारा दिवसात ती चांगली बरी झाली.

चागली बरी झाल्यावर इन्दु शेखरला घेऊन पूर्वीप्रमाणें त्या वाळूच्या ‘ वेळे ’वर कुमारांबरोबर फिरावयाला जाऊं लागली. पूर्वीप्रमाणेंच चांदण्यांत तीं घटका घटका बसून मौज करूं लागलीं ! पण यावेळीं पूर्वीपेक्षां त्यांचा आनंद द्विगुणित करावयाला आणखी एक जीव अधिक होता ! यामुळें हल्लींचा त्यांना होणारा आनंद पूर्वीच्यापेक्षां कितीतरी पटीनें अधिक होता हें सांगण्याची मुळींच जरूरी नाहीं !

शेखरला इन्दु पळभरही आपल्या हातांतून कुमारांकडे देत नसे ! कुमारांनीं त्याला मागितला तर ती म्हणे—

“ नको ग ! बाई ! पडेल बिडेल माझा बाळ खालतीं ! आपल्याला का सांवरणार आहे तो ? भारीच अचपळ आहे बरं का !”

यावर कुमार उसन्या रागांत तिला म्हणत – “ मग तूंच सांभाळ त्याला; आम्हांला कटकट नको ती ! ”

मग इन्दूनें म्हणावें — “ असं काय तें अगदीं ? हा बाळ माझा एकटीचाच का आहे ? आपलाही त्याच्यावर प्रेमाचा हक्क आहे ! आहे ना गडे ? ”

असा नाजूक प्रश्न, त्यांच्या खांद्याला हालवीत हालवीत ती विचारूं लागली कीं, कुमारांना आनंदाच्या गुदगुदल्या होत असत आणि मग ते त्या आनंदांत म्हणत—

" बरं ! तुझा आणि माझा ! मग तर झालं ! होय ना रे लबाडा, असंच ना ! "

त्या ' लबाडाचें ' उत्तर ऐकण्यासाठीं कुमार व इन्दु त्याच्याकडे, निसर्ग आणि सृष्टि वायूचे मंजूळ शब्दनाद ऐकण्यासाठीं त्याच्याकडे पहात रहावीं, तशीं अगदीं स्थिर दृष्टीनें पहात राहात असत !



# कुंज १९ वा.

आगबोटी बंद होत असल्यामुळें कुमार, इन्दु यांना येतांना बेळगांवच्या मार्गानें यावें लागलें. वेंगुर्ल्यापासून सावंतवाडी, आंबोली ते बेळगांवपर्यंत मोटारीनें, आणि बेळगांव ते पुणें रेल्वेमार्गानें प्रवास करीत करीत कुमार आणि इन्दु हीं पुण्याला येऊन पोहोंचलीं.

पुण्याला आल्याबरोबर तीं रमावहिनींच्या घरीं जाऊन आलीं. इन्दूच्या सुखरूप बाळंतपणाबद्दल व तिला पुत्ररत्न लाभल्याबद्दल उमाकाकूंनीं त्यांना विमलला, आणि रमावहिनींना जेवावयालाही बोलावलें होतें. त्यावेळीं इन्दूच्या आजारीपणाची हकीकत ऐकून ती कुमारांबरोबर सुखरूप परत पुण्याला येऊन आपल्या दृष्टीस पडली याबद्दल उमाकाकूंनीं खरोखर देवाचे सहस्रशः आभार मानले !

वसंताच्या घरीं कुमारइन्दूंना कळून आलें कीं, कुसुमची मैत्रीण रोशन हिचा नगराला बॅरिस्टर विश्वासरावांशीं मोठ्या थाटानें विवाह झाला; विवाह झाल्यावर थोडे दिवस पतीबरोबर महाबळेश्वराला मौज मारून रोशन ही कुसुमबरोबर पुण्याला आली.

कुसुमरोशनलाही उमाकाकूंनीं विमलकडून जेवण्याचें आमंत्रण दिलें होतें. पण त्यांनीं आपल्याला कांहीं महत्त्वाचें काम असल्यामुळें येतां येणार नाहीं म्हणून दिलगिरी प्रदर्शित केली.

पुण्याला येऊन सात, आठ दिवस झाले तरी कुमारांना कुसुमचें या एवढ्या दिवसांत एकदांही दर्शन झालें नाहीं ! तिच्याकडे 'लेडीज रेसिडेन्सी'त जाणें त्यांना मनापासून आवडत नसे. इतकेंच नव्हे तर चुकूनही कधीं ते त्या बाजूला फिरकले नाहींत. एखादे वेळीं त्या बाजूला जाण्याचा प्रसंगच आला, तर तो टाळण्याचा ते प्रयत्न करीत असत. पण आपण तिकडे गेलों नाहीं, तरी कुसुमनें तरी आपल्याकडे यावें, असें त्यांना पुष्कळ पुष्कळ वाटत असे. परंतु इतक्या दिवसांत कुसुम एकदांही त्या बाजूला आली नाहीं, इतकेंच नव्हे तर उमाकाकूंनीं आपल्यासाठीं मुद्दाम केलेल्या

जेवणाला बोलाविलें असतांही ती आली नाहीं, या दुःखद विचारानें त्यांच्या हृदयाला अत्यंत वेदना होऊं लागल्या ! कुसुम आपल्याला विसरली तर नसेलना या नुसत्या कल्पनेनेंच त्यांच्या जीवाचें पाणी झालें !

कोर्ट सुरू होऊन कामाची अतीशय गर्दी उडाल्यामुळें त्यांचा बराच वेळ कामकाजात जात असे म्हणून बरें, नाहीं तर घरीं रिकामें राहून त्यांना वेड लागण्याची पाळी आली असती !

एक दिवस त्यांनीं इन्दूलाच तिच्याकडे जाऊन यावयाला सांगितलें, त्याप्रमाणें ती तिच्याकडे गेली, त्यावेळीं कुसुम एकटीच खोलींत बसली होती. शून्य दृष्टीनें भोंवतालीं दृष्टि लावून बसलेली तिला पाहून इन्दूच्या मनांत नाहीं नाहीं त्या कल्पना येऊं लागल्या ! इन्दूनें तिला विचारिलें —

" कुसुम ! तुम्हाला आतांशा बरं वाटत नाहीं का ? काय दशा झालीय् ही तुमची ? "

" इन्दुताई ! मी कांहीं आजारी नव्हतें, अन् नाहींही पण ! आताशा माझं मनच ठिकाणावर नाही ! "

" कां बरं ? " इंदूनें कळवळून विचारिलें.

" इंदुताई ! आपण मला त्याचं कारण नका विचारूं गडे ! " असें म्हणून कुसुम रडूं लागली !

" कुसुम ! तुम्ही कां रडतां बरं ? मला आपलं दुःख सांगाल का ? "

" इन्दुताई ! मला कांहींच एव्हाशीं सांगता येणार नाहीं. तुम्हांला लवकरच तें कळेल ! " असें म्हणून कुसुमनें तोंड फिरविलें !

कांहीं तरी विलक्षण पण न सांगण्यासारखा प्रकार कुसुमच्या घरीं घडला आहे, हें इन्दूनें तात्काळ ओळखलें; पण कुसुमची सांगण्याची इच्छा दिसत नाहीं, असें पाहून तिनें तिला या बाबतींत कांहीं एक विचारलें नाहीं.

कांहीं वेळ कुसुमबरोबर इतर गोष्टी बोलण्यांत घालवून इन्दु परत आपल्या घरीं आली.

इन्दूनें ही सर्व हकिकत कुमारांना सांगून टाकली. कुमारांच्या मनाला जबर धक्का बसला ! थोडा वेळ विचार करून त्यांनीं कुसुमला पत्र पाठवून

सविस्तर हकीकत कळविण्यास सांगितलें. त्याचें उत्तर त्यांना दुसऱ्या दिवशींच मिळालें.

तें वाचून त्यांना जगांत चोहींकडे अंधार भरला आहे असें वाटूं लागलें! जगांत आनंद ही नुसती कल्पना आहे! आणि दुःख हें सत्य आहे ही जाणीव होऊन त्यांना कांहीं सुचेनासें झालें!

" मला पत्रांतून स्पष्ट कळवतां येणार नाहीं; पण आपणांला आतां एकमेकांना विसरलं पाहिजे!" — हा तिच्या पत्रांतला मजकूर वाचून त्यांच्या मनाची वर लिहिल्याप्रमाणें स्थिति होणें साहजिक होतें. परंतु पत्रावरून सगळी हकीकत स्पष्ट होणें शक्य नसल्यामुळें त्यांनीं तिला दुसरें पत्र लिहून त्यांत तिला आपल्या घरीं येण्याविषयीं विनंति केली.

पत्र पोहोंचतांच दुसरे दिवशीं कुसुम कुमारांकडे आली. यावेळीं इन्दु घरांत नव्हती. ती शेखरला घेऊन उमाकाकूंकडे बसावयाला गेली होती. एखादी टवटवीत वेल, बरेच दिवस पाणी न मिळाल्यामुळें अगदीं सुकून गेल्यासारखी दिसावी, तशी कुसुम कुमारांच्या डोळ्यांना दिसली! तिची ती तशी अवस्था पाहून कुमारांनीं तिला विचारलें — " कुसुम! काय ग तुझी दशा ही?"

" माझ्यांत इतका का फरक पडलाय्?"

" फरक पडलाय् म्हणून काय विचारतेस तूं? मी म्हणूनच तुला ओळखलं बरं! दुसऱ्या कुणाला तरी तुला ओळखतां आलं असतं का? कशामुळं ही अशी तुझी दशा झालीय् ग कुसुम?"

" सांगूं का? सांगूं का? आपल्याला वाईट तर नाहीं ना वाटायचं? — नाहीं ना वाटायचं? नाहीं म्हणायचं म्हणजे सांगेन!"

" सांग कुसुम! असं काय बरं करतेस ग? आपलं हृदय माझ्यापासन कसं ग तुला इतके दिवस लपवून ठेववलं? इतक्या दिवसांत माझ्याशीं एकदांसुद्धां बोलण्याची तुला इच्छा झाली नाहीं ना ग? कां बरं असा तुझ्या मनोवृत्तींत फरक पडावा? कां ग कुसुम?"

" आपल्यामुळं — होय नाथ! — आपल्यामुळंच बरं!"

" मीं काय केलं तुझं, कुसुम?"

" आपण काय केलं तें आपल्याला कसं कळणार बरं!"

" मग सांग ना कुसुम, मीं काय तुझं केलं तें ! "

" आपल्या प्रेमामुळं माझी अशी स्थिति झालीय् हो ! "

" प्रेमामुळं अशी स्थिति ? मला नाहीं तुझ्या बोलण्याचा अर्थ कळला ! काय तें स्पष्ट सांग ना, कुसुम ! "

" माझ्या आईनं मला आपल्याला विसरायला सांगितलंय् ! "

" पण असं कुणीं सांगून का कोण कुणाला विसरतं ? "

" तिनं मला तसं स्पष्ट बजावून सांगितलंय् ! " मी जिवंत असेपर्यंत पहिली बायको जिवंत असलेल्या माणसाशीं लग्न करायला मी तुला कधींच कबुली देणार नाहीं, " असं तिनं मला अगदीं स्पष्ट अन् अखेरचं सांगून टाकलंय् ! अन् मीही – हो मीही ! त्या गोष्टीला कबूल झालेंय् ! "

" कुसुम तूं असं करायला अगदीं मनापासून तयार झालीस का ग ?"

" होय, मीही असं करायला कबूल झालें ! आईच्या मनाला दुःख देऊन आपलं स्वतःचं सुख साधायचं माझ्या मनाला मुळींच पसंत नाहीं ! आपल्या सुखाचा संन्यास करून दुसऱ्याला–मला जन्म देणाऱ्या माझ्या आईला–सुख देणं हें मी माझं पहिलं कर्तव्य समजतें. अन् त्या कर्तव्याच्या बजावणीसाठीं मी आपल्याशीं विवाह करणार नाहीं–माझ्या आईनं आपण होऊन तसं करायला मला परवानगी देईपर्यंत तरी–करणार नाहीं असं मी तिला स्पष्ट सागून टाकलं ! "

" मग कुसुम, दुसऱ्या कोणाशीं लग्न करणार तूं ? "

" नाथ ! आपल्याला हा प्रश्न मला विचारवला तरी कसा बरं ? "

" म्हणजे काय म्हणतेस तूं, कुसुम ? "

" माझ्या प्रेमाची किंमत आपण हीच केली का ? "

" नाहीं बरं, कुसुम ! तुझ्या प्रेमाची किंमत मला पुरी–अगदीं पुरी कळतेय् बरं ! मग पुढं काय ग करणार तूं ? "

" आईनं आपण होऊन कबुली दिली तर आपल्याशींच विवाह करायचा, नाहींतर आजन्म अविवाहित–जगाच्या दृष्टीनं अविवाहित राह्यचा माझा निश्चय आहे ! अन् तो मीं आईला सांगितलाही आहे. "

" मग आई झाली का याला कबूल ? "

" मीं तिला लावलं कबूल व्हायला ! "

" कुसुम ! मग यापुढें आपण एकमेकांशीं कोणत्या नात्यानं वागायचं बरं ! "

" आपण आपल्या मनाला बरं वाटेल त्या नात्यानं वागावं ! मी मात्र आपल्याला माझें प्रेमसर्वस्व–माझे पतिदेवच–मानीत आलें आहें त्यांत कालत्रयींही बदल होणार नाहीं ! "

" एकमेकांपासून दूर राहून आपणाला पतिपत्नीचं नातं सांभाळतां येईल का ? "

" आपल्याला नाहीं का सांभाळतां येणार ? "

" माझी गोष्ट वेगळी, कुसुम ! मी पुरुष आहें, पण तूं एक स्त्री आहेस. तुला असं वागणं शक्य आहे का ? "

" कां नाहीं शक्य बरं ! एखाद्यावर पति म्हणून प्रेम करायला, मी म्हणतें जगाच्या दृष्टीनं जरूर असलेला विवाहाचा शिक्का आपल्याला दुर्दैवानं नाहीं मिळवतां आला, तरी आपण मनानं पतिपत्नीच नाहीं का ? शरीर बंधनांनीं जखडून राहील ! मन राहणं शक्य आहे का ? बीं मातींत पुरून त्याच्या डोळ्याना दिसणाऱ्या शरीराला मुठमाती दिली तरी त्याचं अंतःकरण या मर्त्य जगांतल्या बंधनाला न जुमानतां कोंबाच्या रूपानं आपली स्वातंत्र्यप्रियता दाखविण्याकरता धडपडत असतं ना ? जड जगांतल्या निर्दय बंधनांनीं शरीराला बांधून टाकण्याचा कोणीं कितीही प्रयत्न केला, तरी मन दुप्पट जोरानं तीं बंधनं तोडण्याचा प्रयत्न करत असतं ! हा निसर्गाचा नियम आहे ! कृत्रिम बंधनाच्या पायटांचांनीं निसर्गाचीं नैसर्गिक नियमांचीं फुलं पायदळीं चुरडून त्याचा चोळामोळा कुणालाच करतां येणं शक्य नाहीं !

भांड्यातलं पाणी अगदीं हालचाल न करतां स्वस्थ असलेलं दृष्टीस पडतं ! नाहीं का ? पण त्याच्या शरीराला उष्णतेच्या दुःखाची आंच लागतांच त्याचं स्वातंत्र्यप्रिय हृदय वाफेच्या रूपानं तें जड दुःखबंधन तोडून वातावरणाच्या स्वातंत्र्यसाम्राज्यांत विलीन होण्याचा प्रयत्न करत असलेलं आपण पहात नाहीं का ?

निसर्ग अन् मानवी मन यांच्या भावसंवेदनांत मी म्हणतें मुळींच फरक

नाहीं ! फरक आहे असं वाटत असेल तर तो जडबंधनांनीं उत्पन्न केलेला आभास होय ! ”

“ कुसुम तुझं म्हणणं बरोबर आहे. अनंत अशा आकाशाला आंवरणं अगाध ईश्वरी शक्तीच्या आवाक्याबाहेरचं आहे; तद्वत् मनाला आंवरून धरणं मानवी शक्तीच्या मर्यादेबाहेरचं काम आहे ! स्वातंत्र्यासाठीं तळमळणारं मन शरीराचे जडबंध ताड्ताड् तोडायलाही मागेंपुढें पहाणार नाहीं ! निसर्गकन्या सृष्टिसुंदरी हिच्यावर आकाशाचें प्रेम बसलेलें पाहून निसर्ग गड्गडाट, कड्कडाट करून, त्या रागाच्या भरांत लखलखत्या बिजलीच्या तरवारीच्या धारेनें त्याच्या शरीरावर वार करतो. त्या मारामुळें शरीराला झालेली जखम मेघरूपी कापसाच्या मलमपट्टीनें बांधून काढण्याच्या कामांत गुंग झालें असताही, आकाश आपल्या प्रीतिदेवतेच्या दिव्य दर्शनासाठीं आपलं प्रेमानें भरलेलें हृदय पावसाच्या रूपानें तिच्याकडे पाठवून देण्यास विसरत नाहीं ! हें आश्चर्य करण्यासारखें नाहीं काय ? प्रेमासाठीं, प्रीतिस्वातंत्र्यासाठीं, शारीरिक दुःखही न जुमानणाऱ्या आकाशहृदयाचें कौतुक करावें तितकें थोडेंच आहे ! प्रेमस्वातंत्र्यासाठीं चाललेली ही निसर्गातील धडपड आमच्यासारख्या मानवांनीं लक्षात ठेवण्यासारखी आहे ! पण कुसुम तुला सहवासाशिवाय प्रेम करणं शक्य आहे का ? ”

“ आपलं असं म्हणणं आहे का, कीं सहवाससुख जिथं नाहीं, तिथं प्रेमोद्भव होणं शक्य नाहीं, असा का आपल्या म्हणण्याचा अर्थ ? सहवासामुळं प्रेम वाढत असेल, किंवा प्रेमामुळं सहवास हवासा वाटूं लागेल ! पण प्रेम उत्पन्न व्हायला, उत्पन्न झाल्यावर त्याची वाढ व्हायला, किंवा वाढ झाल्यावर तें कायम टिकायला सहवासाची जरूरी आहे असं नाहीं मला वाटत ! प्रेम हें स्वयंभू आहे ! प्रेम करायचं नसतं ! तें जडायचं असतं ! प्रेम कर म्हणून करतां येत नाहीं किंवा विसर म्हणून विसरतां येत नाहीं ! सहवासाचा सहचर पुढें मागें एकसारखा सोबत करत असल म्हणजे प्रीतिसुंदरीच्या मनाला निराशेच्या संकटांची भीति वाटत नाहींशी होऊन, तिचं मन आनंदी उत्साहानं थय् थय् नाचत राहतं एवढंच ! म्हणून काय सहवासाची सोबत प्रेमाला, प्रेमोद्भव व्हायला किंवा प्रेमोद्भव

झाल्यावर तें कायम टिकायला, अगदीं आवश्यकच आहे अशांतला मुळींच भाग नाहीं ! ''

"कुसुम ! मला तुझं हें तत्त्वज्ञान नको आहे; तुझ्या मनाला लग्नाशिवाय माझ्यावर प्रेम करतां येईल का ? किंवा करतां आलं तर तें कायम टिकेल का ? दिव्य प्रेमासाठीं एवढं दिव्य तुला करतां येईल का ? ''

"मीं एवढं दिव्य केलं तर नवल कसलं बाई त्यांत ? निसर्गप्रेमाचं रहस्य हें दिव्यच आहे ! नाहीं का ? नभःश्रीच्या सौंदर्यानं वेडा होऊन तिच्यावर निःसीम, निरपेक्ष प्रेम करणाऱ्या गिरिरायाला तिचा सहवास आधीं, किंवा पुढें कधीं तरी लाभतो का ? पण सहवास लाभला नाहीं, किंवा पुढं लाभणार नाहीं म्हणून तो तिच्यावर प्रेम करण्याचं विसरला आहे का ? एकसारखा तिच्या मुखसौंदर्याकडे पहात आज अनंत काल प्रीतीचा प्रेमपाठ मनांतल्या मनांत गुणगुणत तो एके ठिकाणीं सारखा उभा राहिला आहे ! वायुलहरी त्याचं प्रेम आपल्याकडे ओढायचा प्रयत्न करतात, पण त्यांच्या त्या वरपागी प्रेमाकडे तो ढुंकूनही बघत नाहीं, कीं कसली हालचालही करीत नाहीं ! त्याचं नभःश्रीवरचं प्रेम निःसीम, निरपेक्ष आणि अचल असं आहे ! तें कशामुळें नाहींसं किंवा कमी होणं मुळींच शक्य नाहीं !

सागरतळाशीं लपलेल्या रत्नमोत्यावर आषक्त झालेली समुद्रलाट त्याच्या प्रेमानं नाचत बागडत असते ! पण तिची आणि त्याची कधीं तरी भेट झाली आहे का ? दूर राहूनच ती त्याच्यावर प्रेम करीत असते ना ? सहवाससुख अशक्य म्हणून तिनं कधीं आपलं त्याच्याविषयींचं प्रेम कमी करण्याचा विचार केला आहे का ? नाहीं ना ? मग, आपला सहवास लग्नविधीनं लाभण्याचं भाग्य माझ्या नशिबीं नसलं, म्हणून माझ्या हृदयाला आपल्यावरचं प्रेम विसरून जातां येईल का ? आपणांला तरी तें विसरतां येणं शक्य आहे का ? शक्य असेल तर माझं असं म्हणणं आहे कीं, आपलं माझ्यावर खरं प्रेमच नव्हतं ! लौकिकदृष्ट्या विवाहाची प्रेमाला जरुरी लागते ! पण प्रेमावांचून विवाह शक्य आहे, त्याप्रमाणं विवाहावांचून प्रेमही शक्य आहे !

"तर मग यापुढं आपण पतिपत्नीच्या नात्यानं जगांत वावरायचं कीं काय ? ''

"शरीरसंयोग घडवून आणणारी जी जगाची प्रतिपत्तित्वाची कोती समजूत आहे, त्या समजुतीप्रमाणं जरी आपणांस पतिपत्नी म्हणून राहतां आलं नाहीं, तरी आपल्या अंतःकरणांत अधिष्ठित असलेल्यां अधिदेवतेच्या दृष्टीनं आपण पतिपत्नीच आहोंत! नाहीं का नाथ? – नाहीं का? सांगा ना गडे!"

असें म्हणून कुसुमनें कुमारांच्या हृदयाला घट्ट मिठी मारली! मूर्तिमंत प्रीतिदेवतेनेंच प्रेमानें मिठी मारल्याचा भास कुमाराच्या मनाला झाला! त्या प्रेममिठीचा आवेग कुमारांच्या पुरुषहृदयालाही सहन झाला नाहीं! त्यांनीं तिला तितक्याच दृढतेनें आपल्या हृदयाजवळ ओढून धरून तिच्या अधरींच्या अमृताचं आकंठ पान केलें!! दिव्याच्या नंदनवनांत चिरस्थान मिळाल्याचा त्यांना भास झाला!

थोडा वेळ त्या दोन प्रेमी जीवाची जीवनसमाधी लागली होती! त्या ब्रह्मानंदाच्या तल्लीनतेंत त्यांना आपल्या जडदेहाचा व या मर्त्य जगाचा विसर पडला! आणि मृत्युनंतर आत्मा चैतन्यांत विलीन होतो, तद्वत् कल्पनामय दिव्यत्त्वाच्या अमरपदीं त्यांचा आत्मा तन्मय झाला!!

जरा वेळानें ती कुमाराना म्हणाली–"मला माझं हें जड अन् नश्वर शरीर आपल्या दिव्य अन् अविनाशी हृदयचैतन्यांत विलीन करतां आलं असतं, तर काय बहार होणार होती पण! जड देह दिव्य अशा हृदयांत मिसळून एकजीव होणं शक्य नसेल, तर शरीराशिवायच, दुसरा जन्म घेऊन, आपल्या हृदयांत शिरावं अशी मला उत्कंठा लागली आहे! यावेळीं मला मरण येईल तर!"

'मरण!' ही कल्पना ऐकून कुमारांचें मनही थोडा वेळ भयभीत झालें! आणि ते एकदम म्हणाले– "कुसुम तुला मरणाची इच्छा कां ग व्हावी या वेळीं!"

"आपल्या अंतःकरणाचा ठाव काढण्यासाठीं!"

"तुला मरणाची भीति वाटत नाहीं का!"

"मरणाची भीति! नाथ मरणाची भीति आपल्याला वाटते का! नाहीं ना वाटत! मग मला तरी का वाटावी! ज्या मरणामुळं मला

आपल्या हृदयचैतन्यांत, वातावरणांत हवा वावरते त्याप्रमाणें, विनादेह वावरायला मिळेल त्या मरणाची भीति मला कां बरं वाटावी?

जड देहाचं अवजड ओझं अंगावर घेऊन, जिवंतपणीं मिळणारं सुख देहाचं ओझं बरोबर न बाळगतां तेंच सुख, मरणानं मिळवितां येत असेल, तर मरणांत भिण्यासारखं काय बरं आहे? उलट अशा मरणांतच जगण्याचं सुख आहे! नाही का? जें सुख जगून मिळवावंसं वाटतं, पण जगून मिळत नाही, तेंच सुख मरून मिळत असेल तर जडदेहाचा त्रास चुकावा म्हणून, मरणाचा मोठेपणाचा मान मिळवायला कोण बरं तयार होणार नाहीं?"

"कुसुम! जीवन आणि मरण! या दोन अवस्थांपैकीं एक अवस्था सध्यां आपण भोगत आहोंत! त्याचा कंटाळा आला म्हणून तर नाहीं ना तुला अशी मरणाची इच्छा होतेय्? का ग? कुसुम! लाडक्या जीवा! प्रीतीच्या पांखरा! मरणांत सुख आहे कीं नाहीं? कुणीं सांगावं?—मरण्यात जगण्याचं सुख असेल तर तें मरण्याचं सुख नको!—दुसरं कसलं सुख असेल, तर तसल्या सुखाचा अनुभव घेण्यासाठीं मरणाची इच्छा कोण करणार नाहीं बरं?

मरण म्हणजे, या जड जगात आपण देहानें जगतों, तें दिव्य अशा अक्षयाच्या जगांत देहाविणं जगणं, हें जर खरें असेल तर त्या मरणांत तरी सुख असेल किंवा नसेल हें कोणीं सांगावं? या मरणानं जर निर्देह जगण्याचं सुख मिळत असेल तर तें मरण नको! आणि हें जगणंही नको! अक्षय शांतीचा, अंतिम आनंदाचा, अविनाशी सुखाचा, कल्पनामय दिव्यत्त्वाचा, दिव्याच्या नंदनवनाचा चिरकाल लाभ करून देणाऱ्या सदेह किंवा निर्देह मरणासाठीं मन मनांत मर मर मरत आहे! तशा प्रकारचं मरण मिळण्यासारखं असेल तर मीही तुझ्याबरोबर-या माझ्या लाडक्या कुसुमबरोबर-आणि तुझ्यासकट मरायला आतां या क्षणाला तयार आहें! चल कुसुम, आपण मरणाच्या हिंदोळ्यावर अनंत काल अक्षय शांतीचे दिव्य झोंके घेत राहूं चल! चल गडे! चल ना!"

इतकें बोलून होत आहे तों इन्दूचीं पावलें वाजलीं. थोड्या वेळांत इन्दु आलीही! आकाशहृदयाच्या प्रीतिपाशांत संध्येला, तद्वत् कुमारांच्या

प्रेमपाशांत बद्ध झालेल्या कुसुमला पाहून इन्दूच्या जीवाला खरा आनंद झाला ! उषारवीच्या मीलनानें सृष्टिसुंदरीचें हृदय आनंदानें नाचत नाहीं का ? अगदीं त्या प्रकारच्या आनंदानें तिचें मन नाचूं लागलें ! आणि ती कुमार – कुसुम या दोन जीवांचें मधुर प्रेममीलन अतृप्त नयनांनीं पाहूं लागली ! इतक्यांत शेखर रडूं लागला ! त्या रडण्यानें कुमार आणि कुसुम भानावर आलीं !

शेखरला इन्दुमाईच्या कडेवर बघून, कुसुमला फुलवंतीच्या कडेवर बसून बागडणाऱ्या दंवबालकाची आठवण झाली ! वायुलहर त्या दंव-बालकाला स्पर्श करण्यासाठीं धावत जाते, तशी कुसुम शेखरला हातांत घ्यावयाला धांवली ! कुसुमला बघून शेखर तिच्याकडे जाण्यासाठीं, फुल-पांखरूं फुलवेलीकडे जाण्यासाठीं पंख पसरून धडपड करतें त्याप्रमाणें हात पसरून ' हूं, हूं ' करूं लागला ! कुसुमनें लगेच त्याला ओढून जवळ घेतला ! व त्याच्या गालाचे ती पटापट मुके घेऊं लागली ! मुके घेतां घेतां ती आपल्याशींच बोलत होती—

" माझ्या जवळ यायला इतकी धडपड का गुलामा ? मी तुझी आई नव्हे बरं ! नव्हे कशी ? – तुझी आईच आहें मी बरं का बाळ ! या जन्मीं रक्ताच्या आईलेकाचं नातं नसलं तुझं माझं, तरी मागल्या जन्मीं खात्रीनंच असलं पाहिजे ! नाहीं तर आईला सोडून उभ्या जन्माची ओळख असल्या-प्रमाणें बाळ, तूं कां रे माझ्याजवळ यायला इतका उतावीळ अन् उत्सुक झालाहेस बरं ? ही पूर्वजन्मींची ओळख का रे ? तुला तुझ्या बाळपणच्या पुण्याईनं मागल्या जन्मीचं सारं सारं कळत असेल नाहीं का रे बाळ ? म्हणूनच का माझ्याकडे – या तुझ्या मागल्या जन्मींच्या आईकडे – जुन्या ओळखीनं या जन्मीं नव्यानं यायला इतकी तुझी धडपड ही? हो का रे लबाडा?"

हें मनोरम दृश्य पाहून कुमार म्हणाले–" कुसुम ! त्या लहानाबरोबर काय ग बडबडत बसली आहेस तूं ? काय कळतंय बरं त्याला ? "

" तुम्हांआम्हांला नाहीं कळत तें कळतंय् बरं याला ! आम्हांला सारं कळतंय् हा खोटा अभिमान यापुढं, या लहान बालकापुढं आपल्या-सारख्या मोठ्या माणसांनीं बाळगूंच नये म्हणतें मी ! "

इन्दु म्हणाली– "तें जाऊंदे ग आतां!" कुसुमला आपण एकेरी नांवानें हांक मारली या जाणीवेनें तिला कसेंसेंच झालें. परंतु तोंडांतून एकदम शब्द आला तो मागें घेणें शक्य नव्हतें. त्यामुळें यापुढें आपण तुला एकेरी नांवानेंच हांक मारणार आणि तूंही मला एकेरी नांवानेंच हांक मार अशी तिनें कुसुमला विनंति केली; आणि ती पुढें म्हणाली–" मला यायला जरा उशीर झाला; पण आतां मी चहा करून आणतें तो तूं घे. त्या लबाडाला मात्र देऊं नकोस हं!"

असें म्हणून इन्दु चहा करावयाला निघून गेली. तिच्या मनाला आज फारच आनंद झाला होता! मागें आपण कुसुमच्या इकडे गेलों असतांना तिच्या मनाला कसलें तरी दुःख जाळीत होतें, तें दुःख आतां अगदीं नाहींसें झालेलें पाहून तिला फारच आनंद झाला! कुसुमचा आनंद तो आपला आनंद अशी अलीकडे तिच्या मनाची स्थिति झाली होती! कुसुम-कुमाराच्या दिव्यानंदानें तिचें दिव्य हृदयही आनंदानें नाचूं लागे!

चहा घेऊन इन्दु आली. त्या तिघांनीं चहा घेतला. यावेळीं इन्दूनें कुसुमला त्या दिवशींच्या तिच्या विचित्र वागणुकीचा अर्थ विचारला. कुसुमनें कुमारांना विचार म्हणून तिला सांगितलें. इन्दूनें कुमारांना विचारताच त्यांनी तिला सगळी हकीकत सांगितली. ती ऐकून आणि कुसुम अविवाहित राहणार हें कळून आल्यावर इन्दूचें नाजूक मन, सूर्याच्या प्रखर किरणानी वातावरण तप्त व्हावें, त्याप्रमाणें विषण्ण झालें!



## कुंज २० वा.

मागील प्रकरणांत वर्णिलेली घटना घडून आज दहा बारा महि-न्यांचा अवधि लोटला आहे. या अवधींत जगांत अनेक बऱ्या वाईट घडामोडी झाल्या असतील ! त्यांपैकीं आपल्या कथानकाच्या दृष्टीनें महत्त्वाच्या म्हणजे वसंत विमल, आणि विनायक गजरा याचे विवाह होत ! प्रथम रमावहिनी वसंतविमलच्या लग्नाला कबूल होईनात ! पण शेवटीं कुमारानीं त्यांची याबद्दल खात्री पटवून कबुली मिळविली !

उमाकाकूंना विमलसारखी सद्गुणी, सुविद्य अशी सून मिळाली म्हणून अतिशयच आनंद झाला. तिच्यावर त्या आपल्या स्वतःच्या मुलीसारखें प्रेम करूं लागल्या ! रमाकाकू नातू केव्हा होतो याची वाट बघत बसल्या आहेत ! वसंत विमलच्या आनंदाचें वर्णन करण्याचें कारण नाहीं. त्याच-प्रमाणें विनायक गजरा, विश्वासराव रोशन हींही अगदीं सुखसमाधानांत आहेत ! वसंतानें काढलेल्या 'ध्येय – विकास' शिक्षणसंस्थेंत विमल, रोशन गजरा, विनायक अध्यापनाचें काम करीत आहेत. कुमार, इन्दु वेळांत वेळ काढून तेथें शिकवायला जात असतात !

कुसुम, रोशन व विमल ह्या तिघीजणी बी. ए. च्या परीक्षेला बसल्या होत्या. परीक्षा होऊन दोन तीनच दिवस झाले होते. इतक्या दिवसांत कुसुम नगरला एकदासुद्धां गेली नाहीं. यामुळें बापू-ताईंना अत्यंत वाईट वाटलें ! बापूंनीं आईचा राग आपल्यावर काढूं नकोस म्हणून किती वेळां तरी तिला पत्रांतून कळविलें. एकदां तर ते स्वतः येऊन कुसुमला भेटूनही गेले. त्यावेळीं त्यांनीं तिला नगरला येण्याचा पुष्कळ आग्रह केला, तरी तिचा नगरला न जाण्याचा निश्चय ढळला नाहीं !

नगरला आल्यावर बापूसाहेबांनीं ही सर्व हकिकत ताईंना कळविली. ताईंना वाईट वाटलें ! पण त्यांचाही निश्चय कुसुमप्रमाणेंच अढळ होता ! 'पहिली पत्नी जिवंत असलेल्या इसमाबरोबर लग्न करायला माझ्या कुसु-मला मी जिवंत असेपर्यंत कबुली देणार नाहीं !' हा त्याचा जप एकसा-

रखा चालला होता. बापूंनीं ताईंना आपला निश्चय मोडण्याबद्दल पुष्कळ वेळां सांगितलें, विनंति केली, शेवटीं पायधरणीही करून बघितली ! तरी त्यांच्या निश्चयांत बदल झाला नाहीं. इतकें सांगूनही ज्या अर्थी त्यांचें मन बदलत नाहीं असें त्यांनीं पाहिलें तेव्हां बापूसाहेबांनीं तो विषयच सोडून दिला !

कॉलेजला सुटी असली कीं कुसुम कुमाराकडेच येऊन राहात असे; ऑक्टोबरची व नाताळची सुट्टी तिनें कुमाराच्या घरींच काढली. कुमाराचा सहवास तिला बहुतेक नेहमींच घडत असे. पण त्यामुळें, तिला प्रथम वाटलें होतें त्याप्रमाणें, तिच्या मनाला खरा आनंद होईना ! पत्नीपद विवाहाशिवाय निरुपयोगी आहे, ही जाणीव जसजशी तिच्या मनाला होऊं लागली, तसतसें तिचें हृदय व्याकूळ होऊं लागे. आणि हळुहळू त्याचा तिच्या शरीरावर परिणाम होऊं लागला. अशा स्थितींत परीक्षा जवळ आली. परीक्षेच्या अभ्यासामुळें शारीरिक त्रासात मानसिक त्रासाची भर पडून ती अगदीं वाळल्यासारखी दिसूं लागली ! पण विशेष कांहीं न होता ती वर लिहिल्याप्रमाणें परीक्षेला बसली. तिचे पेपर्स उत्तम गेले. पहिला क्लास मिळेल अशी तिच्या मनाला खात्री वाटूं लागली. पण या सर्वांचा असा परिणाम झाला कीं, परीक्षा संपली आणि दुसऱ्याच दिवशीं तिचें कपाळ दुखूं लागलें. हळुहळू तिला ताप येऊं लागला. तो ताप अंगावर तोल-ल्यामुळें जास्तच वाढला. ‘ रेसिडेन्सी ’च्या ‘ रेक्टर ’नीं डॉक्टरला बोला-वणें पाठविलें. डॉक्टरांनीं ‘ टायफॉइड ’ म्हणून आपलें मत दिलें. असल्या तापांत ‘ नर्सिंग ’ची अत्यंत जरूरी असल्यामुळें ‘ रेक्टर ’नी विमलरोश-नना सांगून गावांत तिची व्यवस्था करावयाला सांगितलें. ही हकीकत त्यांनीं कुमारांना कळविली. कुमारांनीं ताबडतोब कुसुमला आपल्या घरीं आणली. मुंबईहून प्रख्यात डॉक्टर बोलाविले ! औषधासाठीं शेंकडों पैसे खर्च केले, तरी तिच्या प्रकृतीला गुण येईना ! शेवटीं ‘ मिरज ’च्या प्रसिद्ध असलेल्या डॉक्टरना बोलवण्यांत आलें ! त्यानीं परीक्षा करून आपण प्रयत्न करून पहातों; ‘ प्रयत्न करणें आपल्या हातीं, यश येणें दैवाधीन ! ’ वगैरे गोष्टी सांगण्यास सुरवात केली. पण नर्सिंग अत्यंत उत्तम तऱ्हेनें झालें पाहिजे. यासाठीं याची कोण आई वगैरे असली तर त्यांना बोलवा म्हणून त्यांनीं सूचना केली. अजूनपर्यंत कुमार स्वतः तिचें नर्सिंग करीत होते !

एखाद्या कसलेल्या अनुभविक नर्सलाही ज्या प्रेमानं, कळकळीनें तिची सेवाशुश्रूषा साधली नसती, त्यापेक्षां अधिक प्रेमानें आणि कळकळीनें त्यांनीं तिची सेवासुश्रूषा चालविली होती! तरी डॉक्टराचा आग्रह म्हणून त्यानीं नगरला कुसुमच्या वडिलांना "Kusum seriously ill, start immediately" (कुसुम अत्यवस्थ आहे, तावडतोब निघून या.) अशी तार केली.

तार वाचून बापूसाहेबांच्या जीवाचें अगदीं पाणी झालें. तावडतोब त्यानीं त्या तारेंतला मजकूर आपल्या पत्नीला कळविला. किती झालें तरी तें मातृहृदय! एकुलत्या एक पोरीची अशी दशा झालेली पाहून – आणि ती आपल्यामुळें झालेली पाहून –त्या धाय मोकलून रडूं लागल्या. बापूसाहेब आणि ताई त्याच दिवशीं संध्याकाळीं निघून पुण्याला दुसऱ्या दिवशीं आलीं.

तीं आलीं त्यावेळीं कुसुम स्वस्थ निजली होती. पण ताईंना मुळींच धीर धरवेना! त्यांनीं धावत जाऊन तिला मिठी मारली आणि रडण्यास सुरवात केली!

"फुलासारखी माझी नाजूक बाळ! मी मेलीनंच तिची अशी दशा केली! देवा माझ्या बाळीची अशी दशा बघायला मला कशाला रे जिवंत ठेवलंस? पण तुला माझ्या अपराधाचं शासन मला द्यायचं असेल! देवा! दुसरी कोणतीही शिक्षा भोगायला मी तयार आहें! पण माझ्या बाळीला लवकर एकदां बरी कर! माझी बाळ बरी झालेली या डोळ्यांनीं पाहिली तर देवा! नारायणा! तुझ्या पुढ्यांत एक लाख वाती जाळीन रे!

जळ्ळा मेला माझा निश्चय! एवढा निश्चय करून काय एवढं मी मोठं सोनं मिळविलं? माझ्या सोन्यासारख्या जीवाची मात्र मी माती करून टाकली! बाळ कुसुम! बोल ना ग या तुझ्या निर्दय आईशीं!"

"आई! तूं का ती? केव्हां ग आलीस? तुला भेटण्यासाठीं, तुझ्याशीं बोलण्यासाठीं माझा जीव कसा बघ घुटमळतोय् ग! आई! तूं बोलत कां नाहींस? माझ्याशीं बोलूं नये असं अजुनीही वाटतं का तुला? आई! मी त्यांच्यावर प्रेम केलं! त्यांची पत्नी जिवंत असतां प्रेम केलं म्हणून का तूं माझ्याशीं बोलायची बंद झालीस? होय का ग, आई? प्रेमाला इतका

पोंच असतो का ग ?– सांग ना आई ! तुझ्यासाठीं– तुझ्या सुखासाठीं – मी माझ्या स्वार्थी सुखाचा संन्यास करायलाही तयार झालें. पण देवाला तेंही बघवेना ! म्हणून तर त्यानं मला तुझ्या अन् त्यांच्या नजरेपुढून दूर करण्याचा निर्दय निश्चय केलाय् ग ! आई ! मी आतां जातें बरं ! तुला अन् बापूंना त्रास द्यायला मी आतां नाहीं ग या जगाच्या जुलमी जंजाळांत राहात बरं !

आई आमच्या विवाहाला संमति दिली असतीस–किती ग गोड अन् सुखाचा विचार हा !–नुसत्या कल्पनेनेंच माझ्या अंगावर रोमांच उभे राहिले !– तर, तर आई तुमचं असं काय ग नुकसान होणार होतं ? माझ्या मरणानं जें तुझं नुकसान होणार आहे त्यापेक्षां अधिक भयंकर नुकसान मी त्यांच्याशीं लग्न केल्यामुळं झालं असतं, असं का आई, तुला वाटलं ? आई ! तुला तसं वाटलं तर तें तुझं वाटणं बरोबर नाहीं ग ! माझे कुमार !–कित्ति–कित्ति ग गुणी आहेत ते !–त्यांच्या गुणांची सर साऱ्या ब्रह्मांडालाही नाहीं ग यायची ! त्यांच्यावर मी प्रेम केलं !–हो केलं !–त्यांच्यावर प्रेम करायचं भाग्य लाभायला सातां जन्मांची पुण्याईच पाहिजे ग ! ती पुण्याई माझी तुझ्या डोळ्यांना दिसली नाहीं ! नाहीं ना दिसली ? दिसली असती तर तूं आपण होऊन आमच्या लग्नाला आनंदानं कबुली दिली असतीस ग आई !

पण आतां त्या गोष्टी हव्यात कशाला ? आई मी आतां जात्येंच, पण बापूंना जप बरं ! इन्दू ! त्यांना–माझ्या कुमारांना–माझ्या पतिदेवांना–माझ्या प्रेमाच्या पंचप्राणांना–माझ्या प्रेमस्वरूप परमेश्वरांना–डोळ्यांत प्राण आणून, प्रीतीच्या तेजांत लपवून ठेव ग ! नाहीं तर दुष्ट जगाची त्यांना दृष्ट लागायची बाई ! असलं तेज जगाच्या मत्सरी मनाला सहन कुठलं व्हायला बरं ? शेखरला–माझ्या बाळ शेखरलाही जपायचं हं !–जितकं जपावं असल्या सुलक्षणी जीवांना तितकं थोडंच आहे बरं ! मी तुला सांगायला नकोच, इन्दू ! तुझं आईचं हृदय आहे ! माझं बायकांचं आहे ! ”

हें अंतःकरण हालविणारं आपल्या कन्येचं भाषण ऐकून वसुमतिताईंच्या डोळ्यांतून–वाऱ्यानें कोंवळे पल्लव गळून पडावे–त्याप्रमाणें ढळढळां दुःखाचे अश्रू वाहूं लागले ! आणि रडत असतांनाच त्या कळवळून बोलल्या—

" बाळ कुसुम, नको ग मला असें आतां टाकून बोलूं ! मी एवढं करण्याचा अट्टाहास धरला तो तुझ्या कल्याणासाठींच ना ग ? पण दुर्दैवानं तुझं कल्याण कशात आहे तें मला बरोबर कळलं नाहीं ग त्या-वेळीं ! कळलं असतं तर माझ्या बाळीला मी अशी दुःखाच्या खाईत लोटली असती का ग ? बाळ ! तुला माझी माया माहीत नाहीं का ग ? मग माझ्यावर कां बरं अशी रागावल्येस तूं ?

बाळ लवकर बरी हो ग ! होशिल ना ? लवकर बरी हो–अन् माझ्या डोळ्यादेखत मला माझ्या रत्नमाणकाला तुझ्या कुमारांच्या स्वाधीन करूं दे ! इतके दिवस आम्ही तुझं पालनपोषण केलं, यापुढं आमचं पुण्य सरलं तुझं आणखीन् पोषण करायचं ! आतां ज्यांचं त्यांनीं केलं अन् आम्ही तें पाहिलं, कीं माझ्या आयुष्याचं अगदीं सोनं झालं हो ! "

" आई खरं का ग हें ? मी बरी झालें तर आमच्या विवाहाला तूं आपला शुभाशीर्वाद देशील का ग ?–त्यांची प्रथम पत्नी जिवंत असता देशील का ग ?–खरं का ग आई हें ? आई ! तूं माझी आई ना ग ? माझी म्हणून तर तूं एवढं माझ्यासाठीं करणार आहेस ! होय ना ग आई? पण मी बरी होण्यासाठीं मला काहीं तरी खोटं सांगून फसवूं नकोस गडे ! तूं काय सांगतेस तें खरं असेल, अगदीं अंतःकरणापासून तूं तें बोलत असशील, तर मी ही बघ आतांसुद्धां बरी व्हायला तयार आहें ! आई ! होय ग ! ही बघ मी बरी झालेंच कीं ! पहा ग आई ! माझ्याकडे ! मी आजारी दिसतें ?–दिसतें का ग आई ?–नाहीं ना दिसत ?

माझं त्यांच्यावर–माझ्या कुमारांवर–प्रेमच तितकं आहे बरं आई ! म्हणून तर नुसती मला तूं त्यांच्याशीं लग्न करायला परवानगी देत्येस हें ऐकूनच मी अगदीं साफ बरी झालें बघना ग ! "

" कुसुम ! त्यांची शपथ घेऊन सांगतें हवें तर, –तूं चांगली बरी हो;

मग मीच तुझा हात त्यांच्या–तुझ्या कुमाराच्या हातांत देईन ! मग तर झालं ना बाळ ? ”

“ माझी आई कित्ति–कित्ति छान अन् मायेची आहे पण ! ”–असें म्हणून कुसुमनें आईला घट्ट मिठी मारली !

×

कुसुम चांगली बरी होऊन एक महिना झाला. बापूसाहेब आणि त्यांच्या पत्नी वसुमतिताई अजून कुमाराकडेच आहेत. कुसुमचा कुमारांशी विवाह लवकरच होणार ही बातमी हा हां म्हणतां–प्रकाश जसा एका क्षणांत वातावरणात पसरतो त्याप्रमाणें–सर्व शहरभर पसरली ! सारें जग आश्चर्यानें चकित होऊन गेलें ! !

× × ×

आजच्या शुभ मुहूर्तावर कुमार कुसुम यांचा जगाच्या दृष्टीनें विवाह झाला ! दिव्याच्या तेजानें आकृष्ट झालेल्या जीवांनीं दिव्याच्या नंदनवनाचा कळस आज गांठला ! ! कुमार कुसुम यांच्या आनंदाला सीमा उरली नाहीं ! पण ‘ अधिकस्याधिकं फलम् ’ या न्यायानें कुसुम फर्स्टक्लासांत पास झाल्याची तार त्याच्या असीम आनंदांत–पावसाचें पाणी समुद्राच्या पाण्यात नांवाला भर घालतें त्याप्रमाणे-भर घालीत होती ! विमलरेशानही पास झालीं. त्यामुळें बॅरिस्टर विश्वासराव, वसंतराव, उमाकाकू, रमावहिनी वगैरे सर्व मंडळी आज आनंदांत होती !

आपण पास झाल्याची तार कुसुमनें प्रथम फोडून वाचली. लागलीच ती घेऊन ती कुमारांकडे गेली. कुमारांनीं तार हातात घेतली, आणि वाचून पहाण्यापूर्वीच तिला–आपल्या लाडक्या कुसुमला ! –heartiest congratulations दिले !

कुसुम हंसली ! – आनंदानें हंसली !! कुमार हंसले ! – तेही आनंदानेंच हंसले ! पण त्या हास्यानें त्यांच्या हृदयाची तृप्ति झाली नाहीं ! कुमारांनीं आनंदाच्या उत्कटतेंत कुसुमला कडकडून मिठी मारली ! कुसुमनें त्या प्रेमळ आणि लडिवाळ बाहुपाशांत–सुंदर फुलवेल शीतल वायुहृदयावर

मान टेंकून आपलें सुगंधसर्वस्व त्याला अर्पण करते, त्याप्रमाणें—स्वतःला बद्ध करून घेऊन, आपलें आत्मसर्वस्व त्यांना जिव्हाळ्याच्या जिव्लग भावानें समर्पण केलें ! !

त्यावेळीं " तूं माझी कुसुम ना ! " आणि " आपण माझे नंदकुमार ना ! "—हे आठ शब्द—लाजेची लाट स्त्रीगालाच्या ' गुलाबी समुद्रांत ' विलीन व्हावी, तद्वत् अष्ट दिशाच्या स्वर्गीय संगीतात, एकेक शब्द एकेका दिशेंत याप्रमाणें, मिसळून गेले ! !

× × ×

दिव्याच्या नंदनवनांत विहरणाऱ्या नंदकुमार आणि कुसुम यांचा, ज्ञात अशा या नश्वरतेच्या जगांतला हा प्रीतिविवाह, म्हणजे खरोखरच 'सच्चिदानंद' आणि ' अक्षय शांति ' यांचा, अज्ञात अशा त्या अक्षयतेच्या स्वर्गांतला, हृदयंगम चिरसंगमच असेल का ?




लेखन-सुरवात :
२७ एप्रिल १९३२



लेखन-शेवट :
१५ मे १९३२